



आ ब्रह्मन् ब्राह्मणो ब्रह्मवर्चसी जायताम् ।
आ राष्ट्रे राजन्यः शूरइषव्योऽति व्याधी जायताम् ॥

—यजुर्वेद ।





हे परमात्मन्, आमच्या राष्ट्रांत वेदविद् ब्राह्मण
आणि महाबलवान् क्षत्रिय वीर उत्पन्न होवोत !

—यजुर्वेद ।



# निवेदन.

—*—

विवेकानंद ग्रंथावलीचा हा 'बारावा खंड' आमच्या वाचकांच्या हातीं आम्ही देत आहों. थोडाबहुत अधिक मजकूर घालून या खंडांत ग्रंथावलीची समाप्ति करावी असा आमचा उद्देश होता, आणि याच दृष्टीनें स्वामीजींचे लेख मिळविण्याची खटपट आम्ही केली. हा सारा उपलब्ध मजकूर याच खंडांत घालावयाचा, परंतु अनेक कारणांनीं प्रस्तुत खंडाचें प्रकाशन बरेंच लांबलें. यामुळें नेहमींप्रमाणेंच हा खंडही तीनशें पृष्ठांचाच प्रसिद्ध केला आहे. आतां राहिलेले लेख व कविता यांचा स्वतंत्र खंड प्रसिद्ध करून ही माला संपविली जाईल.

—प्रकाशक.

# अनुक्रमणिका.



# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ.



## द्वादश खंड.



## स्वामी-शिष्य-संवाद.

[ ७ ]

[ **स्थळ:**—कलकत्ता इ. स. १८९७ ]

( ११ व्या खंडांतील पान ४८ वरून पुढें चालू. )

**शिष्य:**—पण एकाच पदार्थावर मन एकाकार होऊन त्याशीं तें समरस होऊन बसलें तर ब्रह्मानुभव कसा होणार ?

**स्वामीजी:**—आरंभीं एखाद्या पदार्थाशीं मन एकरूप झालें तरी पुढें त्या पदार्थांचें अस्तित्व तें विसरतें, आणि असा पूर्ण विसर पडला म्हणजे शुद्ध अस्मितेचा अनुभव मात्र शिल्लक उरतो.

**शिष्य:**—पण महाराज, मन पूर्ण निरोधावस्थेपर्यंत गेलें तरी पुन्हां वासनेचा उदय तेथें कसा होतो ?

**स्वामीजी:**—पूर्वसंस्कारांतून त्या उदय पावत असतात. बुद्धदेव जवळ जवळ समाधिस्थितीपर्यंत पोहोंचले, त्याच वेळीं मार त्यांच्यापुढें उभा राहिला. वस्तुतः मार हा कांहीं बाहेरून आलेला प्राणी नव्हता. बुद्धदेवांच्या मनाच्या बाहेर त्याला अस्तित्व नव्हतें. मनाच्या पूर्वसंस्कारांनीं हें रूप बाह्यतः धारण केलें होतें.

**शिष्य:**—पण समाधिस्थिति पूर्णावस्थेला जावयाच्या आधीं नानाप्रकारचे भयंकर अनुभव येतात, असें ऐकतों. हे अनुभव म्हणजे मनाच्या अंतर्गत वासनांचें बाह्य अवतरण समजावयाचें काय ?

**स्वामीजीः**—तसेंच नाहींतर काय? वासनांची हद्द ओलांडूं पाहणाऱ्या साधकाला ही वस्तुस्थिति त्या वेळी समजत नाहीं. हे सारे आपल्याच मनाचे खेळ आहेत, हें त्याच्या ध्यानांत येत नाही. तथापि ते त्याच्याच मनाचे खेळ असतात हें निश्चित आहे. फार काय, पण सध्यां जें जग आपण आपल्या-बाहेर पहात आहों, त्याला सुद्धां आपल्या मनाबाहेर अस्तित्व नाहीं. बाह्य पटावर मनाचें पडलेलें प्रतिबिंब आपण पहात असतों; आणि तें पहात असतां 'जग पाहिलें' असें आपण म्हणतों. आपलें मन निर्व्यापार झालें म्हणजे हें बाह्य अस्तित्व नाहीसें होऊन शुद्ध ब्रह्म मात्र उरेल. अशा स्थितीत स्वर्गादि अनेक लोकांच्या भावना तुम्ही केल्या तर ते ते लोक तुम्हांस दिसूं लागतील. जें तुमच्या मनांत येईल त्याचा त्वरित अनुभव तुम्हांस येईल. इतक्या स्थितीला पोहोंचलेला साधक पुन्हां परत आला तरी आपला अनुभव तो विसरत नाहीं. त्याला आलेली जागृति कायम राहते, आणि अखेरीस वासनापाशांतून तो मुक्त होतो. तथापि या स्थितींतही एक भयाचें स्थान आहे. येथें मनाचा समतोलपणा बिघडला तर पुढील मार्ग खुंटून ऋद्धिसिद्धि तेथे उभ्या राहतात; आणि साधक त्यांच्या पाशांत सांपडून स्थानभ्रष्ट होतो.

इतकें बोलून स्वामीजी कांही काल स्तब्ध राहिले. '**शिवोऽहम्, शिवोऽहम्**' असें दोन तीन वेळ म्हटल्यानंतर ते पुढें बोलूं लागले. 'मानवी जीवित हें आपणांस मोठें कोडें होऊन बसलें आहे. तें उलगडावयाचें असेल तर तसें करण्यास सर्वसंगपरित्याग हा एकच मार्ग आहे, त्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. संन्यास, संन्यास, संन्यास हा एकच शब्द तुम्ही आपल्या मनाला जन्मभर शिकवा. तुमचा हा एकच मंत्र असूं द्या. '**सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम्।**'

*
* *

[ ८ ]

[ **स्थळः**—कलकत्ता. मार्च, एप्रिल १८९७ ]

**स्वामीजींच्या दर्शनासाठीं शिष्य आज बाग बझारांत आला होता. पण स्वामीजी बाहेर जाण्याच्या तयारींत आहेत असें पाहून तो जरा थबकला.**

त्याला पाहून ' चल मजबरोबर ' असें स्वामीजी म्हणाले. रस्त्यावर येऊन एका भाड्याच्या गाडींत आम्ही बसलों आणि गाडी चालू झाली.

**शिष्यः**—महाराज, आपली स्वारी आज कोणीकडे चालली ?

**स्वामीजीः**—अरे, तूं मजबरोबर आहेसच. आतां तुला दिसेल.

अशा रीतीनें आम्ही कोठें जात आहों याचा पत्ता लागूं न देतां स्वामीजींनीं भाषणाचा उपक्रम केला. ' स्त्रीशिक्षण, स्त्रीशिक्षण ' म्हणून पुष्कळ ओरड आपण ऐकतो; पण या दिशेनें खरा प्रयत्न कोणीं केल्याचें आढळून येत नाहीं. तुम्ही पुरुष पुष्कळ शिकतां सवरतां आणि संस्कृत होण्याचा यत्न करितां पण तुमचें सांसारिक सुखदुःख ज्यांच्यावर अवलंबून, त्यांत तुमच्या ज्या भागीदार आणि तुमचा संसार नीट चालावा म्हणून ज्या जिवाकडेही पहात नाहींत त्यांना पुढें नेण्यासाठीं तुम्ही काय खटपट करितां ?

**शिष्यः**—का बरें, असें कां म्हणतां ? केवळ स्त्रियांसाठीं किती तरी शाळा आणि महाविद्यालयेंसुद्धां सुरू झालीं आहेत. कितीतरी मुली हल्लीं बी. ए., एम्. ए. होतात.

**स्वामीजीः**—होय, पण हा सारा पाश्चात्य थाट झाला. आपल्या विशिष्ट आर्य संस्कृतीला अनुरूप अशा पद्धतीनें चालविलेल्या किती शाळा अस्तित्वांत आहेत ? तुमच्या राष्ट्राचे विशेष जेथें स्पष्टत्वानें दिसतील, अशा शाळा किती आहेत ? तुमच्याच धर्मतत्त्वांचा आचार जेथें आढळून येईल अशा शाळा किती आहेत ? पण मी हें काय बोलतों ? स्त्रियांसाठीं अशा शाळा नाहींत यांत नवल नाही. कारण आधी पुरुषांसाठीं सुद्धां अशा शाळा नाहींत. हिंदुस्थानांत तीन चार टक्के लोक सुशिक्षित आहेत असें सरकारी रिपोर्टांवरूनच दिसून येतें. स्त्रियांत तर हें प्रमाण पुरें एक टक्कासुद्धां नाहीं.

पण अशी स्थिती आहे म्हणूनच या हीनावस्थेला आपण पोंचलों आहोंत. ज्ञानाचा प्रसार सर्वत्र झाल्यावांचून देशाचें पाऊल पुढें तरी कसें पडणार ? या बाबीत मनापासून प्रयत्न करणाराही कोणी आढळत नाहीं. जे देशाचे पुढारी म्हणवितात आणि ज्यांच्यावर देशाचें भवितव्य अवलंबून आहे, अशा लोकांत सुद्धां या बाबीची काळजी करणारा कोणी दिसत नाहीं. स्त्रिया आणि सामान्य जनता यांच्यांत शिक्षणाचा प्रसार झाल्यावांचून तुमचें पाऊल कधींच पुढें पडावयाचें नाहीं हें ध्यानांत ठेवा; आणि या कार्यासाठींच कांहीं ब्रह्मचारी व

ब्रह्मचारिणी तयार करण्याचा माझा मानस आहे. जन्मभर संन्यस्त वृत्तीनें राहून खेडोपाडी शिक्षणाचा प्रसार करावयाचा अशी शपथ त्यांनी घेतली पाहिजे. अशाच रीतीनें स्त्रियांनीं शिक्षणाचा प्रसार स्त्रियांत करावयाचा आहे. पण हें सारें कार्य आपल्या स्वदेशी पद्धतीनें झालें पाहिजे. संन्याशांकरितां असलेल्या मध्यवर्ती मठाप्रमाणेंच ब्रह्मचारिणींकरितांही मठ असावे. या मठांत उच्च दानतीच्या आणि सुविद्य ब्रह्मचारिणींनीं शिक्षणाचें कार्य करावें. स्त्रियांना आपलीं इतिहासपुराणें चांगलीं अवगत करून द्यावीं, त्यांना गृहकृत्यें शिकविलीं पाहिजेत. मातेचें खरें कर्तव्य काय याची जाणीव त्यांना करून देऊन त्यांचें शील बनविणें हें या संस्थांचें मुख्य कार्य असलें पाहिजे. अर्वाचीन शास्त्रांना अनुसरून आरोग्यशास्त्राची माहिती त्यांना करून देणें जसें इष्ट आहे, त्याचप्रमाणें सदाचार आणि धर्म यांजकडेही त्यांची प्रवृत्ति होईल असें शिक्षण त्यांना देणें अवश्य आहे. योग्य कालीं त्या खरोखर सुमाता होतील, अशी काळजी आपण आरंभापासून घेतली पाहिजे. आपलें अखेरचें ध्येय हेंच असावें; अशा सुमातांच्या पोटीं येणारी प्रजा सद्गुणी आणि सुमार्गवर्ती होऊन आपल्या देशाचें कल्याण साधील यांत शंका नाहीं. सुशील मातांच्या पोटींच महापुरुष जन्म घेत असतात; पण तुम्हीं आज आपल्या स्त्रियांची कशी दुर्दशा केली आहे पहा ! जणूं काय तीं प्रजोत्पादक यंत्रेंच ! तुम्ही पुरुष स्वतःस सुशिक्षित म्हणवितां, मग त्या शिक्षणाचें हेंच फळ काय ? स्त्रीवर्ग आणि सामान्य जनता यांची उन्नति प्रथम झाली पाहिजे. असें झालें तरच हिंदुस्थान देश उन्नतीच्या मार्गाला लागेल.

बोलतां बोलतां आम्ही चोरबागनपाशीं येऊन पोचलो, तेव्हां स्वामीजी शिष्याला म्हणाले ‘ तपस्विनी माताजींनीं आपल्या महाकाली पाठशालेंत मला बोलाविलें आहे. ’ आमची गाडी पाठशालेजवळ उभी राहिली. तेथें तीनचार सद्गृहस्थ पुढें आले आणि स्वामीजींना ते वरच्या मजल्यावर घेऊन गेले. तेथें दाराशींच स्वतः माताजी उभ्या होत्या. स्वामीजींचा आदरसत्कार करून त्यांना त्या आंतल्या दिवाणखान्यांत घेऊन गेल्या. या ठिकाणीं स्वामीजींचें स्वागत करण्याकरितां कांहीं कुमारिका उभ्या होत्या. स्वामीजी आंत जातांच एक शिवस्तोत्र संस्कृतांत म्हणण्यास त्यांनीं सुरवात केली. पाठशाळेंत पूजनाचा प्रकार कसा शिकवितात याचीही तालीम त्यांनीं करून दाखविली.

हें पाहून स्वामीजींना मोठें कौतुक वाटलें आणि आनंदही झाला. नंतर स्वामीजींची स्वारी पाठशाला पाहावयास गेली. शाळा पाहून स्वामीजी दिवाणखान्यांत परत आले, तेव्हां माताजींनीं एका कुमारिकेला बोलवून रघुवशांतील तिसऱ्या सर्गाच्या पहिल्या श्लोकावर व्याख्यान करावयास सांगितलें. तिनें संस्कृतांतच या श्लोकावर टीका करून दाखविली. स्त्रियांना शिक्षण देण्याच्या कामीं माताजींना इतकें यश मिळालें हें पाहून स्वामीजींना मोठा आनंद झाला आणि तसें त्यांनीं बोलूनही दाखविलें. तेव्हां माताजी मोठ्या लीनतेनें म्हणाल्या, 'या कुमारिकांची सेवा मी करितें तेव्हां या सर्व कालीमाता आहेत अशी माझी भावना असते. त्या जगन्मातेच्या पूजनाचाच हा एक प्रकार आहे. नाहींतर मोठी कीर्ति अथवा पैसा असल्या क्षुद्र वस्तूंची मला काय अपेक्षा आहे ?'

स्वामी जावयास निघाले तेव्हां तेथल्या नोंदबुकांत त्यांनीं एकच वाक्य लिहिलें 'पाठशाळेच्या कार्याची दिशा अगदीं योग्य आहे.' माताजीना नमन करून स्वामीजी खाली आले व पुन्हां गाडींत बसले. गाडी बागबझाराकडे निघाली आणि आमचा संवाद पुन्हा चालू झाला.

**स्वामीजीः**—या परमपूज्य स्त्रीची जन्मभूमि किती दूरवर राहिली आहे पहा. आपलीं सारीं सांसारिक बंधनें तोडून टाकून ती इतक्या लांब येऊन राहिली. ती सर्वसंगपरित्यागी असतांही समाजसेवेंत किती तत्पर आहे पहा. ती स्वतः स्त्री नसती तर अशा प्रकारचें शिक्षण स्त्रियांना देण्याचें तिनें कधीं-तरी अंगीकारलें असतें काय ? त्या पाठशालेंतील सारी व्यवस्था मला पसंत पडली. तथापि शिक्षक म्हणून कांहीं पुरुष तेथें घुसडले जावे हें मला बरें वाटत नाहीं. अशा प्रकारच्या शाळांत शिक्षकाचें काम विधवांनीं आणि ब्रह्मचारिणींनींच केलें पाहिजे. स्त्रियांच्या पाठशालेंत पुरुष शिक्षकांना केव्हांही स्थान मिळूं नये.

**शिष्यः**—पण महाराज, आपल्या देशांत सांप्रत गार्गी, खना, लीलावती अशा विदुषी कोठें उपलब्ध होणार ?

**स्वामीजीः**—अशा प्रकारच्या स्त्रिया आपल्या देशांत मुळींच नाहींत असें तुला वाटतें काय ? सीता आणि सावित्री यांच्या या पवित्र जन्मभूमींत आजमितीसही दानतीनें श्रेष्ठ, मृदु अंतःकरणाच्या आणि समबुद्धीच्या किती

तरी स्त्रिया आढळून येतील. सेवाधर्मांचें रहस्य ज्यांना कळलें आहे आणि ज्या आत्मतृप्त आहेत अशा स्त्रिया हिंदुस्थानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही देशांत मला आढळल्या नाहींत. पाश्चात्य देशांत तर पुष्कळ बायका मला अशा आढळल्या कीं, हे स्त्रीवेषधारी पुरुषच आहेत कीं काय, असाही मला भ्रम पडे. गाड्या हांकणाऱ्या, कचेऱ्यांत खर्डेघांशी करणाऱ्या, शाळामास्तराचें काम करणाऱ्या स्त्रिया म्हणजे नाटकांतील स्त्रीपार्टच नव्हेत काय? स्त्री-स्वभावाला अनुरूप अशी शालीनता आणि मितभाषित्व हे केवळ हिंदुस्त्रियांतच आढळणारे सद्गुण पाहिले, म्हणजे माझे डोळे थंड होतात! अशा उत्तम प्रकारची पूर्व तयारी येथे असतांही त्यांची उन्नति तुम्हांस करतां येऊं नये ही केवढ्या दुःखाची गोष्ट आहे बरें! ज्ञानाचा खरा प्रकाश त्यांच्यापर्यंत पावता करण्याची खटपट तुम्हीं केव्हांच केली नाही. योग्य प्रकारचें शिक्षण त्यांना मिळालें तर आमच्या हिंदु स्त्रिया साऱ्या जगाला आदर्शतुल्य होतील.

**शिष्यः**—महाराज, ज्या रीतीचें शिक्षण माताजी मुलींना सध्या देत आहेत, त्या प्रकारच्या शिक्षणानें आपण म्हणतां तशा आदर्श स्त्रिया निर्माण होतील काय? या विद्यार्थिनी लवकरच विवाहयोग्य होतील; आणि संसारांत पडून इतर सामान्य स्त्रियांच्या मार्गानेंच चालू लागतील. याकरितां अशा स्त्रिया ब्रह्मचारिणी झाल्या, तरच राष्ट्रोद्धाराच्या कार्याला स्वतःस त्या वाहून घेतील असे मला वाटतें. संसारांतून त्या मुक्त राहिल्या तरच आमच्या धर्मग्रंथांत सांगितलेलीं उच्च ध्येयें त्या आचरणांत आणूं शकतील.

**स्वामीजीः**—होय, तुझे म्हणणें योग्य आहे. पण सर्व गोष्टी घडून येण्यास कालांतरही हवेंच. आपल्या मुलींना जन्मभर अविवाहित ठेवूं शकतील असे सुज्ञ पुरुष आपल्या देशांत अद्यापि निर्माण झालेले नाहींत. सामाजिक शासनाची भीति अद्यापि बहुतेकांना वाटते. अरे, मुलगी बारा तेरा वर्षांची झाली नाहीं तोंच तिला कोणाच्या तरी गळ्यांत बांधण्यास लोक किती धडपडतात तें पहा. जग आपणांस हसेल या एकाच भीतीनें अशी गोष्ट करण्यास ते उत्सुक होतात. संमति वयाचा कायदा नुकताच पुढें आला तेव्हां 'तो आम्हांला नको' म्हणून टाहो फोडण्यास सुशिक्षित पुढाऱ्यांनीही लक्षावधि लोकांस एकत्र केलें. इतर देशांत असा कायदा पुढें आला असता तर असली लांछनास्पद गोष्ट आपल्या देशांत अद्यापिही जीव धरून रहावी

या विचाराच्या लाजेनें त्यांनीं आपलीं तोंडें लपविलीं असतीं. घरोघर सभा भरवून त्याचा निषेध त्यांनीं कधींही केला नसता.

**शिष्यः**—पण महाराज, आमच्या पूज्य पूर्वजांनीं जीं हीं सामाजिक बंधनें निर्माण केलीं तीं अगदींच अकारण असूं शकतील काय? त्यांच्या या मनोवृत्तीच्या मागें तसेंच कांहीं रहस्यमय कारण असलें पाहिजे.

**स्वामीजीः**—ठीक, ठीक. पण या रहस्याचें थोडेंसें उद्घाटन कृपा करून कर बरें?

**शिष्यः**—मुलींचीं लग्नें लहानपणीं झालीं म्हणजे सासरचें वळण त्यांना लहानपणापासून लावण्यास ठीक पडतें. नवऱ्याचें कुटुंब त्यांना जन्मतः परकें असतें. तेव्हां त्यांत पूर्णपणें मिसळून जाण्यास त्या घरचे रीतिरिवाज लहानपणापासूनच त्यांना लागले पाहिजेत. सासूसासऱ्यांच्या हाताखालीं सांसारिक शिक्षण लहानपणापासूनच मिळालें म्हणजे त्या सुगृहिणी होतील. उलटपक्षीं मुली माहेरींच घोडनवऱ्या झाल्या म्हणजे त्या भडकण्याचा संभव असतो. मुलींचीं लग्नें लहानपणींच झालीं म्हणजे त्या वांकड्या मार्गाला जाण्याचा संभव उरत नाहीं; आणि सर्वांत विशेष महत्वाची गोष्ट ही कीं, शालीनता, मितभाषित्व, सात्विक धैर्य आणि उद्यमशीलता-या स्त्रीसद्गुणांची वाढ सासरीं जशी होईल तशी ती माहेरीं होणार नाहीं.

**स्वामीजीः**—आतां प्रतिपक्षाला अनुकूल अशाही गोष्टींचा विचार करणें अवश्य आहे. लहानपणीं लग्ने झाल्यानें मुलींना मातृत्व लवकर येतें आणि यामुळें त्या लवकरच मृत्युमुखींही जातात. त्यांच्या संततींत जिवटपणा आधींच बेताबाताचा असल्यामुळें देशांत कर्तृत्वहीनांची आणि भिकाऱ्यांची वाढ होते. आईबापांचीं शरीरेंच जेथें धष्टपुष्ट नाहींत तेथें धष्टपुष्ट मुलें तरी कोठून होणार? मुलींची योग्य वाढ झाली आणि तनुमनानें त्या योग्य संस्कृत झाल्या, म्हणजे त्यांच्या पोटीं होणारी संतती राष्ट्रकार्याला उपयोगीं पडण्याच्या किमतीची असेल. आज प्रत्येक घरांत इतक्या तरुण विधवा आढळून येतात याचें कारण काय? बालविवाह हें एकच कारण आहे. बालविवाहांची संख्या कमी झाली म्हणजे विधवांची संख्याही अवश्यमेव कमी होणार.

**शिष्यः**—पण महाराज, स्त्रियांचीं लग्नें उशिरा झालीं तर गृहकृत्यांकडे त्यांचें मन तितकेंसें राहणार नाहीं असें मला वाटतें. म्हाताऱ्या सासवांनीं चुलीपुढें बसावें आणि त्यांच्या तरुण सुनांनीं पायांना लाक्षारस लावून उगीच पायावर पाय टाकून बसावें असा प्रकार कलकत्त्यांत सररास चालू असल्याचें माझ्या कानीं आलें आहे. आमच्या पूर्व बंगाल्यांत हा प्रकार क्षणभरसुद्धां कोणी चालूं देणार नाहीं.

**स्वामीजीः**—चांगलें आणि वाईट असें मिश्रण जगांतील साऱ्या परिस्थितींत आढळून येतें. जगांतील प्रत्येक समाज स्वतःच्या कलाप्रमाणेंच आपलीं बंधनें निर्माण करीत असतो. याकरितां बालविवाह अथवा पुनर्विवाह इत्यादि गोष्टींत आपण व्यर्थ डोके खुपसूं नये असें मला वाटतें. स्त्रीपुरुषांना खरें शिक्षण देणें इतकेंच आपलें कर्तव्य आहे. त्यांना असें शिक्षण मिळालें म्हणजे आपलें बरेंवाईट कशांत आहे, याचा विचार त्यांचीं तींच करतील. मग त्यांना जें वाईट दिसेल तें तीं आपोआपच टाकून देतील. अशा प्रकारच्या समाजांत कोणतीही गोष्ट जुलमानें रूढ करण्याचें कारण पडणार नाहीं.

**शिष्यः**—स्त्रियांना कोणतें शिक्षण योग्य आहे असें आपणांस वाटतें ?

**स्वामीजीः**—धर्म, कला, भौतिकशास्त्रें, गृहपरिचर्या, पाकक्रिया, शिवणें टिपणें आणि आरोग्याची मूलतत्वें. या विषयांतील साधे मुख्य मुख्य भाग त्यांच्या ध्यानीं आणून द्यावे. नाव्हेलें आणि भलभलत्या कल्पितकथा यांचा स्पर्शही त्यांना होऊं देऊं नये. महाकाली पाठशाला बऱ्याच अशीं योग्य मार्गानें चालली आहे. तथापि पूजेचीं नुसतीं विधिविधानें शिकवून धर्मज्ञानाची परिसमाप्ति होते असें मात्र नव्हे. प्रत्येक बाबींत त्यांची नजर अधिक विस्तृत करून दिली पाहिजे. स्वार्थत्यागाच्या उच्च तत्वाची भक्ति त्यांच्या हृदयांत बाणावी यासाठीं आदर्श चरित्रें त्यांच्या डोळ्यांपुढें सदोदित वावरतीं ठेवलीं पाहिजेत. सीता, सावित्री, दमयंती, लीलावती, खना, मिराबाई इत्यादिकांचीं चरित्रें त्यांना सांगून त्यांतील रहस्य त्यांच्या गळीं उतरविलें पाहिजे. आपणही यांच्या प्रमाणेंच होऊं, अशी तीव्र लालसा त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न केली पाहिजे.

बागबझारांतील बाबू बलराम बोसच्या घराशेजारीं आमची गाडी येऊन पोंचली. स्वामीजी खालीं उतरले आणि बोस बाबूंच्या घरीं गेले.

स्वामीजी तेथें येणार असल्याची वार्ता कांहीं मंडळीस आधींच लागली असल्या-मुळें स्वामीजींच्या दर्शनासाठीं तेथें बरीच गर्दी झाली होती. स्थानापन्न झाल्या-वर महाकाली पाठशाळेच्या भेटीची सर्व हकीगत स्वामीजींनीं सांगितली.

यानंतर नुकत्याच स्थापन झालेल्या रामकृष्ण मिशननें कोणता कार्यक्रम अंगिकारावा याबद्दल वाटाघाट सुरू झाली. ज्ञानदान हें सर्वात श्रेष्ठ कार्य होय, असा स्वामीजींच्या मताचा आशय होता. शिष्याकडे वळून ते म्हणाले, ‘याशिवाय दुसरा मार्गच नाहीं.’ कांहीं मंडळींनीं स्वामीजीच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें नाहीं. तेव्हां स्वामीजी त्यांजकडे वळून म्हणाले, ‘तुम्ही सर्वच प्रह्लाद बनूं नका. प्रल्हादाची कथा तुम्हांला ठाऊक नाहीं काय? ‘क’ एवढें आद्य अक्षर ऐकूनसुद्धां त्याच्या डोळ्यांना पाण्याच्या धारा लागत. मग त्याच्या पुढचीं अक्षरें त्याला आपोआपच दिसेनाशीं होत. ‘क’ या अक्षरानें कृष्णाचें स्मरण त्याला होई. पण प्रल्हादाचे अश्रू म्हणजे डोळे चोळून काढलेलें पाणी नव्हे. त्याच्या हृदयांतील भक्ति अश्रूंच्या रूपानें वाहूं लागे. पण आजच्या भक्तांना डोळ्यांना कांहीं तरी झणझणणारा पदार्थ लावल्याशिवाय अश्रू फुटत नाहींत. हल्लीं पुष्कळसे भक्त याच नमुन्याचे आहेत. स्वामीजीचें भाषण ऐकून सर्व मंडळी मोकळ्या मनानें हंसत सुटली. स्वामी योगानंद म्हणाले, ‘स्वामीजी, अमुक गोष्ट करावी असें तुमच्या चित्तानें एकदां घेतलें म्हणजे तिची अखेर होईपर्यंत तुमच्या चित्तांतून ती दूर व्हावयाची नाहीं. असो; आतां या बाबींतही तुम्ही म्हणतां तसेंच करूं.’

*
* *

[ ९ ]

[ **स्थळः**—कलकत्ता, सन १८९७ ]

गेले दहा दिवस स्वामीजींबरोबर ऋग्वेदावरील सायनाचार्यांची टीका शिष्य वाचीत होता. या वेळीं स्वामीजी बागबझारांतील बाबू बलराम बोस यांच्या घरीं रहात होते. स्वामीजींच्या एका श्रीमंत स्नेह्याच्या खासगी पुस्त-कालयांतून ऋग्वेदावरील मॅक्समूलर यांचे ग्रंथ आम्हीं मागविले होते. शिष्य वाचीत असतां त्याच्या उच्चारांच्या अथवा अर्थांच्या चुका स्वामीजी दुरुस्त करीत; आणि असे प्रसंग पुष्कळच येत. वेद अनादि आहेत हें सिद्ध करण्या-

करितां आचार्यांनीं मांडलेल्या प्रमाणांसंबंधीं चर्चा होई, तेव्हां आचार्यांच्या विलक्षण बुद्धीची तारीफ स्वामीजी करीत. ‘ वेद अनादि आहेत ’ या वचनाचें रहस्य स्वामी सांगूं लागले म्हणजे कित्येक वेळां आचार्यांहून आपलें भिन्न मत ते सांगत; आणि यावेळीं मौजेनें आचार्यांची थट्टाही करीत.

अशा रीतीनें आमचें वाचन कांहीं दिवस चालू असतां एके दिवशीं मॅक्समुल्लर संबंधी चर्चा निघाली, तेव्हां तोच विषय पुढें चालवून स्वामीजी म्हणाले ‘ सायनाचार्यांनीच मॅक्समुल्लरच्या रूपानें पुनः जन्म घेतला आणि आपल्या वेदभाष्याचा पुनरुद्धार केला असेंच मला वाटतें. आज पुष्कळ दिवस ही कल्पना माझ्या डोक्यांत घोळत आहे, आणि खुद्द मॅक्समुल्लर यांची भेट झाल्यानंतर तर माझ्या मनाची खात्रीच झाली. वेदांच्या या जन्मभूमीत सुद्धां वेदवेदांतांत इतका निष्णात गृहस्थ आपणास आढळावयाचा नाहीं. या बाबीत मॅक्समुल्लर यांनी दाखविलेली चिकाटी क्वचितच आढळून येईल. श्रीरामकृष्णांबद्दल तर त्यांच्या मनांत किती अथांग आदर आहे म्हणून सांगूं! श्रीरामकृष्ण खरोखरच अवतारी पुरुष होते असे त्यान वाटतें. त्यांच्या घरीं मी गेलो तेव्हां अत्यत मनःपूर्वक त्यांनी माझे स्वागत केलें. हे वृद्ध आचार्य, आणि त्यांची पत्नी यांचें दर्शन मला झालें, तेव्हां वसिष्ठ आणि अरुंधती यांच्यासमोर मी उभा आहें की काय असे मला वाटलें. त्यांचा निरोप मीं घेतला तेव्हां त्यांचे डोळे खरोखर पाण्यानें डबडबले.

**शिष्यः**—पण सायनाचार्यांनींच पुनः जन्म घेतला तर ते म्लेच्छ कां झाले ? आर्यावर्ताच्या पवित्र भूमीतच ते पुनः कां अवतरले नाहीत ?

**स्वामीजीः**—मी आर्य आणि ते म्लेच्छ ही भावना अज्ञानजन्य आहे. वेदांचें भाष्य ज्यानें केलें, म्हणजे जो स्वतः ज्ञानरूप झाला त्याला वर्ण आणि आश्रम इत्यादि भेद कोठून प्रतीत होणार ? त्याच्या दृष्टीनें हे सारे भेद अर्थशून्य होतात आणि केवळ मनुष्यजातीच्या कल्याणासाठी तो कोठेंही जन्म घेतो. विशेषतः सरस्वती आणि लक्ष्मी या दोहोंचाही एकत्र वास ज्या देशांत नसेल अशा जागी तो जन्म कसा घेईल ? तशा स्थितींत एवढाले ग्रंथ प्रसिद्धीस आणण्याचें काम कसें होईल ? ऋग्वेदाच्या प्रकाशनासाठीं ईस्ट इंडिया कंपनीनें नऊ लाख रुपयांची देणगी दिल्याचें तुला माहीत नाहीं काय ?

आणि तितका पैसाही पुरेसा झाला नाहींच. दरमहाच्या दरमहा मोठाले पगार देऊन शेंकडों पंडित या कामीं कंपनीनें लाविले होते. या देशांत हल्लींच्या युगांत इतकी ज्ञानलालसा तुला कोठें आढळली आहे काय? ज्ञानवृद्धीसाठीं एवढा अफाट खर्च कोणी केला असल्याचें तुझ्या ऐकिवांत आहे काय? नुसतें हस्तलिखित तयार करावयास मॅक्समुल्लर यांस पंचवीस वर्षें लागली असें त्यांनी स्वतःच प्रस्तावनेंत म्हटलें आहे. ते ग्रंथ छापून निघावयास आणखी वीस वर्षांचा काळ लोटला. एकाच ग्रंथाच्या प्रकाशनासाठी एकसारखी पंचेचाळीस वर्षें जिवापाड मेहनत करणें हें सामान्य मनुष्याचें काम नव्हे. या नुसत्या कल्पनेनेंसुद्धां आपलें चित्त थरारून जातें. मग मॅक्समुल्लर म्हणजे सायनाचार्यच हें माझें मत म्हणजे कांही तरी कल्पनाच काय?

यानंतर आमचें वाचन पुढें चालू झालें. वेदांनतर सृष्टीच्या उत्पत्तीस सुरवात झाली, या आपल्या मताला स्वामीजींनी अनेक प्रकारें पुष्टि दिली. ते म्हणाले, 'वेद म्हणजे सनातन तत्त्वांचें समीकरण. ऋषीनीं या तत्त्वांचा अनुभव प्रत्यक्ष घेतला. असा अनुभव माझ्या तुझ्यासारख्या सामान्य मनुष्याला होणें शक्य नाहीं; फक्त इंद्रियातीतांनाच तो होतो. यासाठीच अशा ऋषिवर्यांना मंत्रद्रष्टे असे म्हटलें आहे. ऋषि या शब्दाचा अर्थच मंत्रद्रष्टा असा आहे. गळ्यांत तीन सुतांचें जानवें अडकविणारा प्रत्येक ब्राह्मण कांही ऋषि होऊं शकत नाहीं. हे वर्णभेद वेदकालानंतर अस्तित्वांत आले आहेत. शब्द अथवा ध्वनि यांच्या पाठीमागें जी अमूर्त कल्पना असते, ती कल्पना म्हणजेच वेद. असा कल्पनासमूह म्हणजे वेद. शब्द म्हणजे अमूर्त कल्पनेनें मूर्त रूप घेणें. कल्पांत होऊन सर्व सृष्टि अमूर्तरूपाला परत गेली म्हणजे या कल्पनाही बीजरूप होऊन तिजबरोबर राहतात. मत्स्यावताराबरोबर श्रुती पुनः अवतरल्या या पुराणवचनाचें रहस्य हेंच आहे. या अवताराबरोबर वेद पुनः अवतरले आणि नतर इतर सृष्टि मूर्तरूपास येऊं लागली. याचा अर्थ हाच कीं वेदांत ज्या अनंत कल्पना बीजरूपानें वास करीत होत्या, त्या प्रत्यक्षत्वास येऊं लागल्या. प्रत्येक शब्दांच्या पोटीं कल्पना अमूर्तरूपानें असतेच; आणि अशा रीतीनें ही सारी जड सृष्टि अमूर्तरूपानें शब्दाच्या पोटीं सामावलेली होती. प्रत्येक कल्पारंभीं असाच प्रकार घडून येत असतो. **'सूर्याचंद्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् दिवं च पृथिवीं चान्तरिक्षमथो स्वाहा।'**

हें संध्येंतील सूक्त तुला ठाऊक असेलच. गत कल्पाप्रमाणेंच या कल्पारंभींही धात्यानें सृष्टि निर्माण करण्यास सुरवात केली. माझ्या म्हणण्याचें रहस्य तुझ्या ध्यानांत आलें काय ?

**शिष्यः**—पण महाराज, कांहींतरी दृश्य पदार्थ आधीं असल्याशिवाय त्याला नाम उत्पन्न होत नाही. जेथे कांहीं नामच नाहीं तेथें शब्द अथवा कल्पना हीं तरी कशीं आणि कां यावीं, आणि नामेंतरी कशी ठेवलीं जावीं ?

**स्वामीजीः**—होय; तुझा हा प्रश्न आरंभी फार कठीणसा दिसतो खरा. पण थोडा विचार करून पहा. हें समोरचें मडकें फुटून त्याचा चुरा झाला असें समज. अशा स्थितीत मडक्याच्या आकाराच्या नाशाबरोबर त्याची कल्पनाही नष्ट होते काय ? नाहीं; कारण त्या पात्राचा विशिष्ट आकार म्हणजे जडत्वास आलेली कल्पनाच होय. कुंभाराच्या डोक्यांत अमूर्तरूपानें असलेली कल्पना व्यक्तदशेला आली आणि मडकें दिसू लागलें, म्हणजे त्याचें अस्तित्व आरंभी कल्पना अथवा शब्द हेंच होतें. अशाच रीतीनें पदार्थमात्राचें अस्तित्व अव्यक्तदशेंत कल्पना अथवा शब्द हेंच असतें. ज्या ज्या वस्तू आपण पाहू शकतों, ज्यांबद्दल ऐकतो अथवा ज्यांना स्पर्श करूं शकतो त्या सर्व वस्तु अव्यक्त कल्पनेचीं व्यक्तरूपें होत. कारण आणि काय यांचें वास्तविक रूप असेच आहे. ही सारी चराचर सृष्टि उद्यां नाश पावली तरी तिची स्पष्ट दशा मात्र जाईल आणि ती सूक्ष्मरूपानें ब्रह्माच्या ठिकाणी लीन स्थितीत राहील. ती स्पष्टत्वास येण्याचा काल आला म्हणजे साम्यावस्थेचा भंग होऊन स्पंद निर्माण होऊं लागतात, आणि ही सारी सृष्टी पुन्हा जशीच्या तशीच उद्भवूं लागते. आरंभींच्या स्पंदांतून प्रथम ध्वनी स्पष्टत्वास येतो; आणि याच ध्वनीचें रूपांतर होऊन जड पदार्थ दिसूं लागतात. हा मूळचा कारणशब्द अथवा सृष्टीचें अव्यक्तरूप म्हणजेच वेद. ब्रह्माच्या ठिकाणीं सृष्टीची जी अस्मिता अथवा असणेपणाची जाणीव सूक्ष्मरूपानें असते ती जाणीव म्हणजेच वेद. सायनाचार्यांनीं आपल्या मताची मांडणी अशा प्रकारें केली आहे. त्यांचा आशय आतां तरी तुझ्या ध्यानांत आला ना ?

**शिष्यः**—नाहीं महाराज. हा विषय माझ्या बुद्धीला अजूनही चांगलासा स्पष्ट झाला नाहीं.

**स्वामीजी**:—बरें; विश्वांतलीं सारीं मडकीं उद्यां नाहींशीं झालीं तरी मडकें हा शब्द आणि त्या मागील कल्पना हीं शिल्लक राहतील एवढें तरी तुला आकलन करतां येतें ना? अशाच रीतीनें विश्वांतील पदार्थमात्राचा उद्यां नाश झाला—या साऱ्या आकारांचे नुसते अणुरेणु बनले—तरी त्यांच्या मागील शब्द अथवा कल्पना यांचें अस्तित्व जाणिवेंतून कां जावें? आणि त्याच पूर्वीच्या नमुन्याबरहुकूम साऱ्या वस्तू पुन्हा आकारास कां आणतां येऊं नयेत?

**शिष्यः**—पण महाराज, 'मडकें, मडकें' असा शाब्दिक टाहो आम्हीं कितीही फोडला तरी तेवढयानें मडकें निर्माण होईल काय?

**स्वामीजी**:—नाहीं होणार. मी अथवा तूं अशासारख्यांच्या ओरडीनें मडकें निर्माण होणार नाही हें खरें. पण मूळ ध्वनी जेथून निर्माण होतो ती शक्ति तुझ्या माझ्यासारखी लेचीपेची नाही. ब्रह्माचें सृष्टिसामर्थ्य पूर्ण आहे. तेथें कल्पनेचा उद्भव आणि तिचा दृश्य आकार यांची प्रतीति ताबडतोब होते. अरे, केवळ साधकसुद्धां आपल्या नुसत्या इच्छाशक्तीनें सामान्यांच्या शक्तीबाहेरच्या घटना घडवून आणतात हें आपण पहातोंच. मग पूर्ण-ब्रह्माच्या इच्छाशक्तीबद्दल बोलणेंच कशाला? सृष्टीच्या आरंभीं ब्रह्म शब्द-रूपानें व्यक्तदशेस येतें. या शब्दाचें रूपांतर नाद अथवा ॐ या ध्वनींत होतें. यानंतर पूर्वकल्पांतील शब्द अथवा कल्पना उद्भवूं लागतात. भूः, भुवः, स्वः, महः, गाय, मनुष्य इत्यादि प्रकारच्या कल्पनांचा अथवा शब्दांचा उद्भव ॐ या ध्वनीमधून होऊं लागतो. ब्रह्माच्या ठिकाणीं या कल्पना उद्भवूं लागल्याबरोबर त्यांचीं दर्शक अशीं विशिष्ट जडरूपें प्रतीत होऊं लागतात. कारण ब्रह्म संपूर्ण सामर्थ्यवान् असल्यामुळें अमूर्त कल्पनांचा उद्भव आणि त्यांची दृश्यरूपें एकाच काळी स्पष्टत्वास येतात. अशा रीतीनें हळूहळू अनंत वस्तूंचें विश्व स्पष्ट होत जातें. शब्दांतून सारी सृष्टि कशी निर्माण होते हें तुला आतां तरी समजलेंना?

**शिष्यः**—महाराज, आपल्या सिद्धांताची कांहींशी कल्पना मला आली. तथापि मनाची पुरती समजूत झाली नाहीं.

**स्वामीजी**:—अरे, अनुभवाशिवाय स्पष्ट समजूत व्हावयाची नाहीं; आणि अनुभव होणें ही कांहीं चेष्टेची गोष्ट नव्हे. मन ब्रह्मानुभवाच्या मार्गावर आरूढ होऊं लागलें म्हणजे या साऱ्या पायऱ्या त्याला ओलांडाव्या

लागतात. त्या ओलांडल्यानंतरच निर्विकल्पावस्थेला तें पोंचतें. विश्व म्हणजे कल्पनांचा एक गोळा आहे, असा अनुभव समाधीच्या पहिल्या अवस्थेंत येतो. यानंतर हा गोळाही विरळ होत होत अखेरीस ॐ या गंभीर ध्वनीत तो अंतर्धान पावतो. पुढें तो ध्वनीही विरून जातो. येथे मन शून्यावस्थेंत असतें. अस्तित्व आणि नास्तित्व यांच्या संधींत तें स्थित होतें. अनंत नादाचा अनुभव येथे होतो. यानंतर मनाचें मनपण जाऊन तें शुद्ध ब्रह्मांत विलीन होतें. ॐ शांतिः ।

स्वामीजी स्तब्ध झाले आणि शिष्यही मुग्ध होऊन बसला. स्वामीजी अनुभवी पुरुष असल्यामुळेंच ही गोष्ट त्यांना इतक्या सरळपणानें सांगतां आली. मनुष्य कितीही बुद्धिमान् झाला तरी अनुभवावांचून सारी बुद्धि पंगूच असते. अनुभवावांचून सारें व्यर्थ !

स्वामीजींनीं आपल्या विषयास पुढें सुरवात केली. 'अवतारी पुरुष निर्विकल्पावस्थेंतून 'अहं' आणि 'मम' यांच्या साम्राज्यांत परत येऊं लागले म्हणजे नादब्रह्माचा अनुभव त्यांना प्रथम होतो. त्यांतून पुढें ॐ हा ध्वनि स्पष्ट होतो. त्याचें रूपांतर पुढें ॐकारांत होतें; आणि अखेरीस जड विश्व प्रतीत होऊं लागतें. पण सामान्य वर्गात जे साधक निर्माण होतात ते दीर्घाभ्यासानें नादब्रह्मापलीकडे पोंचतात. तेथें त्यांना ब्रह्मानुभव झाला म्हणजे इंद्रियांच्या साम्राज्यांत परत न येतां ते क्षीरनीरवत् ब्रह्माशीं एकत्व पावतात.'

आमचें संभाषण अशा रीतीनें चालू असतां प्रख्यात नाटककार बाबू गिरीशचंद्र घोष तेथें येऊन पोंचले. स्वामीजींनीं आदरपूर्वक त्यांचा सत्कार केला आणि शिष्याशीं ते पुनः बोलूं लागले.

'शब्दांत दोन भेद आहेत. वैदिक शब्द आणि लौकिक शब्द. शब्दशक्तिप्रकाशिका नांवाच्या न्यायग्रंथांत ही माहिती मला मिळाली. शब्दाच्या म्हणजे वेचाराच्या मार्गे केवढें सामर्थ्य असतें, हें या ग्रंथांत स्पष्ट करून सांगितलें आहे. पण त्या ग्रंथाची परिभाषा म्हणजे बिकट कांटेरी अरण्यच. मनुष्य एकवार त्यांत गुरफटला कीं बाहेर पडण्याची मारामार. त्या शब्दजालानें वाचकाचा मेंदु अधिकाधिक मुग्ध मात्र होत जातो.'

गिरीशबाबूकडे वळून स्वामीजी म्हणाले, कां बाबूसाहेब, आपलें काय मत आहे ? या विषयांत शिरून डोकेंफोड करण्याची तादृश गरज तुम्हाला

भासली नाहीं. देवदेवतांतरांची पूजा करून मौजेनें दिवस काढण्यांत तुमचें चित्त रमलें आहे.

**गिरीशबाबूः**—मी अभ्यास कशाचा करणार ? एक तर मला वेळ नाहीं; आणि दुसरें असें कीं, असल्या विषयांत शिरण्याइतकी कुशाग्र बुद्धिही मजपाशीं नाहीं. पण श्रीरामकृष्णांच्या कृपेनें तुमच्या वेदवेदांतांना जातां जातां नमस्कार करून मी एकदमच पलीकडे उडी मारीन. अहो, या साऱ्या कटकटी तुमच्या डोक्यांत भरविण्यांत भगवानांचा विशिष्ट हेतु होता. तुमच्या हातून पुष्कळ कार्य त्यांना करून घ्यावयाचें आहे. आमच्याकडे कांहीं कार्यभागही नाहीं आणि यामुळें आम्हांला या वस्तूंची जरूरही नाही.

बोलतां बोलतां स्वामीजीजवळ पडलेल्या वेदग्रथावर डोकें टेंकून गिरीशबाबू म्हणाले, ‘ वेदरूप श्रीरामकृष्णांचा विजय असो. ’

गिरीशबाबू बोलत असतां स्वामीजी चांगलेसे भानावर होतेसें दिसलें नाही. गिरीशबाबू थांबले तरी स्वामीजी अगदी स्तब्धच. अखेरीस त्यांना हालवून गिरीश बाबू म्हणाले, ‘ स्वामी महाराज, माझी एक गोष्ट ऐका पाहूं. वेदवेदांगांचा इतका अभ्यास तुम्ही केला, पण त्यांत आपल्या सांप्रतच्या स्थितीतून बाहेर पडण्यास कांही उपाय तुम्हांला सांपडला काय ? देशभर रडारड सुरू आहे, नाना आपत्ती लोकांवर कोसळल्या आहेत, अन्नावांचून माणसें तडफडत आहेत, जिकडे तिकडे अधर्म पिसाळून कली मातला आहे, व्यभिचार आणि पापे थैमान घालीत आहेत. ही स्थिती नाहीशी करण्याचा कांहीं मार्ग तुम्हांला दिसतो का ? ’

अशा रीतीनें आणखी कांहीं वेळ बोलत राहून सांप्रतच्या समाजस्थितीचें चित्र गिरीशबाबूंनी अगदीं भेसुर रंगांत काढून दाखविलें. तथापि स्वामीजींच्या स्तब्धावस्थेचा भंग झाला नाहीं. त्यांची शांति यत्किंचितही ढळली नाहीं. तथापि त्यांच्या डोळ्यांत अश्रु मात्र दिसत होते. अखेरीस त्यांचा ओघ आमच्या नजरेस पडूं नये म्हणून स्वामीजी उठले आणि खोलीबाहेर तडक चालते झाले.

स्वामीजी उठून जातांच गिरीशबाबू शिष्याकडे वळून म्हणाले, ‘ स्वामीजींचें अंतःकरण किती मृदु आणि प्रेमळ आहे, पाहिलेंत ? ते वेदवेदांतज्ञ पंडित

आहेत एवढयाचसाठीं त्यांजबद्दल मला आदर वाटत नाही, पण परदुःखें ऐकूनच त्यांचें अंतःकरण विरघळतें म्हणून माझ्या मनांत त्यांच्याबद्दल पूज्य भाव आहे.

यानंतर गिरीशबाबू आणि शिष्य यांजमध्यें थोडा वेळ संभाषण सुरू झालें. ज्ञान आणि भक्ति यांचें अंतिम स्वरूप एकच आहे असा बाबूमहाशयांच्या म्हणण्याचा गोषवारा होता.

इतक्यांत स्वामीजी परत आले आणि शिष्याला म्हणाले, 'तुमच्या वादाचा विषय काय होता?' शिष्यानें उत्तर दिलें, 'महाराज, ज्ञान आणि भक्ति यांजबद्दल आम्ही बोलत होतों. श्रुतिग्रंथांचा अभ्यास गिरीशबाबूंनी केला नसला तरी अंतिम तत्त्वें त्यांना स्पष्ट समजली आहेत, हें खरोखर मोठें नवल आहे.'

**स्वामीजीः**—गुरूच्या ठिकाणी ज्याची खरी श्रद्धा असेल त्याजपुढें तत्त्वें आपण होऊन उभी रहातात. गुरुभक्तांना बौद्धिक अभ्यासाची गरज नाहीं. पण इतकी दृढ श्रद्धा जगांत क्वचितच आढळते. गिरीशबाबूंसारखी दृढ श्रद्धा ज्यांना असेल त्यांना शास्त्रांची काय गरज आहे? पण ही श्रद्धा दिखाऊ मात्र असतां उपयोगी नाही. श्रद्धेचें नाटक केल्यानें नाश मात्र हटकून होईल. यासाठीं गिरीशबाबू सांगतील तें ऐकून घ्यावें. पण ते करतील तसें करू मात्र नये.

**शिष्यः**—महाराज, आपली आज्ञा मला मान्य आहे.

**स्वामीजीः**—आज्ञा मान्य म्हणून नुसतें डोकें हालविण्यांत फायदा नाहीं. माझ्या शब्दांचें रहस्य तूं लक्षांत घे. प्रत्येक शब्दाला उगीच मान हालविणें यासारखें दुसरें मूर्खपण नाहीं. ज्याबद्दल बुद्धीची पुरी खात्री पटेल तेवढयालाच होय म्हणावें. या बाबतींत श्रीरामकृष्णही फार दृढ असत. 'तुला पटलें नाहीं तर उगीच मान हलवूं नको,' असें ते वारंवार मला बजावीत. शुद्ध तत्त्वविचारसरणीनें मान्य केलेले सिद्धांत आणि श्रुति यांच्या आधारानें आपण आपल्याच मार्गानें पुढें चालत असावें. आपल्या बुद्धीला सत्य म्हणून जें पटलें तेंच निश्चयानें आचरणांत आणावें. दुसऱ्याच्या मार्गानें केव्हांही जाऊं नये. अशा रीतीनें स्वावलंबनाची आणि स्वतः विचार करण्याची संवय तुझ्या बुद्धीला लागली म्हणजे ती कालेंकरून निवळत जाईल. ती पूर्ण निवळली

म्हणजे प्रकाशाचें स्पष्ट परिवर्तन तेथें उमटेल. माझा आशय तुझ्या ध्यानांत आला ना ?

**शिष्यः**—होय, महाराज. आपलें म्हणणें मी समजलों. पण निरनिराळ्या माणसांचे निरनिराळे विचार ऐकले म्हणजे डोक्यांत गोंधळ उत्पन्न होतो. आतांच गिरीशबाबू मला म्हणाले, 'अरे, इतके ग्रंथ वाचून तूं काय करणार ? असल्या वाचनाचा उपयोग तरी काय ?' आणि आतां आपण म्हणतां 'वाच, आणि वाचशील त्यावर दीर्घ विचार कर.' अशा स्थितीत खरोखर मीं काय करावें, हेंच मला समजत नाही.

**स्वामीजीः**—बेट्या, दोघांचेंही म्हणणें बरोबर आहे. फरक इतकाच कीं, दोघांचा दृष्टिकोन वेगळा आहे. या दृष्टिभेदामुळें एकच वस्तु दोन स्वरूपांनीं दिसते. साधकाला त्याच्या मार्गांत एक स्थिति अवश्य प्राप्त होत असते. तेथें सर्व भाषा बंद झालेली असते. तेथें बुद्धि मूक होऊन बसते. '**मूकास्वादनवत्।**' मुक्या मनुष्यानें एखाद्या रसाचें सेवन करावें, पण त्याबद्दल कांहीं बोलूं नये असा प्रकार साधकाचाही होत असतो. साधनाचा हा एक मार्ग झाला. दुसरा मार्ग बौद्धिक श्रमांचा आहे. उपनिषदादि प्रस्थानत्रयीचा दृढ व्यासंग आणि बुद्धिवंतांशीं संभाषण अशा मार्गानेंही सत्यानुभव होतो. तुझा मार्ग असा आहे. याकरितां त्याच मार्गानें तुला गेलें पाहिजे. तुझ्या ध्यानांत आलें ना ?

स्वामीजींचें हें भाषण ऐकून शिष्य मनांतल्या मनांत फुरफुरला. गिरीशबाबूंच्या मतावर पाणी पडलें असें त्याला वाटलें. बाबूमहाशयांकडे वळून तो म्हणाला, 'पाहिलेंत बाबूसाहेब, वेदवेदांतांचा अभ्यास तूं कर असें स्वामीजी मला निक्षून सांगत आहेत.' यावर गिरीशबाबू म्हणाले, 'तुला तोच मार्ग उचित असेल म्हणून स्वामीजीनी तसें सांगितलें. त्यांच्या आशीर्वादानें त्याच मार्गानें तुला आत्मलाभ घडेल.'

इतक्यांत स्वामी सदानंद तेथें येऊन पोंचले. तेव्हां स्वामीजी त्यांना म्हणाले, 'गिरीशबाबूंनीं आपल्या देशस्थितीचें जें शब्दचित्र आतांच रंगविलें, त्यानें माझा जीव अगदीं खालींवर करून सोडला आहे. या बाबींत तुम्हांला कांहींच करतां येण्यासारखें नाही काय ?'

**सदानंदः**—महाराज, आज्ञा व्हावी. बंदा तयार आहे.

**स्वामीजी:**—एक लहानसा परिचर्या मठ सुरू करावा. कोणाही पीडिताला तेथें आश्रय मिळावा. रोगग्रस्तांची शुश्रूषा तेथें व्हावी. निराश्रितांना तेथें आधार मिळावा. ज्यांना सगेसोयरे कोणी नाहीत त्यांचे इष्टमित्र तुम्ही व्हा आणि मनोभावानें त्यांची सेवा करा. कोणाचीही जातगोत पाहूं नका. धर्मभेद अथवा लिंगभेद मनांत आणूं नका.

**सदानंद:**—आपल्या आज्ञेप्रमाणें चालण्याची आमची तयारी आहे.

**स्वामीजी:**—जिवंत देवांची सेवा करण्याहून अधिक मोठा असा दुसरा धर्म नाहीं. त्यांतील रहस्य ध्यानांत आणून तो धर्म तुम्ही मनःपूर्वक पाळला तर '**मुक्तिः करतलायते**' असें मी तुम्हांस निश्चयानें सांगतों. मुक्ति आपल्या तळहातावर तुम्ही उभी कराल.

नंतर गिरीशबाबूंकडे वळून स्वामीजी म्हणाले, 'जगाचीं दुःखें नाहींशीं करण्याकरितां हजार जन्म घ्यावे लागले तरी ते मी खचित घेईन. माझ्या तशा करण्यानें एका जीवाचें थोडेंसें दुःख जरी कमी झालें तरीही मला आनंद होईल. केवळ स्वतःच्या मुक्तीसाठी खटपट करणें यांत काय महत्त्व आहे? हजारों जीवांना आपल्याबरोबर घेऊन जाण्यांत मौज आहे. असल्या गोष्टी माझ्या मनांत कां येतात, याचा उलगडा मला होत नाहीं. बाबूसाहेब, तुम्ही तरी मला याचें उत्तर द्या.

**गिरीशबाबू:**—अहो, या मार्गांत तुम्ही श्रेष्ठतम आहां असें परमहंस म्हणत तें याचसाठीं.

एवढें बोलून गिरीश बाबूंनीं आमची रजा घेतली आणि आपल्या कामाला ते निघून गेले.

*
* *

## [ १० ]

[ **स्थळ:**—आलंबझार मठ, १८९७. ]

स्वामी कलकत्त्यांत प्रथमच आले तेव्हां उत्साही तरुणांना संन्यासधर्माचा उपदेश ते करीत. या आश्रमाचीं अत्युच्च ध्येयें त्यांना ते नेहमीं कथन करीत. संन्यास घेण्याची कोणाची तयारी त्यांना दिसली, तर स्वामीजींना मोठा आनंद होत असे; आणि अशा तरुणांना सर्व प्रकारें ते उत्तेजन देत. स्वामीजींच्या

या उत्तेजनानें कांहीं श्रीमंत उत्साही तरुण सर्वसंगपरित्यागी बनले. आपल्या संपत्तीवर लाथ मारून आणि आप्तेष्टांस झुगारून देऊन स्वामीजींकडून त्यांनीं दीक्षा घेतली. पहिल्या चार शिष्यांचा दीक्षाविधि आलंबझार मठांत झाला. त्या दिवशीं प्रस्तुत शिष्य तेथें हजर होता.

या तरुणांपैकीं एकाच्या वर्तणुकीबद्दल इतर मठस्थ मंडळींचें मत चांगलेंसें नव्हतें. त्याला दीक्षा देऊं नये असें स्वामीजींच्या कांहीं गुरुबंधूंचें म्हणणें पडलें. त्यावर स्वामीजीनीं उत्तर दिलें, 'अरे, एखाद्याच्या पापाचा जड भार आपल्या डोक्यावर घेण्यास आमच्यासारख्यांनीं मागेंपुढें पाहिलें, तर अशा दुःखितांची वास्तपुस्त जगांत दुसरें कोण करणार ? छे, छे ! या बाबतींत तुमचें म्हणणें मी मुळींच ऐकणार नाहीं. पुण्यवंतांना आपली काय जरूर आहे ?' अखेरीस स्वामींचें म्हणणें सर्वांना मान्य करावें लागलें. ते निराश्रितांचें आश्रयस्थान होते. पाप्यांतील पाप्यावरही त्यांचें मोठें प्रेम होतें; आणि याच प्रेमानें प्रेरित होऊन त्या गृहस्थाला त्यांनीं संन्यासदीक्षा दिली.

शिष्य या प्रसंगीं मठांत दोन दिवस होता. दुसऱ्या दिवशीं स्वामीजी त्याला म्हणाले, 'अरे, तूं उपाध्याय आहेस. लोकांकडून श्राद्धतर्पणादि क्रिया करविणें हें तुझें काम आहे. याकरितां आज या मंडळीकडून श्राद्धविधि करवून घे. आपलीं पोथ्यापुस्तकें प्रथम नीट पाहून घे. नाहीतर आयत्या वेळीं धांदल करशील. स्वामीजीची आज्ञा शिष्यानें शिरसा मान्य केली आणि तो विधि त्या दिवशीं पार पाडला.

नंतर संन्यासधर्माचा आचार कसा असावा, याचा उपदेश स्वामीजींनीं सर्वांस केला. त्यांनीं सांगितलेल्या आचाराचें काठिण्य मनांत येऊन प्रस्तुत शिष्य बराचसा गडबडला. त्याचें गोरेंमोरें तोंड पाहून स्वामीजींनीं त्याची मनःस्थिति ओळखली आणि त्याला म्हटलें, 'या साऱ्या गोष्टी ऐकून तूं भयानें भांबावल्यासारखा दिसतोस, खरें ना ?' शिष्यानें 'होय' असें उत्तर दिलें. तेव्हां स्वामीजी पुढें म्हणाले, 'आजपासून हे चौघेजण जगाला मेले. लौकिकाशीं त्यांचा संबंध उरला नाहीं. त्यांना आतां नवे देह, नवे विचार, आणि नवीं वस्त्रें यांची प्राप्ति झाली. '**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः**' हेंच त्यांच्या पुढील आयुष्याचें ध्येय.'

दीक्षाविधी झाल्यानंतर त्या चार ब्रह्मचाऱ्यांनीं स्वामीजींच्या पायांवर मस्तक ठेवलें. त्यांना योग्य आशीर्वाद देऊन स्वामीजी म्हणाले, ' मनुष्याच्या आयुष्यांत प्राप्त होऊं शकणाऱ्या अत्युच्च स्थितीत तुम्ही आज प्रवेश केला आहे. असें करण्यास लागणारें अनुपम धैर्य तुमच्या अंगीं आहे, त्या अर्थी तुमचा जन्म धन्य! तुमचें कुल धन्य! ' **कुलं पवित्रं जननी कृतार्था** ' असेंच महत्कृत्य तुम्हीं आज केलें. तुमचें सारें कुल आज उद्धरलें आहे !'

संध्याकाळच्या भोजनानंतर संन्याशाच्या आश्रमधर्मांची बरीचशी चर्चा स्वामीजींनीं केली. ते म्हणाले, ' संन्याशाची ध्येयें दोन असलीं पाहिजेत. ' **आत्मनो मोक्षार्थं जगद्धिताय च** । ' स्वतःच्या मोक्षासाठीं व त्याचप्रमाणें जगाच्या हितासाठीं ही दीक्षा आपण घेतली आहे, हें त्यानें नित्य ध्यानांत ठेवलें पाहिजे. अंगीं पूर्ण संन्यास बाणल्यावांचून कोणीही ब्रह्मनिष्ठ होऊं शकत नाहीं. वेदवेदांतानें हेंच सांगितलें आहे. 'आम्ही जगांत राहूं, संसार करूं, भोग भोगूं आणि ब्रह्मनिष्ठही होऊं ' असें कोणी म्हणत असेल, तर त्याजकडे तुम्ही मुळींच लक्ष देऊं नका. असे लोक वस्तुतः संसारांत गुरफटलेले असून त्यांची भोगतृष्णाही अनिवार असते. ते इंद्रियसुखांच्या मागें लागलेले असतात आणि तोंडानें मोठालीं वचनें बोलून आपलें समाधान करून घेत असतात. लौकिक सुखाची अगदीं पुसटशीही आशा ज्याच्या चित्तांत राहिली असेल, त्याला संन्यासाचें नुसतें नांव ऐकूनच कांपरें भरतें. भोगतृष्णा त्याचे पाय मागें ओढीत असते आणि लोकांनीं मोठें म्हणावें ही इच्छाही शिल्लक असते. आपल्या धर्मज्ञानाचा आव कायम रहावा म्हणून असे लोक भोग आणि त्याग असल्या अशक्य संयोगांचीं खुळें उभीं करीत असतात. या दोहोंचा संयोग करणें, हाच आमचा धर्म असें ते म्हणतात. शुद्ध वेडप्यांची ही बडबड आहे, हें तुम्ही ध्यानांत ठेवा. ज्यांचें मन ठिकाणावर नाहीं तेच असल्या अशक्य गोष्टी बोलतात. असली बडबड बुडबुड्या इतकीच भरींव आहे. तिला श्रुतींचा आधार नाहीं, अनुभवाचा नाहीं, आणि आप्तवाक्याचाही नाहीं. त्यागाशिवाय मोक्ष नाहीं, हा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे. त्यागाशिवाय भक्तिमार्गही शक्य नाहीं. ' **नान्यः पंथा विद्यते अयनाय** । ' '**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः** । ' हें गीतावाक्य तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा.

संसारदुःखांची शृंखला तोडून टाकिल्याशिवाय कोणालाही मुक्ति प्राप्त व्हावयाची नाहीं. संसारबंधनें तोडण्याची इच्छा कोणाला होत नाहीं, यावरू-

नच कोणत्याना कोणत्या लालसेचा तो गुलाम बनलेला आहे हें सिद्ध होतें. त्या इच्छेनें त्याचे हातपाय पक्के जखडून बांधलेले असतात. तसें नसेल तर संसाराला तो इतका घट्ट चिकटून कां बसेल ? कोणी स्त्रीविषयक सुखाच्या मागें लागलेला असतो, तर कोणी पैशाचा दास बनलेला असतो. कोणाला कीर्तीची हौस, तर कोणाला पंडित म्हणवून घेण्याची लालसा ! या सगळ्या पाशांतून स्वतःला जो कोणी सोडवून घेईल, तोच मुक्तीच्या मार्गानें चालूं लागेल. कोणी कितीही मोठ्यानें बडबड केली, तरी हे सगळे लौकिक पाश पूर्णपणें तोडून टाकल्याशिवाय आणि संन्यास धारण केल्याशिवाय कोणीही मुक्ति पावणें शक्य नाहीं, अशी माझी पक्की खात्री झाली आहे. संन्यासाशिवाय ब्रह्मज्ञानाची प्राप्ति अशक्य आहे.

**शिष्यः**—महाराज, नुसतें भगवें नेसल्यानें अखेरचें साध्य मिळेल, असा आपल्या म्हणण्याचा आशय आहे काय ?

**स्वामीजीः**—साध्य सिद्ध होईल कीं नाहीं, हा प्रस्तुतचा प्रश्न नाहीं. माझा मुद्दा इतकाच कीं संसारचक्रांतून बाहेर पडल्याशिवाय आणि विषयतृष्णा सोडल्याशिवाय भक्ति अथवा मुक्ति यांपैकीं कशाचीच प्राप्ति व्हावयाची नाहीं. ब्रह्मज्ञाला मोठालीं सांसारिक सुखेंही तुच्छ असतात. अष्टसिद्धीही त्याला पोरखेळासारख्या वाटतात.

**शिष्यः**—महाराज, संन्यासग्रहणाला कांहीं विशिष्ट कालाची आवश्यकता आहे काय ?

**स्वामीजीः**—श्रुतींनीं कोणतीही कालमर्यादा निश्चित केली नाहीं. '**यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत् ।**' चित्ताला विरक्ति प्राप्त होण्याबरोबर संन्यास घ्यावा, असें श्रुतिवचन आहे. '**युवैव धर्मशीलः स्यात् अनित्यं खलु जीवितम् । को हि जानाति कस्याद्य मृत्युकालो भविष्यति ॥**' असें योगवासिष्ठांत वचन आहे. शास्त्रांनीं चार प्रकारचे संन्यास सांगितले आहेत. विद्वत्, विविदिषा, मर्कट व आतुर. एकाएकीं विरक्ति प्राप्त होणें आणि तिजमुळें संसारबंधनांतून बाहेर पडणें ही गोष्ट सहसा घडत नाहीं. असें होण्यास जन्मांतरींचे बलिष्ठ संस्कार पाहिजेत. याला विद्वत्संन्यास असें म्हणतात. आत्मज्ञान व्हावें अशी दृढ इच्छा होणें आणि तिच्या तृप्तीकरितां

श्रुतिग्रंथांचा व्यासंग करण्याकरितां इतर बंधनें तोडण्याची इच्छा होऊन संन्यास घेणें याचें नांव विविदिषा. जगांत जिकडे तिकडे धक्के चपेटे खाल्लयामुळें संसाराचा कंटाळा येऊन संन्यास ग्रहण करणें याचें नांव मर्कट संन्यास. आप्तेष्टांचे मृत्यु, धननाश इत्यादि गोष्टींनीं मनुष्याला संसार नकोसा होतो, पण त्याला वस्तुतः विरक्ति आलेली नसते; यामुळें त्याची संसारत्यागाची इच्छा फार काळ टिकून रहात नाहीं. 'अशा प्रकारची त्रागयाची बुद्धि आली म्हणजे बायकापोरें टाकून मनुष्य दुसऱ्या गांवीं पळून जातो आणि तेथें पोटाची थोडीबहुत तरतूद होतांच बायकापोरांना आणवितो अथवा नवें लग्न करितो, असें परमहंसदेव म्हणत असत. अशा प्रकारच्या वैतागाच्या भरांत घेतलेला संन्यास तो मर्कट संन्यास. मरणाच्या दारीं पडलेल्या मनुष्याला दिलेला संन्यास तो आतुरसंन्यास. अशा स्थितीत संन्यस्त झालेला मनुष्य त्या दुखण्यांतून बरा झाला, तर त्याला संसारांत पुनः परत जातां येत नाहीं. आपलें बाकी आयुष्य त्याला त्याच आश्रमांत कंठावें लागतें. तुझ्या चुलत्याला स्वामी शिवानंदांनीं अशीच दीक्षा दिली होती. तुझा चुलता मृत झाला, पण त्याची दीक्षा झाली असल्यामुळें त्याचा जन्म अधिक उच्च स्थितींत होईल. आत्मज्ञानाला संन्यासाशिवाय गत्यंतर नाहीं हें तूं पक्कें लक्षांत ठेव.

**शिष्यः**—महाराज, तर मग गृहस्थाश्रम्यांची वाट काय ?

**स्वामीजीः**—अरे, तेही सत्कर्में करीत राहिले तर पुढल्या कोणत्या तरी जन्मीं त्यांना वैराग्य प्राप्त होईल; आणि वैराग्यप्राप्तीबरोबरच दुःखनाशही होईल. हा भवसागर अनुल्लंघ्यसा दिसतो, पण ज्यांना वैराग्य प्राप्त झालें, त्यांना याच थडीला तो नाहींसा होतो. असो; तथापि असा नियम असला तरी त्याला अपवाद असतातच. गृहस्थाचा आश्रमधर्म संभाळून पूर्ण मुक्तावस्थेला पोंहोंचलेला असा नागमहाशयांसारखा एखादा प्राणी आढळतो.

**शिष्यः**—महाराज, वैराग्य आणि संन्यास यांजबद्दल उपनिषदांचीसुद्धां इतकी स्पष्ट उक्ति कोठें आढळत नाहीं.

**स्वामीजीः**—किती खुळ्यासारखें बोलतोस ? वैराग्य हा उपनिषद्ग्रंथांचा गाभा आहे. नित्यानित्य विवेक आणि त्यापासून स्वभावतः उपजणारें वैराग्य हेंच साऱ्या उपनिषद्ग्रंथांचें सार आहे. तथापि बुद्धकालानंतर वैराग्याची महती आपल्या देशांत फार वाढली असा माझा समज आहे. नैष्ठिक ब्रह्मचर्य

आणि भोग्य विषयांचा त्याग, हाच धर्मानुभवाचा मार्ग आहे, ही गोष्ट बुद्धानंतर विशेषेंकरून पुढें आली. बौद्धांच्या या मताचा अंगीकार हिंदुधर्मानें केला. बुद्धाएवढा त्यागी पुरुष या जगांत दुसरा झालाच नाहीं.

**शिष्यः**—तर मग बुद्धापूर्वी आपल्या देशांत त्यागबुद्धि नव्हती आणि चतुर्थाश्रमीही फार करून कोणी नव्हता, असा आपल्या म्हणण्याचा आशय आहे काय ?

**स्वामीजीः**—असें कोण म्हणतो ? चतुर्थाश्रम त्या वेळींही अस्तित्वांत होताच; पण मानवी जीविताचें अंतिम साध्य तेंच आहे, असे सामान्य जनांनीं जाणलें नव्हतें. अखेरीस आपणांस वैराग्य साधावयाचें आहे, अशी स्पष्ट जाणीव फार करून कोणाला नव्हती. नित्यानित्यविवेकाचें पर्यवसान तेथेंच झालें पाहिजे, असें त्यांच्या बुद्धीला दृढतेनें पटलेलें नव्हतें. योगी आणि साधु म्हणविणाऱ्या इतक्या लोकांकडे बुद्ध गेला, तथापि त्याला शांति मिळाली नाहीं याचें कारण हेंच. अखेरीस तिच्या प्राप्तीसाठीं स्वतःच कंबर बांधण्याचा त्यानें निश्चय केला. यापुढें भटकावयाचें त्यानें सोडून दिलें. '**इहासने ्यतु मे शरीरं**' हा देह येथेंच वाळून गेला तरी मी प्रकाशवंत होईपर्यंत येथून हलणार नाहीं, असें म्हणून तो त्याच जागीं बसला. सध्या हिंदुस्थानांत अनेक पंथांचे जे मठ ठिकठिकाणीं आढळतात, ते पूर्वी बौद्ध भिक्षूंच्या ताब्यांत होते. हिंदूंनीं ते बळकावले आणि मग आपल्या मर्जीप्रमाणें त्यांचें रूपांतर त्यांनीं केलें. संन्यास हा आश्रम बुद्धानेंच चालू केला असें म्हणावयास हरकत नाहीं. हा आश्रम मृत झाला होता, पण बुद्धानें त्याचा पुनरुद्धार केला.

स्वामीजींचे गुरुबंधु स्वामी रामकृष्णानंद म्हणाले, 'पण स्मृति आणि पुराणें यांवरून चारी आश्रमांना फार प्राचीनकाळापासून अस्तित्व होतें, असें स्पष्ट दिसतें. तेव्हां बुद्ध जन्मालाही आले नव्हते.' स्वामीजी म्हणाले, 'बहुतेक पुराणें, मनु आणि इतरांच्या स्मृति आणि त्याचप्रमाणें महाभारताचा बराचसा भाग हीं बुद्धकालानंतर रचलीं गेलीं आहेत. भगवान् बुद्धाचा जन्म त्यांच्या आधीं पुष्कळ वर्षें होऊन गेला.' स्वामी रामकृष्णानंद म्हणाले, 'आपली ही कल्पना खरी मानली तर वेद, उपनिषदें, स्मृति, पुराणें इत्यादिकांत बुद्धाबद्दल उल्लेख आढळले असते. बौद्धमतांची कांहीं तरी चर्चा तेथें आढळली असती. पण

अशा गोष्टींचा तेथे मागमूसही नाहीं. मग बुद्ध यापूर्वी होऊन गेला असें आपण कसें म्हणतां? आतां कांही पुराणांतून बौद्धमतांचा उल्लेख अंशतः आढळतो हें खरें, पण एवढयावरून ही पुराणें बुद्धकालानतर लिहिलीं गेलीं, एवढेंच फार तर म्हणतां येईल. पण हिंदूंच्या श्रुती, स्मृती, आणि सारीं पुराणें बुद्धकालानंतरच झाली असे कधींच म्हणतां येणार नाहीं.

**स्वामीजीः**—कृपा करून इतिहास तर वाचून पहा. हिंदु धर्माला इतकी उच्चावस्था प्राप्त झाली, याचें कारण बौद्ध मत आपलेंसें करून त्यानें पूर्ण पचवून टाकलें हेंच होय. [ स्वामीजींचें हें मत यानंतर बदललें होतें. ]

**रामकृष्णानंदः**—ही सारी तत्त्वें आरंभी हिंदूचींच असून भगवान् बुद्धानें त्यांचा पुनरुद्धार मात्र केला अस माझे मत आहे. निष्कामकर्म आणि त्याग यांचा प्रत्यक्ष आचार करून भगवान् बुद्धानें हीं तत्त्वें व्यवहारांत आणिलीं.

**स्वामीजीः**—पण तुमचें हें मत पुराव्यानें सिद्ध होत नाहीं. बुद्ध जन्मापूर्वीचा कसलाच इतिहास आपणांस उपलब्ध नाही. इतिहास हाच निश्चित आधार मानावयाचा असेल, तर बुद्धाच्या पूर्वी गडद अंधकार पडला होता आणि त्यांत बुद्ध हा एकच प्रकाशमान ज्ञानसूर्य उदयास आला असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाही.

यानंतर त्यागाचा विषय पुन्हा सुरू झाला. स्वामीजी म्हणाले, "त्यागाचें जन्मस्थान कोणतेंही असो. संन्यासी होऊन ब्रह्मज्ञानाची प्राप्ती करून घेणें, हेंच मानवी जीविताचें अतिम साध्य आहे. चतुर्थाश्रम हाच संसारी जीविताचा शेवट असला पाहिजे. '**कौपीनमन्तः खलु भाग्यवंतः**' हें आचार्यांचें वचन अक्षरशः खरें आहे."

**शिष्यः**—पण महाराज, अशा प्रकारचे त्यागी आणि बैरागी जिकडे तिकडे हिंडूं लागल्यामुळें देशाच्या ऐहिक उन्नतीस अडथळा झाला, असें मत हल्लीं पुष्कळ लोक प्रतिपादन करितात. हे लोक आळसांत काळ काढून इकडे तिकडे भटकतात आणि गृहस्थाश्रमी लोकांच्या जिवावर बांडगुळासारखे चरतात, असा आक्षेप त्यांजबद्दल सर्वत्र ऐकूं येतो. सामाजिक अथवा राष्ट्रीय उन्नतीचा कोणताही कार्यभाग हे लोक करीत नाहींत.

**स्वामीजीः**—पण ऐहिक उन्नति म्हणजे काय,. याची स्पष्ट व्याख्या तूं मला सांगशील काय ?

**शिष्यः**—या बाबींत पाश्चात्यांचें उदाहरण आपल्या नजरेसमोर आहेच. त्यांच्याचप्रमाणें भौतिक शास्त्रांचें शिक्षण मिळवून व्यापार, कला, कौशल्य, उद्योग, वाहतुकीचीं साधनें इत्यादिकांची वाढ करणें याचें नांव ऐहिक उन्नति.

**स्वामीजीः**—पण ज्याच्या अंगीं रजोगुण जागृत झाला नसेल अशाच्या हातून असा कार्यभाग होणें शक्य आहे काय ? मीं सारा देश फिरून पाहिला, पण या रजोगुणाचें अस्तित्व मला कोठेंही आढळलें नाही. पहावें तिकडे तमोगुणाचें आधिक्य, अंधाराचें साम्राज्य ! सामान्य जनता तमोगुणांत पूर्ण बुडालेली आहे. रजाचें अथवा सत्त्वाचें किंचित् अस्तित्व कोठें भासमान होत असेल, तर तें त्यागी पुरुषांत मात्र मला आढळले. हेच लोक आज देशाचे आधारस्तंभ आहेत. गृहस्थाश्रम्यांचे खरे गुरु हेच. संसारसंग्रामांत पडलेलीं माणसें यांच्याच शिक्षणाच्या बळावर पुष्कळ वेळां जय मिळवितात. साधूंना गृहस्थाश्रमी लोक अल्पस्वल्प अन्नवस्त्र पुरवितात, आणि एवढ्या चिमुकल्या देणगीवर अमूल्य ज्ञानाचा बदला घेतात. अशा प्रकारची अदलाबदल आपल्या देशांत चालू राहिली नसती, तर अमेरिकेंतील मूळच्या ताम्रवर्णी लोकांप्रमाणेंच आम्हीही आजला नष्ट झालों असतों. साधूंना संसारी लोक अजून अन्नाचा घास घालतात, म्हणूनच उन्नतीच्या मार्गांत एखादें तरी पाऊल पुढें टाकण्याचें साधन त्यांना उपलब्ध होतें. तुम्हांस वाटतें त्याप्रमाणें संन्यासी हे फुकटखाऊ आळशी लोक नव्हत. तुमच्या साऱ्या चळवळीचें तें आदिस्थान आहे. तुमच्यांत कांहीं चलनवलन अद्याप राहिलें असेल, तर तें त्यांच्यामुळेंच. उच्च तत्त्वांचा व्यवहार कसा करावा, याचा नमुना साधूंच्या चरित्रांत संसाऱ्यांना दिसतो. उच्च तत्त्वें या त्यागी लोकांनींच आजवर जिवंत राखून संसाऱ्यांना तीं बहाल केलीं आहेत आणि त्यांचा संग्रह करून संसारी लोक आजवर सुरक्षित राहिले आहेत. या तत्त्वांच्या साहाय्यानेंच कर्मभूमीवरील आपल्या लढाया संसारी लोक यशस्वीपणें लढत आहेत. आपलीं चरित्रें पवित्र व्हावीं ही इच्छासुद्धां साधुचरित्रें पाहूनच संसाऱ्यांच्या मनांत उद्भवते. साधूंची कर्मनिरतता पाहूनच संसारी कर्तव्यपरायण होतात. केवळ परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं आपल्या सर्वस्वावर त्यागी तुळशीपत्र ठेवितो. जगाची सेवा करावी यापली-

कडे कोणताही स्वार्थ तो साधीत नसतो. परोपकाराच्या कार्याचें बीजही त्यागण्यापासूनच संसारी लोक संपादन करितात; आणि एवढ्या मोठ्या सेवेचा मोबदला काय, तर गोळाभर अन्न! अरे, फार काय सांगावें, पण या संन्याशांच्या आशीर्वादानें आणि शुभेच्छेनेंच हें अन्न उत्पन्न करण्याची इच्छा आणि पात्रता संसाऱ्यांना प्राप्त झालेली असते. या भगव्या वस्त्रांच्या मागें केवढें खोल तत्त्व ग्रथित झालेलें आहे हें समजण्याची अक्कल ज्यांना नाहीं तेच लोक चतुर्थाश्रमाची निंदा करितात. दुसऱ्या देशांत काय होत असेल हें मला माहीत नाहीं. आमच्या देशांत तरी सामान्य जननौकेचें सुकाणूं संन्याशांच्या हातीं असल्यामुळेंच संसारसागराच्या पृष्ठभागावर ती अद्यापि तरती राहिली आहे.

**शिष्यः**—पण महाराज, खरोखर जनहित साधावें म्हणून खटपट करणारे संन्यासी कितीसे सांपडतील?

**स्वामीजीः**—अरे, हजार वर्षांत श्रीरामकृष्णांसारखा एक संन्यासी निर्माण झाला तरी पुरे. कारण, असा संन्यासी देहानें अदृश्य झाला, तरी त्याच्या कल्पना आणि त्याची ध्येयें ही माग रहातात आणि हजार वर्षेंपर्यंत सामान्य जनतेला तीं मार्गदर्शक होतात. संन्यास हा एक आश्रम म्हणून आपल्या देशांत अस्तित्वांत आहे, म्हणूनच परमहंसांसारखे महापुरुष निर्माण होतात. मनुष्याचें ऐहिक जीवन अनेक तऱ्हांनीं अपूर्ण आहे. त्यानें सुरू केलेल्या संस्था अशाच अपूर्ण आहेत. सर्वच मानवी कृती कमी अधिक प्रमाणानें अपूर्ण असतात; पण अशा अपूर्णावस्थेंतही हा आश्रम अद्यापि जिवंत राहिला आहे याचें कारण काय? आपल्या समाजघटनेंत अनेक प्रकारचे फेरफार झाले, तिजवर अनेक आपत्ती येऊन गेल्या, पण या साऱ्या प्रसंगांतून निभावून चतुर्थाश्रम अद्यापि जिवंत कां राहिला? याचें कारण हेंच कीं, खरा संन्यासी असतो तो स्वतःच्या मुक्तीचीही पर्वा न करतां स्वतःला केवळ लोकसेवेलाच वाहून घेतो. ज्या आश्रमानें तुमच्यावर इतके अगणित उपकार करून ठेवले आहेत, त्याजबद्दल तुमच्या चित्तांत पूज्यभाव उत्पन्न होत नसेल, तर तुम्हांला शतशः धिक्कार असो.

हे शब्द बोलत असतां स्वामीजींची मुद्रा तेजानें पुंजाळल्यासारखी दिसत होती. मूर्तिमंत संन्यास आपल्या दृष्टीपुढें उभा आहे असेंच शिष्याला वाटलें.

थोडा वेळ थांबून स्वामीजींनीं एकाएकीं एक श्लोक म्हणण्यास सुरवात केली. '**वेदान्तवाक्येषु सदा रमन्तो भिक्षान्नमात्रेण च तुष्टिमन्तः । अशोकमन्तःकरणे चरन्तः कौपीनमन्तः खलु भाग्यवन्तः ॥**' हा श्लोक म्हणत असतां संन्यासधर्माचें सारें महत्त्व जणूं काय स्वामीजींच्या हृदयांत उभें राहिलें होतें असें दिसलें.

आपलें संभाषण पुढें चालू करून स्वामीजी म्हणाले, 'बहुजनांच्या सुखाकरितां आणि हिताकरितांच संन्यासी जन्म घेतो. आपलें हेंच ध्येय आहे, ही गोष्ट जो संन्यासी विसरतो, त्याचा जन्म खरोखर फुकट आहे. परहिताकरितां स्वतःच्या जिवावरही पाणी सोडावें, मानवी दुःखांना आळा घालावा, विधवेचे अश्रु पुसावे, मृतबालकाच्या मातेच्या जिवाला शांति द्यावी, अज्ञानांत चांचपडत असलेल्या सामान्य जनतेला ज्ञानदान करावें आणि सर्वांच्या ठिकाणीं निद्रावस्थेंत असलेला ब्राह्मण जागृत करावा, या एकाच हेतूच्या पूर्तीसाठीं संन्यासी अवतरलेला असतो. जगाचें हित साधीत असतांच तो स्वतःचा मोक्ष साधीत असतो. अहो संन्याशांनो, तुम्ही असे हात जोडून कां बसलां ? उठा, झोंपेंतून जागे व्हा आणि दुसऱ्यांनाही जागे करा. हा देह चालू आहे त्या अवकाशांत मानवी जीविताचें अंतिम साध्य सिद्ध करून दाखवा ! '**उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्यवरान्निबोधत ।**'

*
* *

## [ ११ ]

[ **स्थळः**—बाबू नवगोपाळ घोस यांचें घर, रामकृष्ण पुरा, हावरा, फेब्रुवारी, १८९८ ]

बाबू नवगोपाळ घोस यांच्या घरीं श्रीरामकृष्णांच्या मूर्तीचा प्राणप्रतिष्ठाविधि आज व्हावयाचा होता. उत्सवासाठीं रामकृष्णमठांतील सर्व संन्यासी आणि परमहंसांचे गृहस्थाश्रमी शिष्य जमा झाले होते.

रामकृष्णपुर येथील स्नानाच्या घांटावर स्वामीजी आपल्या सर्व मंडळीसह गेले. त्यांचा पेहेराव अगदीं साधा असून ते अनवाणी चालत होते. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं माणसांचे थवेच्या थवे त्यांच्या दर्शनासाठीं जमा

झाले होते. रस्त्यानें चालतां चालतां श्रीरामकृष्णस्तोत्राचा पाठ ते म्हणूं लागले. त्यांनी गळयांत एक मृदग अडकविला असून त्यावर ते ताल धरीत होते आणि बाकीची सारी मंडळी त्यांची साथ करीत होती.

थोड्या वेळानें आम्ही नियोजित स्थळीं पोंहोंचलों. घाटाच्या वरच्या बाजूला लहानसें देऊळ बांधलें होतें. त्याच्या जमिनीला सुंदर संगमरवरी दगड घातला होता. मध्यभागी एक उच्चासन करून त्यावर मर्मरपाषाणाची श्रीरामकृष्णांची मूर्ती बसविली होती. तेथील एकंदर टापटीप पाहून स्वामीजीना फार संतोष झाला. स्वामी आंत येतांच नवगोपाळ बाबूच्या पत्नीनें त्यांना साष्टांग नमस्कार घातला; आणि त्यांना बसवून ती त्यांजमागे पंखा घेऊन बसली. तेथील टापटिपीची तारीफ स्वामीजी करू लागले, तेव्हां बाई म्हणाली, ‘ महाराज, ठाकुरांची पूजा करावी अशी आमची काय योग्यता आहे ? आम्ही गरीब आणि आमचे उपचारही तसेच क्षुद्र ! आपण आतां मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करून आम्हांस आशीर्वाद द्यावा. ’

यावर स्वामीजी म्हणाले, ‘ तुमच्या ठाकुरांच्या चौदा पिढयांत सुद्धां असलें संगमरवरी घर कोणाच्या नजरेस पडलें नव्हतें. त्यांचा जन्म गवती झोंपड्यांत झाला आणि समाधीपर्यंतचा काल ऐहिकदृष्टया कोणत्या स्थितींत गेला हें सर्वांस विदित आहेच. आतां तर तुम्हीं त्यांना संगमरवरी मखरांत बसविलें. अशी जागा त्यांना पसंत नसेल, तर दुसरें चांगलें स्थळ तें कोठें मिळणार ?’ स्वामींचें हें भाषण ऐकून सर्व मंडळी हंसूं लागली.

यानंतर आंगांतले कपडे काढून ठेवून स्वामीजींनीं अंगाला भस्म लाविलें आणि पुजाऱ्याकरितां केलेल्या स्थानीं बसून विधीस सुरवात केली. स्वामी प्रकाशानंद त्यांना मदत करीत होते. विधि आटोपल्यावर तेथल्या तेथेंच रचलेला पुढील मंत्र स्वामीजींनीं उच्च घोषानें म्हटला. **‘ स्थापकाय च धर्मस्य सर्वधर्मस्वरूपिणे । अवतारवरिष्ठाय रामकृष्णाय ते नमः ॥ ’** स्वामीजींनीं साष्टांग नमस्कार घालतांच सर्व मंडळीनें त्यांचें अनुकरण केलें.

*
* *

[ १२ ]

[ **स्थळः**—बलराम बाबूंचें घर, कलकत्ता, १८९८ ]

गेले दोन दिवस स्वामीजी बलराम बाबूंच्या घरीं होते. या वेळीं ते घराच्या गच्चीवर इकडे तिकडे फिरत होते; आणि चार पांच जणांसमवेत प्रस्तुत शिष्यही तेथें होता. गुरु गोविंदसिंगाचा विषय भाषणांत निघाला, तेव्हां या प्रख्यात शीख गुरूबद्दल स्वामीजींनीं पुष्कळ माहिती सांगितली. गुरु गोविंदसिंगाची त्यागबुद्धि, त्याची तीव्र तपश्चर्या, त्याचें असामान्य धैर्य आणि धर्मासाठीं त्यानें केलेले यत्न यांजमुळें शीख धर्माचा पुनरुद्धार कसा झाला, याचें सुरस वर्णन स्वामीजींनीं केलें. महंमदी धर्मात गेलेल्या अनेक हिंदूंना त्यानें शीख कर्मे बनविलें आणि अखेरीस नर्मदातटाकीं आपली जीवितयात्रा कशी संपविली, हें स्वामीजींनीं आम्हांस सांगितलें. गुरु गोविंद-सिंगानें सर्व शिखांत उत्साह किती भरून दिला होता, याचा निदर्शक असा एक दोहा स्वामीजींनीं म्हणून दाखविलाः '**सवा लाखपर एक चढाऊं जब गुरु गोविंद नाम सुनाऊं**।' गुरु गोविंदाचें नांव ऐकतांच एक शीख सवा लाखांना भारी होतो असें त्या वेळचे शीख म्हणत. गुरु गोविंदसिंगाचें उदाह-रण पाहून प्रत्येक शिखाच्या अंगांत धर्माचें वारें भरे आणि त्याच्या भरांत पराक्रमांच्या कोटी तो करी. ही माहिती सांगत असतां स्वामीजीचें मुख फार तेजाळ दिसूं लागलें. त्यांच्या डोळ्यांतून तर तेज जणूं काय सांडत होतें. स्वामीजींचा चेहरा पाहून आम्ही सर्व मंडळी जणूं काय मंत्रमुग्ध झालों.

थोड्या वेळानें शिष्य म्हणाला, 'महाराज, हिंदु आणि मुसलमान या दोहों-नाही एकचित्त करून एकाच कार्याकडे गुरु गोविंदसिंगानें लावलें हें खरोखरच मोठें नवल आहे. हिंदुस्थानच्या उभ्या इतिहासांत असलें दुसरें उदाहरण सांप-डत नाहीं.

**स्वामीजीः**—सर्वांच्या चित्ताला सामान्यपणें पटेल असें साध्य पुढें असल्यावांचून सामान्य जनांची अशी एकजूट होत नाहीं. नुसत्या सभा भरवाव्या, मंडळ्या स्थापाव्या आणि शब्दांचा पाऊस पाडावा, एवढ्यानेंच समाज एकचित्त होत नाहीं. तसें होण्यास सर्वांचें एकच साध्य असावें लागतें. गुरु गोविंदसिंगाच्या वेळीं हिंदु काय अथवा मुसलमान काय एकाच जुलमी अन्यायी सत्तेखालीं भरडले जात होते. ही मुख्य गोष्ट गुरु

गोविंदसिंगानें सर्वांच्या ध्यानीं आणून दिली; आणि या जुलमाचा प्रतिकार सर्वांनीं सारखाच केला पाहिजे हें त्यानें सर्वांस पटवून दिलें. त्यानें एखादें नवें ध्येय उत्पन्न केलें नाहीं; पण चालू वस्तुस्थितीची ओळख सामान्य जनतेला उत्तमपणें पटविली. यामुळेंच हिंदु आणि मुसलमान हे दोघेही त्याच्या मागें जावयास सिद्ध झाले. तो शक्तीचा मोठा उपासक होता. आपल्या देशाच्या इतिहासांत असें उदाहरण दुसरें सांपडत नाहीं हें अगदीं खरें आहे.

नंतर रात्र बरीच होत आली अस पाहून आम्ही सर्व मंडळी खालीं आलों. या ठिकाणीं संभाषण पुन्हा सुरू झालें. त्यांत चमत्काराचा विषय निघाला, तेव्हां स्वामीजी म्हणाले, ' मनाच्या अल्पस्वल्प केंद्रीकरणानें कांहीं असाधारण शक्ति प्राप्त करून घेणें शक्य आहे. ' शिष्याकडे वळून ते म्हणाले, ' दुसऱ्याच्या मनांत काय चाललें आहे, हें जाणण्याची विद्या तुला शिकावयाची आहे काय ? मी तुला ती चार पांच दिवसांत शिकवीन. '

**शिष्यः**—पण महाराज, मला असल्या विद्येचा उपयोग काय ?

**स्वामीजीः**—कां बरें ? तुला दुसऱ्यांचीं मनें ओळखतां येतील.

**शिष्यः**—पण ब्रह्मज्ञानाच्या मार्गांत या विद्येचा कांहीं उपयोग मला होईल काय ?

**स्वामीजीः**—तिळभरसुद्धां नाहीं.

**शिष्यः**—तर मग असली विद्या शिकण्याची मला इच्छा नाहीं. पण महाराज, असल्या मानसिक शक्तीचीं कांहीं प्रत्यंतरें आपण स्वतः पाहिलीं आहेत काय ? तसें असेल तर आपले स्वतःचे अनुभव ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**स्वामीजीः**—एका वेळीं हिमालयाच्या डोंगराळ मुलखांत हिंडत असतां माझा मुक्काम रानवट लोकांच्या एका खेड्यांत पडला. दिवे लागून घटकाभर झाल्यावर त्या खेड्यांत डफ वाजू लागले. तेव्हां ही काय गडबड आहे, अशी चौकशी मीं केली. कोणा एकाच्या अंगांत देवतेचा संचार झाला असल्याचें समजलें. तेव्हां हें काय प्रकरण आहे, हें पाहण्याच्या उद्देशानें मी घराबाहेर पडलों. त्या स्थळी जाऊन पहातों तों लोकांचा मोठा जमाव दिसला. मध्यभागीं एक उंच मनुष्य उभा होता, त्याच्या डोक्यावर लांब लांब केस होते, आणि त्यांच्या जटा बनल्या होत्या. त्याच्याच आंगांत आलें होतें असें सम-

जळें. पलीकडे जवळच एक आगटी पेटविली असून तींत एक कुऱ्हाड तापत घातली होती. ती तापून लाल झाल्यावर एका मनुष्यानें ती बाहेर काढली; आणि त्या उंच मनुष्याच्या आंगाला जागोजाग लाविली. अखेरीस ती निखाऱ्यासारखी लाल कुऱ्हाड त्यानें त्याच्या केसांवरही ठेविली; पण अत्यंत नवलाची गोष्ट ही कीं, त्याच्या आंगावर भाजल्याची निशाणीसुद्धां उठली नाहीं, अथवा त्याच्या केसांलाही तिळमात्र धक्का लागला नाहीं. त्याला भाजल्याचें कांहीं दुःख होत आहे असेंही चिन्ह त्याच्या तोंडावर दिसलें नाहीं. हा प्रकार पाहून मीं तर तोंडांत बोटच घातलें. इतक्यांत खेड्याचा पाटील मजजवळ येऊन म्हणाला, 'महाराज, या मनुष्याच्या अगांतलें वारें कृपा करून उतरा बरें ?' त्याची ही विनंति ऐकून मी मोठ्या पचांत पडलों. तथापि कांहीं तरी करावें म्हणून मी पुढें झालों. जवळ जाऊन त्या कुऱ्हाडीच्या पात्याला मीं हात लावला, तों माझ्या हाताला असा चटका बसला कीं, त्याची तिडीक माझ्या मस्तकापर्यंत गेली. तरी तें पातें बरेंच निवलें होतें म्हणून बरें. त्या भाजण्याच्या तिडकीनें मला इतका त्रास झाला कीं, या घटनेचा ऊहापोह करण्याचा विचार माझ्या मनांतून साफ पळून गेला. हाताची आग होत होती, ती कशीबशी सोसून मी त्या माणसाजवळ गेलों आणि त्या माणसाच्या डोक्यावर हात ठेवून मनांतल्या मनांत कांहीं मंत्र मीं पुटपुटलों; आणि खरोखर नवलाची गोष्ट ही कीं, दहापांच मिनिटांत तो मनुष्य पूर्वस्थितीवर आला. मग काय विचारतां, ते सारे खेडवळ लोक भडाभड माझ्या पायां पडत सुटले ! त्यांच्या दृष्टीनें मी मोठा देवमाणूस बनलों !! मला मात्र मनांतल्या मनांत त्यांच्या भोळेपणाचें हंसूं येत होतें; आणि खरें म्हणशील तर पहिल्या चमत्काराचा उलगडा जसा मला झाला नाहीं, तसा दुसऱ्याचाही झाला नाहीं. तेव्हां एक शब्दही न बोलतां अस्मादिकांची स्वारी मुकाट्यानें झोंपड्यांत येऊन बसली. या वेळीं मध्यरात्रीचा सुमार झाला होता. आतां झोंप घ्यावी म्हणून मीं आंग आडवें केलें, पण हाताची होणारी आग आणि तो सारा चमत्कार काय असावा हें जाणण्याची मनाची तळमळ, यांमुळें सारी रात्र मला झोंप आली नाहीं. निखाऱ्यासारख्या वस्तूनें जिवत मनुष्यालासुद्धां कांहीं इजा होऊं नये याचा अर्थ काय ? असा प्रश्न माझ्या मनाला एकसारखा टोंचत होता. 'होरेशिओ, तुझ्या तत्त्व-

ज्ञानाच्या स्वप्नांतही येणार नाहींत, असे अनंत चमत्कार पृथ्वीवर आणि आकाशांत भरले आहेत.' हें शेक्सपियरचें वाक्य मला वारंवार आठवत होतें.

**शिष्यः**—पण महाराज, या कोड्याचा उलगडा पुढें तरी केव्हां आपणांस झाला काय ?

**स्वामीजीः**—नाहीं. पुढें ही गोष्ट मी अगदीं विसरून गेलों होतों; पण प्रसंगानुरोधानें ती आतां मला आठवली.

थोड्या वेळानें स्वामीजी पुढें म्हणाले, 'पण असल्या विद्यांच्या मागें कोणालाही लागू न देण्याबद्दल परमहंसांचा मोठा कटाक्ष होता. असल्या जादुगिरीच्या मागे धांवण्यांत मानसिक शक्तीचा अपव्यय होऊन शुद्ध सत्याच्या शोधाकडे ती लावतां येत नाहीं असें ते म्हणत. पण मनुष्याचें मन इतकें दुबळें आहे की, असल्या गोष्टींच्या मागे धांवण्याचा मोहच त्याला पडतो. साधु म्हणून म्हणविणाऱ्यांनाही हा मोह अनावर होतो. मग संसाऱ्यांची गोष्टच कशाला ? पाश्चात्यांबद्दल तर विचारूंच नका. असले कांहीं चमत्कार त्यांनीं पाहिले, कीं ते शुद्ध वेडे बनतात. परमहंसांची आम्हांवर मोठी कृपा म्हणून असल्या तमाशांची खरी किमत आम्हांला समजली. आपल्या मार्गातील हे अडथळे आहेत, ही गोष्ट त्यांनीं आमच्या चित्तावर पक्की ठसविली आहे. श्रीरामकृष्णांचा कोणताही चेला असल्या गोष्टींच्या मागें लागलेला तूं कधीं पाहिला आहेस काय ?'

इतक्यांत स्वामी योगानंद मध्येंच म्हणाले, तुम्हांला मद्रासेंत भेटलेल्या मांत्रिकाची हकीकत आठवत असेलच. ती या बेट्याला सांगा.

स्वामीजी म्हणाले, 'मद्रासचे अकाउंटंट जनरल बाबू मन्मथनाथ भट्टाचार्य यांच्या घरीं मी राहात असतां माझी आई वारल्याचें स्वप्न मला एका रात्रीं पडलें. मी जागा झालों तेव्हां माझ्या मनाला मोठी हुरहुर वाटूं लागली. त्या वेळीं मी कोणासहीं पत्रें लिहीत नसें. कलकत्त्यांतील कोणा मठवाश्याशींसुद्धां माझा पत्रव्यवहार नव्हता; मग घरच्या माणसांची गोष्ट बोलावयासच नको. स्वप्नाची हकीकत मन्मथनाथ यांस मी सांगितली. तेव्हां कलकत्त्याला तार पाठवून त्यांनीं या गोष्टीची चौकशी केली. माझें मन त्या वेळीं अगदीं द्विधा होऊन गेलें होतें. माझ्या अमेरिकेच्या प्रवासाची तयारी पूर्ण होऊन चुकली होती. अमेरिकेला तुम्ही ताबडतोब निघून जा,

असा आग्रह मद्रासी मित्रांनीं चालविला होता; आणि इकडे तर या बातमीनें माझें मन खिन्न झालें होतें. अशा स्थितींत आईची कांहीं बातमी नक्की कळे-पर्यंत मद्रास सोडणें माझ्या जिवावर आलें होतें. ही माझी स्थिति मन्मथ-बाबूंच्या लक्षांत आली होती. तेव्हां त्यांनीं एक सूचना पुढें मांडली. शह-राच्या बाहेर जवळच एक गृहस्थ रहात होता. भूतभविष्य जाणण्याबद्दल त्याची मोठी ख्याति होती. त्याजकडे जाऊन आपण चौकशी करूं या, असें मन्मथबाबू म्हणाले. आम्ही तिघे चौघेजण त्याजकडे जावयास निघालों. त्याच्या गांवीं जाऊन आम्ही पोंचलों आणि त्याचा ठावठिकाणा शोधून त्याज-कडे गेलों. त्या वेळीं तो स्मशानभूमीजवळ बसला होता. तो शुद्ध काजळी रंगाचा असून अगदी हाडकोळा होता. त्याजकडे पाहून कोणालाही भीति वाटावी, असा त्याच्या चेहेऱ्याचा नूर होता. एक दोन शिष्य त्याच्याजवळ बसले होते. मद्रासेकडील कांहीं खेडवळ बोलीची थोडीशी बडबड त्यानें केली. त्या कृष्णवर्ण भयंकर गृहस्थाला भुतेंखेतें वश आहेत, असा त्यांच्या म्हणण्याचा आशय होता. त्या काळ्या गृहस्थानें प्रथम कांहीं वेळ आमच्या-कडे लक्षच दिलें नाहीं. शेवटीं कंटाळून आम्ही जावयास निघालों तेव्हां त्यानें आम्हांस थांबण्याची खूण केली. आमच्याबरोबर तिकडचा एक दुभाष्या होता, त्यानें त्या काळ्या गृहस्थाच्या म्हणण्याचा आशय आम्हांस कळविला. थोड्या वेळानें त्या काळ्या गृहस्थानें पेन्सिलीनें कांहीं आकृति काढण्यास सुर-वात केली. नंतर तो अगदी स्तब्ध बसून राहिला. थोड्या वेळानें माझें नांव, गांव, माझें कुळ, माझ्या पूर्वजांचीं नांवें आणि त्यांची चरित्रें इत्यादि हकीकत सांगण्यास त्यानें सुरवात केली. तो म्हणाला, 'श्रीरामकृष्ण तुझ्या पाठीवर सदोदित असतात. तूं काळजी करूं नको. तुझी आई सुखरूप आहे. तुला आतां दीर्घकाळ देशाबाहेर प्रवास घडणार आहे. बाह्यदेशीं धर्मप्रचाराचें कार्य तुझ्या हातून घडावयाचें आहे.' इतकें बोलून तो स्तब्ध राहिला. आईची खुशाली त्याच्या तोंडून ऐकून आम्ही तेथून निघून मद्रासला परत आलों, तों कलक-त्याहून आलेली तारेची खबर आमची वाट पहातच होती.

स्वामी योगानंदांकडे वळून स्वामीजी म्हणाले, 'त्या कृष्णमूर्तीनें सांगित-लेला प्रत्येक शब्द खरा ठरला. पाहिजे तर याला काकतालीय न्याय म्हणा अथवा मनाला वाटेल तें दुसरें नांव द्या.

स्वामी योगानंद म्हणाले, असल्या गोष्टींवर पूर्वी तुमचा विश्वासच नव्हता; याकरितां एखादा अनुभव प्रत्यक्ष येणें अवश्य होतें.

**स्वामीजीः**—प्रत्यक्ष अनुभवाशिवाय उगीच लोकवार्तेवर विश्वास ठेवण्याइतका मूर्ख मी खचीत नाहीं. या महामायेच्या साम्राज्यांत हिंडूं फिरूं लागल्यानंतर अनेक जादुगिऱ्या माझ्या नजरेस पडल्या. विश्वाच्या या प्रचंड जादूच्या पोटांत अशा बारीकसारीक जादू लक्षावधि भरल्या आहेत; पण ही सारी माया! मायेवांचून या दृश्य सृष्टीत दुसरें कांहीं नाही!! अरे, पण आपण ही काय व्यर्थ बडबड चालविली आहे ? आजचा सारा दिवस रिकामटेकड्या गप्पांत फुकट गेला. अशा भुतांच्या गोष्टी आपण सांगत बसलों तर आपणही भुतेंच होऊं. मी ब्रह्मरूप आहें, असेच चिंतन आपण सदोदित केलें, तर आपण ब्रह्मनिष्ठ होऊं.

नंतर शिष्याकडे वळून स्वामीजी म्हणाले, 'इतका वेळ झालेल्या या चऱ्हाटाची कांहीच आठवण ठेवूं नको. तूं सदोदित नित्यानित्यविवेक करीत जा. आत्मानुभवाशिवाय दुसरी कसलीही इच्छा बाळगूं नको. '**अध्यात्मविद्या विद्यानाम्**' हें वचन केव्हांही विसरूं नको. आत्मविद्येहून अधिक अशी दुसरी विद्या नाहीं. आत्मज्ञानावांचून बाकी सारी माया. निवळ हातचलाखी. माझ्या चित्ताला ही गोष्ट निःसंशय पटली आहे, म्हणून तुलाही ती पटविण्याची खटपट मी करितों. '**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ।**'

आतां रात्रीचे अकरा वाजून गेले होते. तेव्हां उशीर झाला म्हणून जेवणखाण उरकून स्वामीजी झोंपीं गेले. स्वामी उठले तेव्हां शिष्यानें त्यांच्या पायांवर मस्तक ठेवलें आणि तो जावयास निघाला. तेव्हां स्वामीजी म्हणाले, 'तूं उद्यां येणार नाहींस काय ?' 'मी उद्यां खास येईन' असें उत्तर शिष्यानें दिलें. 'दिवस बुडण्यापूर्वी एकवार तरी स्वामीजींचें दर्शन घडावें अशी तळमळ मनाला लागून रहाते' असें तो म्हणाला.

रात्र बरीच झाली असें पाहून स्वामीजींनीं त्याला निरोप दिला.

*
* *

## [ १३ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, १८९८ ]

या वेळीं स्वामीजी नीलांबर बाबूंच्या बागेंतील घरांत रहात होते. मठाचें स्थळही आलंबझारांतून बदलून सध्या हेंच झालें होतें. श्रीरामकृष्णाची तिथिपूजा यंदां फार मोठ्या प्रमाणावर करण्याचें ठरलें होतें.

त्या दिवशीं सकाळीं पूजासाहित्य स्वामीजींच्या स्वतःच्या नजरेखालीं तयार करण्यांत आलें होतें. पूजासाहित्य पाहून झाल्यावर स्वामीजी शिष्याला म्हणाले, 'मीं सांगितल्याप्रमाणें बरींचशीं जानवीं तूं आणलीं असशीलच.'

**शिष्यः**—होय, महाराज. आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व सिद्धता केली आहे. पण इतकीं जानवीं कशाला हवींत तें माझ्या लक्षांत येत नाहीं.

**स्वामीजीः**—यज्ञोपवीत धारण करण्याचा अधिकार प्रत्येक द्विजाला आहे; आणि ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य, हे सारे द्विज आहेत.. माझ्या या म्हणण्याला श्रुतिवचनाचा आधार आहे. श्रीरामकृष्णांच्या पवित्र जन्मतिथीला येणाऱ्या प्रत्येक द्विजाला मी यज्ञोपवीत देणार आहें. आपल्या खऱ्या वर्णाचें विस्मरण या लोकांना झालें आहे; आणि त्याबरोबरच त्यांचें आश्रमधर्माचें ज्ञानही नष्ट झालें. प्रायश्चित्तविधि केल्यानंतर मौजीबंधनाचा हक्क पुन्हां प्राप्त होतो, असें श्रुतिवचन आहे. श्रीरामकृष्णांच्या पवित्र नामाच्या जपानें येथें येणारे सर्व भक्त आपोआपच पावन होतील. तेव्हां यज्ञोपवीत धारण करण्याचा त्यांचा गेलेला हक्क त्यांना आपोआपच मिळेल हें उघड आहे. याकरितां हा उपवीतधारणविधि मी आज करणार आहें. आतां तुझ्या लक्षांत आलें ना ?

**शिष्यः**—बरींच यज्ञोपवीतें मी गोळा करून ठेविलीं आहेत; आणि आजचें पूजन झाल्यावर आपल्या परवानगीनें मी तो विधी करीन.

**स्वमींजीः**—जे भक्त ब्राह्मण नसतील त्यांना मी सांगतों हा गायत्री मंत्र दे. ( येथें स्वामीजींनीं एक मंत्र शिष्याला सांगितला. ) हळू हळू सर्व जनतेला आपणाला ब्राह्मणांच्या पंक्तीस आणून बसवावयाचें आहे. मग रामकृष्ण-भक्तांबद्दल तर बोलावयासच नको. प्रत्येक हिंदूचें दुसऱ्या हिंदूशीं बंधुत्वाचें नातें आहे. पण 'विटाळ विटाळ' म्हणून आपण हें नातें त्यांना विसरविण्यास लाविलें आहे. यामुळेंच सामान्य जनता इतक्या अवनतीला पोंहोंचली. क्षुद्र-बुद्धि, भेकडपणा आणि अज्ञान हीं साऱ्या देशभर आज इतकीं पसरण्याचें कारण हेंच. आतां आत्मविश्वासाचा मंत्र या सर्वांना आपणांस शिकवावयाचा आहे. त्यांच्या पतितावस्थेंतून त्यांचा उद्धार आपणांस करावयाचा आहे. आम्हांप्रमाणेंच तुम्हीही माणसें आहां आणि आम्हांप्रमाणेंच तुम्हांसही सारे हक्क आहेत, ही जाणीव आपणांस त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करावयाची आहे. आतां तुला समजलें ना ?

**शिष्यः**—होय, महाराज. असें करणें हेंच योग्य.

**स्वामीजीः**—ज्यांचा उपवीतधारणविधि करावयाचा त्यांना प्रथम गंगास्नान करून येण्यास सांग. मग श्रीरामकृष्णांना नमस्कार करून सर्व विधि उरकून घे.

सुमारें चाळीस पन्नास भक्तांना स्वामीचा गायत्री मंत्र शिष्यानें सांगितला आणि त्यांजकडून उपवीत धारण करविलें. मग ती सर्व मंडळी स्वामीजींना वंदन करण्यास गेली. तेव्हां त्यांना पाहून स्वामीजींना अत्यानंद झाला. यानंतर थोड्याच वेळानें गिरीशचंद्र घोस कलकत्त्याहून आले.

नंतर स्वामीजींच्या इच्छेप्रमाणें भजनास सुरवात झाली. '**कूजन्तं रामरामेति**' हें स्तोत्र स्वामीजींनीं अत्यंत मधुर स्वरांत गाइलें. श्लोक म्हणून झाल्यावर 'श्रीराम, श्रीराम' हा मंत्रही त्यांनीं इतक्या गोड आवाजांत जपला कीं तो जप ऐकून आम्ही सर्व मंडळी अगदी तटस्थ झालो. स्वामीजी या वेळीं योगासनस्थ झाले होते. त्यांचे नेत्र अर्धोन्मीलित होते. स्वामीजीचें मुख आधींच गभीर पण या वेळीं तर हा गंभीरपणा शतपटीनें वाढल्यासारखा दिसत होता. सुमारें अर्धातास स्वामीजी अगदी स्तब्ध होते; आणि त्यांच्या गंभीर मुखाकडे पहात आम्ही सर्व मंडळीही चित्राप्रमाणें निष्क्रिय होऊन बसलों होतों.

नंतर तुलसीदासकृत एक रामाचें पद स्वामीजी गाऊं लागले. या वेळींही त्यांची वृत्ति त्या भजनांत इतकी रंगली होती कीं, आम्हा मंडळीचें अस्तित्व त्यांना भासत होतें कीं नाहीं कोण जाणे. तुलसीदासाचें पद आपल्या मनाशींच जणूं काय ते गात होते. स्वामीचें भजन संपल्यावर आळीपाळीनें इतर मंडळीचें भजन झालें.

स्वामीजीच्या गळ्यांत बरेच पुष्पहार मंडळीनें घातले होते. पण या वेळीं त्यांनीं ते भराभर काढले आणि गिरीशबाबूंच्या गळ्यांत घातले. स्वामीजी म्हणाले, 'गिरीशबाबू भैरवावतार आहे, असें परमहंसदेव म्हणत. गिरीशबाबूंत आणि माझ्यांत कांहीं अंतर नाहीं.' गिरीशबाबू अगदीं स्तब्ध बसले होते. इतक्यांत स्वामीजींनीं भगवीं वस्त्रें आणून तीं गिरीशबाबूंच्या अंगावर घातलीं. तरीही बाबूमहाशय स्तब्धच. आज स्वामीजी करतील तें करूं द्यावयाचें असाच जणूं काय त्यांनीं निश्चय केला होता. स्वामीजी त्यांना म्हणाले,

'ठाकुरांचें चरित्र तुम्हीच आज आम्हांस सांगा. बंधू हो, तुम्ही सर्व एकचित्त होऊन गिरीशबाबूंचें प्रवचन ऐका. इतकें झालें तरी आणखी कांहीं वेळ बाबूजी स्तब्धच राहिले. थोड्या वेळानें ते म्हणाले, 'माझ्यासारख्या क्षुद्र जिवड्यानें त्या कृपासागराच्या गुणांचें वर्णन काय करावें ? त्यांच्या कृपेला पारच नव्हता. बाल्यापासून पवित्र आणि त्यागी अशा तुम्हां संन्याशांच्या मांडीला मांडी लावून बसण्याचें थोर, भाग्य आज मला प्राप्त झालें, ही त्यांचीच कृपा.' बोलतां बोलतां गिरीशबाबूंचा कंठ भरून आला. त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि ते अगदीं स्तब्ध झाले.

यानंतर थोडेंसें हिंदी भजन स्वामीजींनीं म्हटलें. पुढें थोड्या वेळानंतर भक्तमंडळींनीं अल्प उपाहार केला. मग स्वामीजी सर्व शिष्यमंडळीसह तळमजल्यावरील मोठ्या खोलींत येऊन बसले. यावेळीं बाहेरचीही पुष्कळ मंडळी तेथें जमा झाली होती. आपल्या एका गृहस्थाश्रमी स्नेह्याला स्वामी म्हणाले, 'वस्तुतः तूंही द्विजांपैकीं आहेस. आज फार वर्षें तुम्ही ही गोष्ट विसरून गेलां होतां; पण आजपासून तुम्ही द्विज झालां आहां. आज तुम्हांला दिलेल्या गायत्रीमंत्राचा जप रोज निदान शंभरदां तरी करीत जा." स्नेह्यानें स्वामीजींच्या म्हणण्यास मान्यता दिली.

इतक्यांत महेंद्रनाथ गुप्त आंत आले. स्वामीजींनीं मोठ्या आदरानें त्यांचा सत्कार करून त्यांस खालीं बसविलें आणि ते त्यांना म्हणाले, 'महाशय, आज श्रीरामकृष्णांची जन्मतिथि आहे. याकरितां त्यांच्या चरित्राचा कांहीं भाग आपण आम्हांस सांगितला पाहिजे."

इतक्यांत स्वामी अखंडानंद मुर्शिदाबादेहून येऊन पोहोंचले. त्यांनीं तेथून मण दीडमण मिठाई बरोबर आणली होती. 'मिठाईच्या पाट्या देवघरांत नेऊन परमहंसांपुढें ठेवा,' अशी आज्ञा स्वामीजींनी दिली. नंतर स्वामी अखंडानंदाकडे पाहून स्वामीजी शिष्यांना म्हणाले, 'हा किती निधड्या छातीचा आहे तें तुला ठाऊक आहे ? मृत्यु, रोग, दुःखें इत्यादिकांची ओळखही त्याच्या मनाला नाहीं. मागें पुढें न पाहतां आपला मार्ग तो अखंडपणें चालत आहे. '**बहुजनसुखाय बहुजनहिताय**' हाच त्याचा आत्मोन्नतीचा मार्ग आहे.'

**शिष्यः**—महाराज, एवढें सामर्थ्य प्राप्त होण्यास त्यांची तपश्चर्याही तशीच दांडगी असली पाहिजे.

**स्वामीजीः**—बरोबर आहे. तपश्चर्येवांचून सामर्थ्य नाहीं. तथापि सदोदित परहिताचा उद्योग करणें हीसुद्धां मोठी तपश्चर्याच आहे. अशा प्रकारचें कर्म हाच कर्मयोग. कर्मयोगाची तपस्या हीच. इंद्रियसुखविमुख होऊन मनाला बंधन घालणें आणि त्याचा संयम करणें ही जशी तपस्या, त्याचप्रमाणें मीपणा विसरून परलाभासाठीं कर्म करणें हीसुद्धां तपस्याच होय. पहिल्या तपस्येनें ज्याप्रमाणें निष्कामता प्राप्त होऊन चित्तशुद्धि होते, त्याचप्रमाणें या दुसऱ्या तपस्येनेंही चित्तशुद्धि हें अंतिम फल प्राप्त होतें. दोन्ही मार्गांचा शेवट आत्मानुभवांतच होतो.

**शिष्यः**—पण महाराज, स्वहितविस्मृति आणि परहितानुराग हीं आरंभापासूनच कशीं प्राप्त होतील? असें सामर्थ्य आम्हां सामान्य माणसांपैकीं कितीकांच्या आंगीं असणार? स्वतःच्या सुखाचा विचारही मनांत येऊं नये आणि दुसऱ्यांच्या सुखासाठीं सारा जन्म काबाडकष्ट करावे अशी इच्छा उद्भव्यास लागणारें अंतःकरणाचें औदार्य ही एक अत्यंत दुर्मिळ वस्तु आहे.

**स्वामीजीः**—अरे, कांहीं तपस्या घडावी इतकी नुसती इच्छासुद्धां कितीशा लोकांस होते? कनक आणि कामिनी यांचा मोह दृष्टीसमोर वावरत असतां आत्मानुभवाची इच्छा करणारे कितीसे सांपडतील? वास्तविक पाहतां मनःसंयम जितका कठीण तितकेंच निष्काम कर्मही कठीण आहे. याकरितां जो केवळ परहितासाठीं कर्म करीत असतो, त्याजवर कसलीही टीका करण्याचा अधिकार आपणांस नाहीं. तुला मन मुंडण्याची तपस्या आवडत असली, तर ती तूं खुशाल कर. पण दुसरा कोणी संसारांत वावरतांना दिसतो एवढयासाठींच त्याला तूं स्वतःहून कमी मानूं नको. तुला तपस्या जशी मान्य त्याचप्रमाणें त्याला कर्मयोग मान्य असेल. स्वतःच्या मार्गानें जाण्याचा अधिकार तुला जसा पूर्णपणें आहे, त्याचप्रमाणें त्यालाही स्वतःच्या मार्गानें जाण्याचा पूर्ण अधिकार असणें युक्त आहे. कर्म करीत राहाणें यांत कांहींच तपस्या नाहीं, अशी तुझी पक्की कल्पना झालेली दिसते.

**शिष्यः**—होय महाराज, तपस्या या शब्दाचा कांहीं वेगळाच अर्थ मी आजपर्यंत समजत होतों.

**स्वामीजीः**—आत्मसंयमाचा अभ्यास करून ज्याप्रमाणें कांहीं विशिष्ट मार्गाकडे जाण्याची दृढता आपण आपल्या बुद्धीला आणतों, त्याचप्रमाणें पुनः-

पुन्हां निष्काम कर्म करून तीच दृढता आपण प्राप्त करून घेऊं शकतों. निष्काम कर्म नाखुषीनें होत असलें, तरीसुद्धां दीर्घ प्रयत्नानें आपलें मन खरोखर निष्काम झाल्यावांचून राहाणार नाहीं. दुसऱ्यांकरितां कर्म करावें या बुद्धीची वाढ अशा प्रकारें होते. आज तुझी खुषी नसली तरी परहितासाठीं कांहीना कांहीं कर्म प्रत्यहीं करीत जा. कालांतरानें या तपस्येचें फळ अंतरंगांत उत्पन्न होतें कीं नाहीं, हें तुझें तुलाच समजेल. निष्काम कर्म केल्यानें मनाची वक्रता आणि त्याचे त्रिकोण चौकोन मोडून तें सरळ होतें. यानंतर स्वार्थ पूर्णपणें विसरण्याची पूर्वतयारी होते. अखेरीस परहितांतच स्वहित सांठविलें आहे अशी बुद्धि उत्पन्न होते.

**शिष्यः**—पण महाराज, परहित साधण्याची इतकी आवश्यकताच काय आहे ?

**स्वामीजीः**—अरे, आत्महित त्यांतच आहे म्हणून; आपला देह परहिताला लावण्यासाठींच निर्माण झालेला आहे, या भावनेच्या उदयाबरोबर अहंकार-भावनेचा अस्त होऊं लागतो. आज मी आणि देह यांत कांहीच फरक आपणांस वाटत नाहीं. देह म्हणजे मी आणि मी म्हणजे देह, ही कल्पना आपल्या ठिकाणीं अत्यंत दृढावलेली आहे. ही गेल्याशिवाय अहंकारनाश शक्य नाहीं. निष्कामकर्म दीर्घ काल करीत राहिल्यानें देहविस्मृति होऊं लागते. देह आणि मी विभक्त आहों, या कल्पनेचा उदय होऊ लागतो. परहिताची तुमची इच्छा जों जों अधिक तीव्र होत जाते, तों तों अहंकारविस्मृति अधिक झपाट्यानें होऊं लागते. अशा रीतीनें निष्कामकर्मांच्या योगें तुमचें चित्त हळूहळू शुद्ध होत जातें आणि जें आत्मरूप तुमच्या स्वतःच्या ठिकाणीं आहे, तेंच सर्वत्र भरलें आहे, या सत्यवस्तूचा अनुभव तुम्हांस हळू हळू येऊं लागतो. अशा रीतीनें निष्कामकर्म अथवा परहितचिंतन हा आत्मानुभवाचा एक मार्ग आहे. त्याचप्रमाणें तूं ज्याला योगसाधन म्हणतोस, त्याचाही हा एक प्रकार आहे, हें ध्यानीं आण. निष्काम कर्मांचेंही अंतिमसाध्य आत्मानुभव हेंच आहे. ज्ञानानें अथवा भक्तीनें ज्याप्रमाणें हें साध्य सिद्ध होतें, त्याचप्रमाणें निष्कामकर्मयोगानेंही तें सिद्ध होतें.

**शिष्यः**—पण महाराज, सदा सर्वदा मी जर दुसऱ्याबद्दलच चिंतन करीत बसलों, तर आत्मचिंतन करण्यास मला केव्हां फावणार ? आत्मरूप परोक्ष आहे, तसेंच तें अपरोक्षही आहे. लौकिक वस्तु प्रत्यक्ष आणि सापेक्ष

आहेत. मग प्रत्यक्ष आणि सापेक्ष वस्तूंचा ध्यास माझ्या मनानें अहोरात्र घेतल्यास, परोक्ष वस्तूचा अनुभव कधीं काळीं तरी मला होईल काय ?

**स्वामीजीः**—आत्मसंयम अथवा दुसरे सारे योगमार्ग आत्मज्ञानासाठींच अवतरले आहेत. त्या सर्वांचें अंतिम साध्य एकच आहे. तें साध्य आत्मज्ञान म्हणजे आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव हेंच होय. मग निष्कामकर्माच्या योगानें तुला असा अनुभव प्राप्त झाला, तर त्यापुढें करावयाचें म्हणून काय शिल्लक राहील ? अरे, आत्मसाक्षात्कार म्हणजे बेशुद्धि अथवा निवळ जडत्व असें तर तुला वाटत नाहीना ? हा समोरचा लाकडाचा ठोकळा अथवा ही भिंत यांज-प्रमाणें होऊन बसणें म्हणजे साक्षात्कार होणें, असा तर तुझ्या म्हणण्याचा आशय नाही ना ?

**शिष्यः**—महाराज, माझ्या म्हणण्याचा असा आशय नाहीं. तथापि, दृश्यापासून निवृत्त होऊन सत्स्वरूप साक्षात्कार होणें, म्हणजेच मनाची सारी क्रिया थांबणें असें श्रुतिवचन आहे.

**स्वामीजीः**—तूं वचन बरोबर सांगितलेंस, पण त्याचें रहस्य तुझ्या गळीं उतरलेले नाही. ज्या समाधिस्थितीचें वर्णन श्रुतींनीं केले आहे, तीच स्थिति चालतां बोलतां प्राप्त होण्यासारखी नाही. क्वचित् काळीं अशा स्थितीचा अनुभव येतो न येतो तोंच मन तेथून परावृत्त होतें. अशी स्थिति फार काळ टिकून रहात नाहीं. मग बाकीच्या वेळीं अशा मनुष्यानें काय करावें ? मीच सर्वत्र भरलों आहें, या वस्तुस्थितीचा अनुभव आला खरा, पण तो मुरला नाही. या अनुभवाची स्मृति सदासर्वदा रहात नाहीं. अशा वेळीं परसेवामग्न रहाणें, हा एकच मार्ग योग्याला शिल्लक उरतो. यांत आणखीही एक हेतु आपोआपच सिद्ध होत असतो. पूर्वीच्या ज्या कर्मफलामुळें हा देह प्राप्त झालेला असतो, त्या फलांचा क्षय होणें अवश्य असतें; आणि तो क्षय त्याच देहाच्या द्वारें व्हावा लागतो. निष्काम कर्मानें पूर्वकर्माचा क्षय होतो आणि निष्कामतेमुळें नव्या कर्मफलाचा लेप लागत नाहीं. अशा रीतीनें उभयपक्षीं फायदा होऊन योगी मुक्त होतो. '**योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽत्म-शुद्धये ।**' अशा रीतीनें कर्मफलापेक्षेनें चित्त बद्ध न होतां आपली जीवितयात्रा जो चालवीत असतो, त्याला जीवन्मुक्त असें नांव शास्त्रांनीं दिलें आहे.

**शिष्यः**—तर मग अशी जीवन्मुक्तावस्था प्राप्त होईपर्यंत खरें निष्काम कर्म हातून घडणें शक्यच नाहीं असें म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे ?

**स्वामीजीः**—तुझें म्हणणें बरोबर आहे. शास्त्रांनींही हेंच सांगितलें आहे. पण त्याबरोबरच परहितासाठीं कार्यरत राहाण्यानें जीवन्मुक्तिलाभ होतो, असेंहि तीच शास्त्रें सांगतात हें लक्षांत ठेव. कारण, तसे नसतें तर कर्मयोग म्हणून एका विशिष्ट योगमार्गाचें विवरण करण्यास शास्त्रें प्रवृत्त झालीं नसतीं. स्वामीजीचा हा मुद्दा शिष्याच्या लक्षांत आतां पूर्णपणें आला आणि तो स्तब्ध राहिला. गिरीशबाबूंनीं केलेला एक रामकृष्णांचा पाळणा म्हणण्यास स्वामीजींनींही सुरवात केली.

***

[ १४ ]

[ **स्थळः**—बेलूर, १८९८ ]

बेलूर येथील नव्या मठांत श्रीरामकृष्णांच्या प्रतिमेची प्राणप्रतिष्ठा आज व्हावयाची होती. तन्निमित्त कांहीं होमहवन स्वामीजी करणार होते. प्राण-प्रतिष्ठाविधि कसा असतो, हें पाहण्यासाठीं शिष्य आधल्या दिवशीं संध्याकाळ-पासूनच मठांत येऊन राहिला होता.

भल्या पहाटे स्वामीजी गंगास्नान करून आले आणि देवघरांत त्यांनीं प्रवेश केला. त्यानंतर प्रथम परमहंसांच्या पादुकांचें पूजन करून कांहीं काळ स्वामीजी ध्यानस्थ बसले. ध्यानविसर्जन झाल्यावर आम्ही सर्व नव्या मठाकडे जावयास निघालों. श्रीरामकृष्णांच्या देहाची रक्षा एका ताम्रपात्रांत घातली होती. तें पात्र उजव्या खांद्यावर घेऊन स्वामीजी सर्वांच्या आघाडीस निघाले. बाकीची संन्यासी मंडळी त्यांच्या मागोमाग चालत असून प्रस्तुत शिष्यही त्यांतच होता. घंटानाद आणि शंखस्फुरण हीं चालूच होतीं. चालतां चालतां शिष्य स्वामीजीं-जवळ आला, तेव्हां स्वामीजी त्याला म्हणाले, 'तुम्ही मला कोठेंही झोपड्यांत अथवा एखाद्या झाडाखालीं नेऊन बसविलें तरी तुमच्या बरोबर मी येईन' असें श्रीरामकृष्ण मला म्हणत. आज त्यांना मी नव्या मठांत खांद्यावर वाहून नेत आहें. ते त्या जागीं आतां दीर्घकाळ राहणार आहेत ही खात्री तूं बाळग त्यांच्या तेथल्या निवासानें बहुजनांचें कल्याण व्हावयाचें आहे.

**शिष्यः**—महाराज, यासंबंधीं परमहंसांशीं आपलें भाषण कधीं झालें होतें ?

**स्वामीजीः**—अरे, या मंडळींनीं तुला केव्हांच कांहीं सांगितलें नाहीं ? काशीपुरच्या बगीच्यांत ते रहात होते तेव्हां हा विषय निघाला होता.

**शिष्यः**—मीं असें कांहीं ऐकलें खरें. श्रीरामकृष्णांच्या पूजेचा अधिकार संन्याशांकडे असावा, कीं त्यांच्या गृहस्थाश्रमी शिष्यांकडे असावा यासंबंधीं कांहीं तंटा होऊन दोन तट पडले होते असें माझ्या ऐकिवांत आहे.

**स्वामीजीः**—छे, छे, असे तट कधींच पडले नव्हते. उभयपक्षीं गैरसमज होऊन थोडाबहुत वादविवाद झाला होता, इतकेंच. रामकृष्णांचे जे खरे भक्त आहेत आणि जे वास्तविकपणें त्यांच्या कृपेला पात्र झाले होते, त्यांच्यांत तट आणि पंथ कधींच निर्माण व्हावयाचे नाहींत, याबद्दल तुझी खात्री असूं दे. असें होणें शक्यच नाहीं. कोणी शिष्य गृहस्थाश्रमी असले अथवा कोणी संन्यासी असले, तरी त्यांच्यांत तंटे व्हावयाचे नाहींत. मध्यंतरीं जो थोडा गैरसमज झाला होता त्याचें कारण तुला ठाऊक आहे ? मूर्ती तितक्या प्रकृति हा निसर्गसिद्ध नियम आहे. यामुळें श्रीरामकृष्णांचा प्रत्येक शिष्य आपल्या मतानुसार त्यांजकडे पहात असतो. वेगवेगळ्या माणसांनीं वेगवेगळ्या रंगांच्या कांचांतून एकाच सूर्याकडे पहावें तसेंच हें आहे. आतां अशा रीतीनें दृष्टि बदलली आणि हा भेद दीर्घकाळ तसाच चालू राहिला तर कालेंकरून पथ निर्माण होतात हें खरें. तथापि, श्रीरामकृष्ण देहांत असतां त्यांना प्रत्यक्ष पाहाण्याचें भाग्य ज्यांच्या वांट्यास आलें होतें, त्यांच्यांत असे पंथ निर्माण होणें शक्यच नाहीं. श्रीरामकृष्णांच्या व्यक्तिविशिष्टत्वाची छाप त्यांच्यावर पडलेली आहे, त्यांच्या ज्ञानरवीच्या प्रखर किरणांचा प्रत्यक्ष अनुभव त्यांना घडलेला आहे, अशा स्थितींत क्षुद्र अहंकार आणि मनाचा संकुचितपणा हे दोष त्यांच्या ठिकाणीं राहाणें शक्यच नाहीं. खोटा मीपणा त्यांच्या ठिकाणीं असावयाचा नाहीं. यामुळें पंथ निर्माण करण्याची सवडच त्यांना मिळत नाहीं. परमहंसांचें पूजन प्रत्येक जण आपापल्यापरीच करीत असला, तरी त्यांच्या भक्तींत सर्व शिष्य एकरूप होतात.

**शिष्यः**—महाराज, श्रीरामकृष्ण परमरूपाचे अवतार होते असें प्रत्यक्ष ज्ञान ज्यांना झालें, त्यांच्यांतही अशी भेददृष्टि निर्माण होऊं शकते काय ? आतां

अशा लोकांनीं पंथ निर्माण केले नाहींत तरी त्यांच्या भेददृष्टीचा वारसा पुढच्या परंपरेला मिळून भेद निर्माण होतील.

**स्वामीजीः**—तुझें म्हणणें बरोबर आहे. कालांतरानें पंथ निर्माण होतात याचें कारण हेंच. चैतन्यदेवांचेंच उदाहरण पहा. त्यांच्या पाठीमागें आज त्यांचेंच नांव घेणारे दोनतीनशें पंथ निर्माण झाले आहेत. येशू खिस्ताच्या नांवानें चालणारे हजारों पंथ आज अस्तित्वांत आहेत आणि मौज ही कीं, इतके सारे पंथ एकट्या चैतन्यदेवाचें अथवा खिस्ताचेंच नांव घेतात.

**शिष्यः**—तर मग श्रीरामकृष्णांच्या शिक्षणाचाही असाच प्रकार होईलसें दिसतें.

**स्वामीजीः**—कालांतरानें असें होणें अपरिहार्य आहे. तथापि आज जी संस्था आपण स्थापीत आहों, ती सर्वांची एकवाक्यता करील. हा अमुक धर्माचा अथवा तो तमुक वर्णाचा अशी आकुंचित दृष्टि श्रीरामकृष्णापाशीं नव्हती; आणि हाच महत्त्वाचा मुद्दा ध्यानांत बाळगून याच मताचा प्रसार ही संस्था करील. सव विश्व एकरूप आहे, याच संदेशानें सर्व जग ही संस्था भरून टाकील.

अशा प्रकारें आमचें संभाषण चालू असतां आम्ही मठाच्या आवाराजवळ येऊन पोंचलों. मठांत जातांच स्वामीजींनीं तें ताम्रपात्र खांद्यावरून खालीं घेतलें आणि तें प्रथम मस्तकीं धारण करून मग त्यांनीं तें आसनावर ठेविलें. नंतर सव मंडळींनीं त्या पात्राला वंदन केलें. मग स्वामीजींनीं षोडशोपचारें त्याचें पूजन केलें. अग्नि प्रज्वलित करून त्यांत हवनद्रव्यें टाकण्यांत आलीं. मग त्या अग्नीवर स्वामीजींनीं स्वहस्तें पायसान्न शिजविलें; आणि श्रीरामकृष्णांना त्याचा नैवेद्य केला. हा सर्वविधि संपल्यानंतर स्वामीजींनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

‘ तुम्ही सर्व मंडळी आज अंतःकरणपूर्वक श्रीरामकृष्णांची प्रार्थना करा. ‘**बहुजनहिताय बहुजनसुखाय**’ त्यांनीं या पवित्र जागीं नित्य वास करावा आणि येथें राहून सर्व धर्मांची एकवाक्यता त्यांनीं करावी, अशी त्यांची प्रार्थना तुम्ही करा. ’ स्वामीजींच्या इच्छेप्रमाणें सर्वांनीं हात जोडून तशी प्रार्थना केली. मग स्वामीजी शिष्याकडे वळून म्हणाले, ‘ आम्ही संन्यासी शिष्यांनीं या-

पात्राची स्थापना येथे केली. याकरितां त्याला तेथून हालविण्याचा अधिकार आम्हांस नाही. तथापि नीलांबरबाबूच्या बगीच्यात अजून थोडा काळ तें नेऊन ठेवणें अवश्य आहे. याकरितां तूं तें मस्तकीं धारण कर.' त्या पात्राला स्पर्श करण्यास शिष्य कांकूं करीत आहे असें पाहून स्वामीजी म्हणाले, 'भिऊं नको, माझ्या आज्ञेनें तें तूं उचल.' मग शिष्यानेंही स्वामीजींचें वचन मोठ्या आनंदानें मान्य करून तें पात्र उचलून मस्तकावर घेतले आणि तो चालूं लागला. तो पुढें जातांच स्वामीजी त्याच्या मागोमाग निघाले, आणि बाकीची मंडळी त्यांच्या मागोमाग चालूं लागली. स्वामीजी शिष्याजवळ येऊन म्हणाले, 'श्रीरामकृष्ण आज तुझ्या मस्तकी आरूढ झाले असून ते तुला आशीर्वाद देत आहेत. याकरितां यापुढें अनित्य वस्तूंच्या विकाराचा स्पर्श आजपासून तुझ्या चित्तास न होईल अशी खबरदारी घे.'

आम्ही सर्व मंडळी आमच्या मठांत सुखरूप येऊन पोहोचलों. यानतर शिष्याशीं कांही बोलणें निघालें असतां स्वामीजी त्याला म्हणाले, 'श्रीरामकृष्णांच्या आशीर्वादानें आज त्यांचें धर्मक्षेत्र आपण स्थापिलें आहे. गेलीं बारा वर्षें माझ्या मनावर असलेलें काळजीचें दडपण आज दूर झालें. हा मठ धर्मज्ञानाचा आणि धर्माभ्यासाचा पुरस्कार करील, हेंच चिंतन माझ्या मनांत या क्षणीं चालू आहे. तुझ्यासारख्या सत्पात्र संसारी लोकांनीं आजूबाजूला घरें बांधून रहावें आणि संन्याशांनीं मठांत वास करावा. मठाच्या दक्षिण भागाकडे जागा रिकामी आहे तेथें इंग्रज आणि अमेरिकन जिज्ञासूंसाठीं घरें बांधावीं असें मला वाटतें. माझी इच्छा तुझ्या पसंतीस कशी काय उतरते?'

**शिष्यः**—महाराज, आपले हे कल्पनातरंग खरोखरच मोठ्या मौजेचे आहेत.

**स्वामीजीः**—काय, ही नुसती कल्पनाच म्हणतोस? छे, छे, माझी ही इच्छा नुसत्या कल्पनेंतच राहाणारी नव्हे. यथाकालीं ती प्रत्यक्ष प्रतीतीस येईल. पुढच्या प्रचंड कार्याचा आज नुसता ओनामा झाला आहे. आज इमारतीचा पाया मात्र आपण खोदला. या पायावर भव्य इमारती पुढें उठावयाच्या आहेत. त्यांतील कांहीं भाग माझ्या जिवंतपणीं तयार होईल. बाकीच्या भागाची सर्व रूपरेषा मी तुम्हांस समजावून देईन. तीप्रमाणें पुढील कार्य करणें तुम्हांकडे आहे. अरे, मोठमोठीं तत्त्वें ऐकणें अथवा बोलणें एवढ्यांतच आपल्या जीवि-

ताची फलश्रुति नाहीं. हीं तत्त्वें सामान्य व्यवहारांत तुम्हीं चालतीं बोलतीं केलीं पाहिजेत. त्यांचा प्रत्यक्ष अभ्यास तुम्हीं केला पाहिजे. श्रुतिवचनांचे नुसते घोष करून काय उपयोग? शास्त्रवचनें बुद्धिगत झाल्यानंतर तीं व्यवहारांत स्पष्ट दिसूं लागावीं असें करणेंच तुम्हांस युक्त आहे. यालाच मी व्यवहारी धर्म म्हणतों. संसाऱ्यांचा धर्ममार्ग असा आहे. तुझ्या ध्यानांत आलें ना?

अशा रीतीनें आमचें संभाषण चालू असतां त्याचा ओघ हळूहळू शंकराचार्यांकडे वळला. श्रीमदाचार्यासंबंधीं शिष्याच्या मनांत अत्यंत पूज्यबुद्धि होती. इतकी कीं, त्या विषयांत तो जवळजवळ हठवादीच बनला होता. आचार्यांचा अद्वैतवाद म्हणजे सर्व तत्त्वज्ञानाचा मेरुमणि असें त्याला वाटे. त्यासंबधी यत्किंचित् टीका कोणी केली तरी ती त्याला खपत नसे. शिष्याची ही गोम स्वामीजींच्या लक्षांत आली होती; आणि शिष्याचा हा एककल्लीपणा मोडून काढण्याची त्यांची इच्छा होती.

**स्वामीजी** म्हणाले, ‘आचार्यांची बुद्धिमत्ता तीव्र वस्तऱ्याच्या धारेसारखी होती, यांत शंका नाहीं. ते उत्कृष्ट पंडित होते आणि वादविवादांत प्रतिपक्ष्याला चीत करण्याची हातोटी त्यांना चांगली साधली होती यांतही शंका नाहीं. तथापि बुद्धीच्या विशालतेइतकी अंतःकरणाची विशालता त्यांजपाशीं नव्हती. स्वतःच्या ब्राह्मण्याचा त्याना अत्यंत अभिमान होता. आजही दाक्षिणात्य ब्राह्मणांत असा तीव्र अभिमान तुला आढळेल. वेदान्तसूत्रांवर लिहिलेल्या भाष्यांत ब्राह्मणेतरांना परमवस्तूचें ज्ञान होणार नाही असे त्यांनीं अट्टाहासानें म्हटलें आहे; आणि या मताच्या सिद्धीकरितां त्यांनीं प्रमाणें तरी कसलीं दिलीं आहेत पहा. विदुरासंबंधी बोलतांना आचार्य म्हणतात, ‘पूर्वजन्मीं तो ब्राह्मण होता, म्हणूनच या जन्मीं त्याला ब्रह्मज्ञान झालें.’ आतां एखादा शूद्र ब्रह्मज्ञ झाला तर पूर्वजन्मीं तो ब्राह्मण होता, असें आचार्याप्रमाणेंच आपणही म्हणावें कीं काय? छे, छे! अशा रीतीनें ब्राह्मण्याचा छळ करण्यांत काय अर्थ आहे? त्याला जन्मजन्मांतरीं फरफटत नेऊन काय फायदा? ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तिन्ही वर्णांना श्रुतीनीं वेदपठनाचा आणि ब्रह्मज्ञानाचा सारखाच अधिकार दिला आहे. अशा प्रकारचें प्रत्यक्ष श्रुतिवचन असतां ब्राह्मणपणाचा इतका हठवाद करण्याचें कारण आचार्यास मुळींच नव्हतें. असें करून एक प्रकारें त्यांनीं श्रुतीचा अनादर केला आहे.

वादांत पराभूत झालेल्या कित्येक बौद्ध भिक्षूंना आचार्यांनीं जिवंत जाळून टाकलें ! आतां या प्रकाराला वेड म्हणावयाचें नाहीं तर काय ? उलटपक्षीं भगवान् बुद्धाकडे पहा. यःकश्चित् प्राण्याचा जीव बचावण्याकरितां स्वतांचा जीव गहाण टाकण्यास भगवान् तयार झाले. मग अनेकांच्या हिताविषयीं बोलावेंच काय ? केवढें विशाल अंतःकरण आणि केवढी दयाशीलता !

**शिष्यः**—पण बुद्धाचें तरी हें दुसऱ्या प्रकारचें वेड नव्हे तर काय ? क्षुद्र पशूसाठीं स्वतःचा देह अर्पण करावयाचा हा दयेचा अतिरेक म्हणजे वेडच.

**स्वामीजीः**—पण बुद्धाच्या या वेडांतून जगाचें केवढें कल्याण झालें आहे याचा विचार कर. या वेडांतून लोककल्याणाच्या किती संस्था निर्माण झाल्या हें पहा. बुद्धजन्मानतर मानवी संस्कृतीचें पाऊल निःसंशय पुढें पडलें आहे. बुद्धाच्या आगमनापूर्वी येथें काय धूळ होती ? गाठोड्यांत बांधलेलीं कांही उच्च प्रमेयें येथें होती. अशा तत्त्वाचे ताडपत्रांचे थोडेसे भारे कोणीं कोणी आपल्या अडगळीच्या खोलीत भरून ठेवले होते. भगवान् बुद्धांनी हे भारे बाहेर आणले, आणि त्यातील तत्त्वांचा व्यवहार करून दाखविला. रोजच्या सामान्य व्यवहारांत ते त्यांनीं चालते बोलते केले. भगवान् बुद्ध म्हणजे मूर्तिमंत वेदान्त होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

**शिष्यः**—पण महाराज, बुद्धानें वर्णाश्रमधर्म धुळीला मिळविला याची वाट काय ? त्याच्या या कृतीनें हिंदुधर्माचा पायाच उखडला गेला नाहीं काय ? त्याच्या आगमनानें धर्माची उत्क्रांति झाली नसून क्रांति झाली. त्याचीं मतें सनातनधर्माला विघातक होतीं म्हणूनच बौद्धधर्म येथून निर्मूल झाला, असें कोणी म्हणतात, त्यांत सत्याचा बराच अश असावा असें मला वाटतें.

**स्वामीजीः**—बौद्ध धर्माची अवनतावस्था झाली आणि त्याचें उच्चाटन येथून झालें, याचें कारण बुद्धाचीं तत्त्वें नव्हत. मागून झालेल्या बौद्धांच्या अपराधाचेंच हें फळ आहे. बुद्धाच्या अवसानानंतर बौद्ध भिक्षु जडपंडित बनूं लागले. बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचा काथ्याकूट करण्याकडे त्यांचें लक्ष अधिक लागलें. यामुळें त्यांची बुद्धि वाढली, पण अंतःकरण शुष्क झालें. पुढें त्यांच्यांत वामाचार शिरू लागले. यांतील कांहीं विधी तर इतके किळसवाणे आहेत कीं, अर्वाचीन तंत्रविधीसुद्धां त्यांपुढें फिक्के पडतात. जगन्नाथपुरी हें बौद्धांचें एक मोठें पीठ होतें. पुरीच्या देवळावर त्या काळीं काढलेलीं बीभत्स चित्रें पहा,

म्हणजे बौद्धधर्म किती गलिच्छ झाला होता याबद्दल तुझी खात्री होईल. श्री-रामानुज आणि श्रीचैतन्यदेव यांच्या कालापासून पुरीचा ताबा बौद्धांच्या हातून गेला.

**शिष्यः**—महाराज, क्षेत्रांबद्दल शास्त्रांनीं विशेष उल्लेख केले आहेत. क्षेत्र-भूमींत कांहीं विशेष गुण असतात असें शास्त्रवचन आहे. हें म्हणणें कितपत खरें आहे ?

**स्वामीजीः**—अरे, सारें जग हा परमात्म्याचा देह. त्याचें तेज एखाद्या विशिष्ट अवयवांत आधिक्यानें प्रकट झालें, तर त्यांत मोठें आश्चर्य तें काय ? एखाद्या स्थळीं तो विशिष्टत्वानें प्रगट होणें अशक्य नाहीं. कांहीं विशुद्ध जीवात्म्यांच्या इच्छेनें तसें होऊं शकेल अथवा कांहीं अदृश्य कारणांनींही अशी गोष्ट घडून येईल. अशा स्थितींत एखादा यात्रिक खऱ्या सद्भावनेनें तेथें गेला, तर त्याचा मार्ग त्याला अधिक सुकर होईल, हें उघड आहे. पवित्र स्थळीं गेल्यानें आत्मविकासाला थोडीबहुत मदत होणें शक्य आहे. तथापि मानवदेह हा सर्वांचा तीर्थराज आहे, हें विसरूं नको. आत्मा जसा येथें प्रकट झाला आहे, तसा दुसऱ्या कोणत्याही स्थळीं तो झालेला नाहीं. जगन्नाथाचा रथ म्हणजे या देहरथाचा एक प्रतिनिधीच आहे. '**आत्मानं रथिनं विद्धि**' हें वचन तूं कोठें वाचलें नाहींस का ? '**मध्ये वामनमासीनं विश्वेदेवा उपासते।**' जगन्नाथ हें आत्म्याचेंच एक व्यक्तरूप आहे. '**रथे च वामनं दृष्ट्वा पुनर्जन्म न विद्यते।**' रथस्थ वामनाचें दर्शन झाल्यानंतर पुनः जन्म नाहीं, याचा अर्थ हाच कीं तुझ्या स्वतःच्या ठिकाणीं असलेल्या आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव तुला झाला, कीं तुझ जाणें येणें संपलें. तुझ्या सध्यांच्या स्थितींत आत्मा आणि देह हे तूं एकरूपानें पहात आहेस. जड वस्तु आणि चैतन्य यांतील भेदाचा अनुभव तुला होत नाहीं, यामुळें आत्म-रूप म्हणजे शुद्ध चैतन्य आहे हेंही तुला कळत नाहीं. यासाठीं हें ज्ञान अनुभवानें तुला प्राप्त झालें म्हणजे 'मी देह' हा तुझा भ्रम कायमचा जाईल आणि जड वस्तूशीं सांप्रतचा तुझा असलेला संबंध कायमचा तुटेल. लाक-डाच्या रथांत बसविलेल्या जगन्नाथाच्या मूर्तीला पाहून कोणी मुक्त होत असता, तर दरवर्षी कोट्यवधि लोक मुक्त झाले असते. त्यांतून सध्यां आगगाडीमुळें तर लांबचा प्रवासही अगदीं सोपा झाला आहे. आतां या

भाविक यात्रेकरूंची थट्टा मी करतों असें मात्र समजूं नको. त्यांच्या ठिकाणीं असलेली भावना चुकीची अथवा अर्थशून्य आहे, असा माझ्या म्हणण्याचा आशय नाहीं. मूर्तिदर्शनाच्या आरंभाच्या पायरीपासून निघून हळूहळू अधिकाधिक उच्च मार्गाचें आक्रमण करणारे पुष्कळ लोक अस्तित्वांत आहेत, हेंही मला ठाऊक आहे. मूर्तिदर्शनाचा एवढा प्रत्यक्ष लाभ दिसत असतां मूर्तींत कांहींच तात्पर्य नाहीं असें कसें म्हणावें ? तिच्यांतही परमात्मरूपाचा आविर्भाव झालेला आहे.

**शिष्यः**—महाराज, तर मग अडाण्याचा धर्म वेगळा आणि विद्वानांचा वेगळा असें समजावयाचें काय ?

**स्वामीजीः**—अर्थात्. तस नसतें तर मुमुक्षा प्राप्त होण्यासाठीं अमुक अमुक गुण अंगी आणले पाहिजेत, असें शास्त्रांनीं इतक्या अट्टाहासानें कां सांगितलें असतें ? '**सर्वं खल्विदं ब्रह्म**' ही गोष्ट खरी, पण प्रत्यक्षत्वास आलेल्या अनेक ब्रह्मरूपांत सत्यवस्तूचा आविर्भाव कमीअधिक प्रमाणानें झालेला असतो. सर्वत्र सारख्या अंशानें तें व्यक्त झालेलें नाहीं. अमुक एक सत्यरूप अशी जी कल्पना मनुष्य करितो, ती कल्पनाही सापेक्ष असते. इतर वस्तूंच्या तुलनेनें तो असें म्हणत असतो. त्याची कल्पना म्हणजे निरपेक्ष अथवा शुद्ध सत्य नव्हे. शुद्ध सत्यरूप म्हणजेच परमेश्वर. जड वस्तूंतील ब्रह्मरूप आपणास अगोचर असतें. मनुष्याच्या ठिकाणीं तेंच रूप अधिक स्पष्टत्वानें तथापि कांहीं अंशानें मात्र प्रत्ययास येतें; आणि तेंच रूप कृष्ण, बुद्ध, शंकराचार्य इत्यादिकांच्या ठिकाणीं मनातीत स्थितीला पोंहोंचलेलें असतें. या मनातीत स्थितीच्याही पलीकडची एक स्थिति असून शास्त्रांनीं तिचें वर्णन '**अवाङ्मनसगोचरम्**' असें केलें आहे.

**शिष्यः**—महाराज, परमेश्वर हा आपणांहून अत्यंत श्रेष्ठ आहे, या भावनेनेंच त्याची सेवा केली पाहिजे, असें म्हणणारे कांहीं भक्तिपंथ आहेत. तुमचें हें आत्म्याचें श्रेष्ठत्व अथवा त्याचें सर्वव्यापित्व असल्या बाबी त्यांना कळत नाहींत. आपण सदोदित भक्तच राहिलें पाहिजे अस ते म्हणतात.

**स्वामीजीः**—त्यांचें म्हणणें त्यांच्यापुरतें खरें आहे. पण नितांत भक्ति त्यांच्या चित्तांत बाणली म्हणजे त्यांच्याही अंतरंगांत ब्रह्मरूप जागृत होऊं लागेल. अरे, आम्हां संन्याशांचा मार्ग हीसुद्धां एक वेगळ्या प्रकारची भक्तीच आहे. आतां आम्ही लौकिक सोडला असल्यामुळें परमात्म्याचें लौकिक रूप

आम्हीं कसें मान्य करावें ? याकरितां माता, पिता, पुत्र अशा नात्यानें परमेश्वराकडे आम्हीं पहात नाहीं. हीं स्वरूपें आमच्या दृष्टीनें आकुंचित दिसतात. आतां परमेश्वराच्या निरपेक्ष रूपाची भक्ति करणें हा मार्ग अत्यंत कठिण आहे हें खरें, तथापि अमृताच्या आशेनें विषाचे पेले पिण्याची तुमची तयारी असली पाहिजे. आमच्या मार्गांत नित्यानित्य विवेक ही पहिली वस्तु आहे. नित्यवस्तूशिवाय कांहीं बोलावयाचें नाहीं आणि ऐकावयाचेही नाहीं असा आमचा निश्चय असला पाहिजे. अशा मार्गानें तू चाललास तर तुझ्या ठिकाणीं निद्रित असलेला सिंह कालेंकरून खचित जागृत होईल. परमेश्वर माझा पिता अथवा तो माझी माता या भावना म्हणजे नुसते मनाचे खेळ. हे खेळ टाकून तूं पलीकडे जा. या सापेक्ष सृष्टीच्या पलीकडे उडी मार. '**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान्निबोधत**' हें कठोपनिषद्वचन ध्यानांत ठेव.

इतक्यांत प्रसादवेळा झाल्याची घंटा ऐकू आली. तेव्हां आमचें संभाषणही येथेंच थांबलें. प्रसादग्रहणासाठीं स्वामीजी उठले आणि शिष्यही त्यांच्या मागोमागचालता झाला.

***

[ १५ ]

[ **स्थळः**—बेलूर येथील मठ, १८९८. ]

स्वामीजींनीं मठाचें स्थळ बदलून आलंबाजारांतून तें बेलूर येथील नीलांबरबाबूंच्या बगीच्यांत आणलें. हें स्थळ स्वामीजीस फारच आवडलें. शिष्य प्रथमच तेथें आला, तेव्हां ते त्याला म्हणाले, 'गंगेचा प्रवाह येथून किती जवळ आहे पहा. ही इमारतही मोठी सुंदर आहे. हें स्थळ मला आवडतें. मठाला अगदीं असावी तशी ही जागा आहे.'

संध्याकाळच्या वेळीं वरील मजल्यावर स्वामीजी एकटेच बसले असतां शिष्य तेथें गेला. बऱ्याच विषयांवर या वेळीं संभाषण झालें. स्वामीजींच्या बाल्याचे दिवस कसे गेले, हें जाणण्याच्या हेतूनें तशा अर्थाचा प्रश्न स्वामीजींस शिष्यानें केला असतां ते म्हणाले, 'लहानपणापासूनच मी निःसंगवृत्तीचा मुलगा होतों. कसलीही पर्वा न करितां मला वाटेल त्या रीतीनें मी वागत असे. कसल्याही प्रसंगाची भीती मला कधींच वाटली नाहीं. मी अशा

अफाट छातीचा नसतों तर जगाचा प्रवास मी करूं शकतों काय ? त्यांतून माझ्या खिशांत तांब्याचेंसुद्धां एक नाणें नव्हतें. '

रामायणकथा ऐकण्याची अतिशय गोडी स्वामीजींस लहानपणीं होती. जवळपास एखाद्या पुराणिकानें रामायण सुरू केल्याचें त्यांना समजलें तर खेळबीळ सारें टाकून देऊन ते त्या स्थळाकडे धांव घेत. रामकथा श्रवण करतां करता त्यांचें चित्त कित्येक वेळां तीत इतकें गढून जाई कीं, त्यांना घराचें अथवा वेळाचें भान रहात नसे. एके दिवशी कथेत हनुमानाचा विषय निघाला होता. हनुमान कर्दळी वनांत राहातो हें वाक्य ऐकून स्वामीजीच्या चित्तावर त्याचा एवढा परिणाम झाला की, पुराणसमाप्तीनंतर घरीं न जातां जवळच्या केळीच्या बागत ते जाऊन बसले. बरीच रात्र झाली तरी हनुमान कोठें दिसत नाहीसा पाहून ते घरी गेले.

लहानपणीं दिवसाचा सारा वेळ स्वामीजी उनाडपणांत आणि खेळण्यांत घालवीत. मग रात्री घरीं येऊन दार बंद करून ते अभ्यासास बसत. हा मुलगा शाळेचे अभ्यास तरी करितो की नाही याचीच शंका पुष्कळांस येई.

शिष्यानें विचारलें, 'महाराज, तुमच्या लहानपणी तुम्हांस कधीं दृष्टांत झाले होते काय ? '

**स्वामीजीः**—शाळेंत असतां मी एके दिवशीं रात्रीं घरीं ध्यानाला बसलों. आजूबाजूच्या वस्तुस्थितीचा बराच विसर मला पडला होता. अशा रीतीनें मी किती वेळ बसलों याचें भान मला नव्हतें. भानावर आल्यानंतरही आणखी कांहीं वेळ मी तसाच बसलों होतों. इतक्यांत दक्षिण बाजूच्या भिंतींतून एक तेजस्वी मूर्ति बाहेर येऊन मजपुढें उभी आहे असें मला वाटलें. त्या मूर्तीच्या चेहऱ्यावर कांहीं अलौकिक तेज झळकत होतें. तथापि तिच्या चेहऱ्यावर कोणताही विकार मला दिसत नव्हता. ही संन्याशाची मूर्ति होती. त्याच्या हातांत दंडकमंडलु असून तो अगदीं शांतपणें उभा होता. त्या संन्याशानें कांहीं वेळ मजकडे अवलोकन केलें. माझ्याशीं कांहीं तरी बोलण्याची त्याची इच्छा होतीसें दिसलें. आश्चर्यानें स्तब्ध होत्साता त्याजकडे मी पहात होतों. इतक्यांत काय झालें कोण जाणे एकाएकीं मला इतकी भीति वाटली कीं, खोलीचें दार उघडून मी तडक बाहेर आलों. पाठीमागून या

मूर्खपणाचा पश्चात्ताप मला झाला. यानंतर असें दर्शन मला पुन्हां घडलें नाहीं. असा प्रसंग पुन्हां आल्यास भ्यावयाचें नाहीं आणि त्याच्याशीं कांहीं तरी संभाषण करावयाचें असें आपल्या मनाला मी वारंवार पढवीत असें. पण पुन्हां तसा प्रसंगच आला नाहीं.

**शिष्यः**—यानंतर या गोष्टीचा विचार आपल्या चित्तांत कधीं येत असे काय ?

**स्वामीजीः**—होय, पुष्कळ वेळां. तथापि या प्रकाराचा उलगडा मला केव्हांच झाला नाहीं. मला बुद्धदर्शन झालें असावें असे आतां माझ्या मनांत येतें.

थोडा वेळ थांबून स्वामीजी पुढें म्हणाले, "कनककामिनीचा विचार चित्तांतून नाहींसा होऊन तें शुद्ध झालें म्हणजे असे दृष्टात अनेकवार होतात. त्यांतील कांही तर अत्यंत चमत्कृतिजनक असतात. तथापि अशा गोष्टीकडे लक्ष न देणें चांगलें. या दृष्टांताचाच विचार साधकाच्या मनांत वारंवार येऊं लागला तर त्याचें पाऊल पुढें पडेनासें होतें. 'माझ्या मातेच्या मंदिराच्या अगणांत असंख्य रत्नें विखुरली आहेत; पण त्यांजकडे मी ढुंकूनही पहात नाहीं' असें श्रीरामकृष्ण म्हणत असल्याचें तुझ्या कानीं आले नाहीं काय ? आत्मदर्शन ही एकच अगत्याची बाब आहे. मग असल्या वाह्यात गोष्टीकडे लक्ष देण्यांत काय फायदा ?"

इतकें बोलून स्वामीजी कांहीं काळ स्तब्ध राहिले. त्यांचें मन कोणत्या विचारांत गढलें होतें नकळे. थोड्या वेळानें ते पुन्हां बोलूं लागलेः——

"अमेरिकेंत असतां कांहीं सिद्धी माझ्या अंगीं आल्या होत्या. कोणाच्याही डोळ्यांकडे पाहून त्याच्या मनांत काय चाललें आहे हें मला तत्काळ समजे. प्रत्येकाच्या मनांतली गोष्ट समोर मांडल्यासारखी मला दिसे. कित्येकांजवळ त्यांच्या मनांतले विचार मी बोलूनही दाखवीत असें आणि यांपैकीं बरेचसे लोक माझे शिष्य होत. कांहीं माणसें स्वार्थी हेतूनेंही येणारीं होतीं. अशांना माझ्या या अंतर्दृष्टीचा प्रत्यय आला कीं, पुन्हां कधींही माझ्या वाटेस तीं उभीं रहात नसत. फार काय पण माझ्यासमोर येण्यास सुद्धां त्यांची छाती होत नसे.

शिकागो आणि दुसरीं शहरें येथें माझी व्याख्यानमाला सुरू झाली तेव्हां आठवड्यास बारा, पंधरा अथवा अधिकही व्याख्यानें मला द्यावीं लागत. देह आणि मन यांना हा भार असह्य होऊ लागला. नवे नवे विषयही मला सुचेनासे झाले. दुसऱ्या दिवसाच्या भाषणाला काय विषय घ्यावा हें मला समजेनासें झालें. नवे विचार जणू काय अदृश्यच झाले. आतां पुढें काय करावें याचा विचार करीत मी स्वस्थ पडलों होतों. पडल्यापडल्या मला थोडीशी गुंगी आली. इतक्यांत मजसमोर उभें राहून कोणी तरी भाषण करीत आहे असे मला दिसलें. त्या कालापर्यंत माझ्या मनांत कधीही न आलेले विचार आणि कल्पना हीं मला ऐकूं येऊं लागलीं. मी जागा झाल्यानंतर हे सारे विचार मला आठवले आणि माझ्या व्याख्यानांत ते जसेच्या तसेच मीं बोलून दाखविले. असा प्रकार किती वेळां घडला हें मला निश्चयानें सांगतां येत नाही. तथापि, अंथरुणावर पडल्यानंतर अशीं मूक व्याख्यानें मी कितीं तरी दिवस ऐकलीं. यांत आणखीही एक चमत्कार केव्हां केव्हां घडे. कित्येक वेळां स्पष्ट ऐकतां येण्याजोग्या आवाजानें तीं सुरू होत; कित्येक वेळ हा आवाज इतका मोठा असे कीं, शेजारच्या खोलीतील लोक त्याबद्दल दुसऱ्या दिवशीं मला विचारीत. ते म्हणत, ‘ स्वामीजी, गेल्या रात्रीं येवढया मोठ्यानें तुम्ही कोणाजवळ बोलत होतां ? ’ या प्रश्नाचें उत्तर देणें मी कसे तरी टाळीत असें. खरोखर हा अनुभव अत्यंत आश्चर्यजनक होता.

स्वामीजींचें हें भाषण ऐकून शिष्यालाही अतिशय नवल वाटलें. तो स्वामीजींना म्हणाला, ‘ महाराज, तुम्ही स्वतःच सूक्ष्म देहानें हीं व्याख्यानें देत असाल असें तर नाहीं ना ? सूक्ष्म देहांतून निघणाऱ्या ध्वनीचा प्रतिध्वनि स्थूल देहांतून उमटत असेल.’ यावर स्वामीजी म्हणाले, ‘ कदाचित् असेही होत असेल.’

पुढें अमेरिकेसंबंधीं आणखी गोष्टी निघाल्या असतां स्वामीजी म्हणाले, ‘ अमेरिकेत पुरुषापेक्षां बायकाच अधिक शिकलेल्या असतात. अर्वाचीन भौतिक शास्त्रें आणि तत्त्वज्ञान या विषयांत त्या चांगल्या प्रवीण असतात. यामुळेंच माझ्या भाषणांकडे पुरुषांपेक्षां स्त्रियांचें चित्त अधिक वेधलें. पुरुष सारा दिवसभर आपल्या कामाच्या रगाड्याखालीं भरडून निघत असतात. इतर गोष्टींकडे पाहाण्याची फुरसतच त्यांस फार करून नसते. उलटपक्षीं,

स्त्रियांचा धंदा अध्ययन आणि अध्यापन इतकाच असल्यामुळें त्यांना मोकळा वेळ बराच असतो आणि त्याचा उपयोग उच्च शिक्षण घेण्याकडे त्या करितात. अमेरिकन समाजाच्या कोणत्याही अंगाकडे तुम्ही पहा, तेथें स्त्रियांची सत्ता आणि वजन यांचा प्रत्यय तुम्हांस येईल.'

**शिष्यः**—महाराज, जुनाट ख्रिस्ती भटांकडून तुम्हांस कांहीं उपद्रव झाला नाहीं काय ?

**स्वामीजीः**—त्यांनी पुष्कळ अडथळा केला. लोकांत माझा मानमरातब वाढूं लागतांच पाद्री माझ्या मागें लागले. माझ्या निंदेच्या अनेक खोट्यानाट्या भाकडकथा वर्तमानपत्रांतून त्यांनीं प्रसिद्ध केल्या. या निंदकांना चरचरीत उत्तर द्यावें, अशी सूचना माझ्या मित्रमंडळीनें केली. पण त्यांची उपेक्षा करणें हाच उत्तम पक्ष असें समजून मी स्वस्थ बसत असें. असल्या क्षुल्लक हातचलाख्यांनीं कोणतेंही महत्त्वाचें कार्य सिद्ध होत नाहीं, अशी माझ्या मनाची पक्की खात्री झाली आहे. यामुळें असल्या निंदेकडे ढुंकूनही न पाहतां माझा कार्यभाग मी निश्चयानें चालवीत होतों. कित्येक वेळा माझ्या या वर्तणुकीचा परिणाम असा होई कीं, माझ्या कांहीं निंदकांना पश्चात्ताप होऊन ते आपण होऊनच माझी क्षमा मागत. कित्येक वेळां याहून आणखी मौजेचे प्रकार घडत. कोणी कोणी मला घरीं भेटण्यासाठीं बोलावीत. अमक्या मोठ्या गृहस्थानें मला घरी बोलाविलें आहे, अशी बातमी एखाद्या निंदकाला लागली म्हणजे मालकाला भेटून माझ्या मनसोक्त निंदेनें त्याचे कान तो भरी; आणि मग भेटीच्या वेळीं दाराला कुलूप लावून मालकसाहेब कोठें चालते होत. तेथें जाऊन पहावें तों दाराला कुलूप आणि सर्वत्र शुकशुकाट. पुढें कांहीं दिवसांनीं वस्तुस्थिति अशा गृहस्थांच्या ध्यानीं आली म्हणजे मजकडे येऊन अंतःकरणपूर्वक ते माझी क्षमा मागत आणि माझे शिष्य होत. माझ्या मुला, हें सारें जग अनेक स्वार्थी लोकांनीं भरलें आहे. आपला क्षुद्र स्वार्थ साधण्यासाठीं हव्या त्या हलक्या मार्गाचा अवलंब हे लोक करितात. पण ज्याला थोडा बहुत विवेक आहे आणि ज्याची बुद्धि जागृत आहे, असा कोणीही मनुष्य असल्या हातचलाखीनें फसत नाहीं. जगानें कांहींही बडबड केली तरी तिकडे लक्ष न देतां आपला कर्तव्याचा मार्ग एकसारखा चालत राहाणें हेंच शूराला उचित आहे. आज हा असें बोलला आणि उद्यां कोणी

**दुसरेंच** कांही म्हणाला अशा गोष्टीकडे अहोरात्र लक्ष जात राहिलें तर त्याच्या हातून कोणतेंही महत्कार्य व्हावयाचें नाही. ‘ **निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु । लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥ अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा । न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥ १ ॥**’ हा भर्तृहरीचा श्लोक आपण हृदयांत बाळगावा. समुद्रप्रवासाला निघालेल्या तारवाला किती तरी वादळांना तोंड द्यावें लागतें; आणि अनंत लाटावर हेलकावे खावे लागतात. पण पूर्वनियोजित बंदराची दिशा त्यानें सोडली नाही म्हणजे तें अखेरीस तेथे पोचल्यावांचून राहात नाही. मनुष्याची कीर्ति जो जो वाढत जाते तों तों अधिकाधिक प्रखर दिव्यांतून त्याला पार पडावें लागतें. हीं दिव्यें म्हणजे त्याच्या कसोट्याच होत. त्यांजवर घांसून तो हिणकस ठरला नाही म्हणजेच जग त्याला महत्पदाला चढवितें. कच्च्या दिलाचा आणि भेकड मनुष्य आपलें जहाज किनाऱ्याजवळच बुडवितो. क्षितिजाकडे उसळणाऱ्या उंच लाटांकडे नुसतें पाहूनच त्याची बोबडी वळते. खरा धीर असतो त्याला या लाटांचें अस्तित्वच भासत नाहीं. वाटेल तें होवो मी माझें साध्य निश्चयानें सिद्ध करणार येवढेंच तो म्हणत असतो. खरें पौरुष हेंच. हें ज्याच्या आंगीं नसेल त्याला प्रत्यक्ष परमेश्वराच्या मदतीनेंही काही करितां येणार नाहीं.

**शिष्यः**—परमेश्वराच्या मदतीवर अवलंबून राहाणें हें दुबळेपणाचें आहे काय ?

**स्वामीजीः**—तनमनधनादि सर्वस्व परमेश्वराला अर्पण करून आपला भार सर्वस्वी त्याच्यावर टाकणें ही पुरुषार्थाची अखेर होय, असे शास्त्रें म्हणतात. पण तुझ्या या देशांत देव अथवा दैव यांना जो अर्थ प्राप्त झाला आहे तो मात्र मृत्यूचा दर्शक आहे. सांप्रतच्या काळी देवावर अथवा दैवावर अवलंबून राहणारे आपले लोक शुद्ध मृत्पिंड आणि शुद्ध भेकड असतात. परमेश्वराची एखादी भयाकारी कल्पना आपल्या निःसत्त्व मेंदूंत उभी करून आपल्या साऱ्या मूर्खपणाचा आणि दुबळेपणाचा भारा त्याच्या डोक्यावर देणें हाच सध्यांच्या दैववादाचा अर्थ आहे. याविषयीं श्रीरामकृष्ण एक गोष्ट सांगत असत. एका गृहस्थानें एक सुंदर बाग केली होती. एके दिवशीं एक गाय त्या बागेत शिरली आणि तिनें झाडांची बरीचशी नासाडी केली. हें पाहून त्या गृहस्थानें संतापानें त्या गाईला इतकें बडविलें की, ती तेथेंच मरून

पडली. आतां आपल्या या पातकाचें निराकरण कसें करावें याचा विचार तो करूं लागला. अखेरीस एक समाधानाचा मार्ग त्याला सुचला. हस्ताची देवता इंद्र आहे: त्या अर्थी हें महापातक त्यानेंच केलें असें म्हटलें पाहिजे. आपल्यावर आलेला हा आळ घालविण्याकरितां ब्राह्मणाच्या रूपानें इंद्र तेथें येऊन उभा राहिला. 'ही बाग कोणाची, हिला पाणी कोणीं घातलें, हिची निगा कोणीं राखिली' असे अनेक प्रश्न त्या गृहस्थास इंद्रानें केले. त्या साऱ्या प्रश्नांना 'मी' 'मी' हें एकच उत्तर त्यानें दिले. तेव्हां इंद्र त्याला म्हणाला, 'भल्या माणसा, बाकीची सारी कामे मात्र तूं केलीस आणि गोहत्येचें महापातक तेवढें इंद्रानें केलें काय? शाबास!'

आज पुष्कळशी माणसे अशाच प्रकारें वागत असतात. 'देवानें बुद्धि दिली तसा मी वागलों' असें सारे म्हणत असतात. जणूं काय, हे योगी असून भलींबुरी सारी फळें ईश्वरार्पण करून पाण्यांतील कमळाच्या पानाप्रमाणें अलिप्त राहातात! प्रत्येकाला खऱ्या अलिप्तपणानें जगांत वावरतां आलें असतें तर काय हवें होतें? ज्याला खरोखर असे राहातां येईल तो जीवन्मुक्त असें तूं समज. पण खरोखर काय होत असतें पहा. कांहीं चांगलें झालें तर तें मीं केलें; आणि कांहीं वाईट झालें, कीं त्याचें पातक देवाच्या बोडक्यावर फुटलेंच. नमस्कार असो अशा भक्तीला. भक्तीचें खरें रहस्य अथवा ज्ञानाची अत्युच्च दशा हृदयांत बाणेपर्यंत भक्तीच्या गोष्टी बोलणें फुकट आहे. एवढी उच्च दशा प्राप्त होईपर्यंत भक्ति या शब्दाचा अर्थही कळावयाचा नाहीं. मग आत्मसमर्पण कोठलें? ज्यानें आपलें सर्वस्व ईशचरणीं अर्पण केलें आहे असा मनुष्य द्वंद्वातीत स्थितीला गेलेला असतो. हें बरें आणि तें वाईट अशी जाणीव त्याच्या बुद्धीला होत नाहीं. कारण ती बुद्धि या जाणिवेच्या पलीकडे गेलेली असते. सांप्रतच्या काळीं भक्तीची इतकी उत्कट स्थिति ज्यांना प्राप्त झाली असे एक नाग महाशय मात्र मीं पाहिले.

येथें आमच्या संभाषणाचा ओघ नाग महाशयांकडे वळला. स्वामीजी म्हणाले, 'त्यांच्यासारखा दुसरा भक्त माझ्या आयुष्यांत मीं दुसरा पाहिला नाहीं. अहाहा! त्यांचें दर्शन पुन्हां केव्हां होईल असें मला झालें आहे.'

**शिष्यः**—आपल्याला भेटण्यासाठीं महाशय कलकत्त्याला येणार आहेत, असें पत्र मातोश्रींकडून ( नाग महाशयांची पत्नी ) मला नुकतेंच आलें आहे.

**स्वामीजीः**—त्यांची तुलना श्रीजनकाशीं भगवान् करीत असत. सर्व इंद्रियांवर इतका संयम मिळविलेला दुसरा कोणी माझ्या ऐकिवांतसुद्धां नाहीं, मग अशाचें दर्शन तें कोठलें? नाग महाशयांच्या सान्निध्याचा लाभ तुला जितका घेतां येईल तितका घे. परमहंसांच्या अगदी अंतरंगांतल्या शिष्यांपैकीं ते एक आहेत.

**शिष्यः**—आमच्या प्रांतांतील लोक त्यांना वेडा बाबू म्हणतात. पण त्यांचें प्रथम दर्शन मला झालें तेव्हांच हे कोणी महापुरुष असावे असें माझ्या मनाला वाटलें. मी त्यांजकडे जाऊं येऊं लागलों. त्यांचेंही मजवर फार प्रम जडलें आहे. ते मला नेहमी मनःपूर्वक आशीर्वाद देत असतात.

**स्वामीजीः**—अशा महापुरुषाच्या संगतीचें भाग्य तुला प्राप्त झालें. मग तुला भय कशाचें? अशा एका पुण्यात्म्याच्या दर्शनानें अनंत जन्म तपस्या केल्याचें फळ मिळतें. हल्ली घरीदारी त्यांची काय हकीकत आहे?

**शिष्यः**—महाराज, त्यांना कामधंदा कसलाच नाही. अभ्यागतांच्या सेवेंत ते सदा चूर असतात. जी थोडीशी रक्कम पालबाबू पाठवितात तेवढेंच काय तें चरितार्थाचें साधन. त्यावांचून दुसरी कसलीच मिळकत त्यांना नाहीं; आणि खर्च पहावा तर सावकारी थाटाचा. तथापि येवढया खर्चापैकीं त्यांच्या स्वतःच्या देहाकडे एक कवडीही खर्च होत नाहीं. सारा खर्च लोकांसाठीं. लोकसेवा–जनसेवा हें एकच त्यांचें अवतारकाय दिसतें. त्यांना सर्वत्र समदृष्टि प्राप्त झाली असावी असें केव्हां केव्हां माझ्या मनांत येतें. 'आत्मवत्सर्वभूतेषु' या नात्यानेंच ते जनसेवा करीत असावे. कोणाची तरी सरबराई करण्यांत ते इतके गढून गेलेले असतात कीं, स्वतःच्या देहाचेंही भान त्यांना नसतें. आपण जिला सहजसमाधि म्हणतां तीच ही स्थिति असावी अशी माझी कल्पना आहे.

**स्वामीजीः**—आणि तसें तरी कां नसावें? श्रीरामकृष्णांचें त्यांजवर केवढें प्रेम होतें, याची तुला कल्पना आहे? तुझ्या पूर्व बंगाल्यांत हे दुसरे रामकृष्णच अवतरले आहेत असें समज. त्यांच्या प्रभेनें पूर्व बंगाल प्रकाशमय झाला आहे.

***

[ १६ ]

[ स्थळः—बेलूर येथील मठ, नोव्हेंबर १८९८. ]

स्वामीजींना काश्मीरांतून येऊन आज दोनतीन दिवस झाले होते. त्यांची प्रकृति तितकीशी चागली नव्हती. शिष्य मठांत आला तेव्हां स्वामी ब्रह्मानंद त्याला म्हणाले, 'काश्मीरांतून आल्यापासून स्वामीजींनीं मौन धारण केलें आहे. कोठें तरी एकाच जागीं ते विचारांत चूर होऊन बसलेले असतात. त्यांजकडे जाऊन त्यांना जरा बोलते करा. एहिकाकडे त्यांचें मन वळतें करा पाहूं.'

शिष्य माडीवर गेला तों तेथे स्वामीजी गाढ ध्यानांत निमग्न असलेले त्याला दिसले. त्यांचे डोळे अर्धवट उघडे होते. ते बाह्य वस्तूंकडे पहात आहेत असें त्यांच्या नजरेवरून दिसत नव्हतें. त्यांच्या मुखावर हास्यही दिसत नव्हतें; जणू काय अंतःसृष्टीच्या शोधांत ते निमग्न झाले होते. थोड्या वेळानें त्यांनीं शिष्याकडे पाहिलें आणि त्याला म्हटले, 'बेटा, आलास? बरें तर खाली बैस.' इतकें बोलून ते पुन्हां स्तब्ध झाले. स्वामीजींच्या डाव्या डोळ्याचा कोंपरा लाल झालेला पाहून शिष्य म्हणाला, 'आपला डोळा लाल कशानें झाला?' 'विशेष कांहीं नाहीं.' येवढेंच उत्तर देऊन स्वामीजी पुनः स्तब्ध झाले. बराच वेळ गेला तरी स्वामीजी बोलत नाहीत असें पाहून शिष्य म्हणाला, 'अमरनाथ येथील कांहीं खबरबात मला सांगत नाहीं काय?' इतकें म्हणून त्यानें स्वामीजींच्या पायाला स्पर्श केला. तेव्हां स्वामीजी जरा भानावर आल्यासारखे झाले. बाह्य जगाकडे पहात असल्याची जाणीव त्यांच्या डोळ्यांत दिसूं लागली. ते म्हणाले, 'अमरनाथाचें दर्शन झाल्यापासून माझ्या मस्तकीं शंकर आरूढ झाल्याचा भास मला होत आहे. आपलें स्थान सोडून अद्यापि ते खालीं येऊं इच्छीत नाहींत.' स्वामीजींचें हें भाषण एकून शिष्य चकित होऊन स्तब्ध राहिला. थोड्या वेळानें स्वामीजी म्हणाले, 'अमरनाथ येथें आणि क्षीरभवानीच्या देवळांत बराच काळ मी ध्यानस्थ राहिलों होतों. जरा चिलीम भरून आण पाहूं. मग तुला सारी हकीकत सांगतों.'

स्वामीजी बोलणार या कल्पनेनेंच शिष्याला मोठा आनंद झाला. चिलीम तयार करून आणून त्यानें ती स्वामीजींच्या हातीं दिली. धीरे धीरे धूम्रपान करीत असतां स्वामीजी म्हणाले, 'अमरनाथाच्या दर्शनाकरितां आधीं केवढा तरी पहाड चढावा लागतो. मी गेलों त्या रस्त्यानें सामान्य

यात्रेकरू फार करून जात नाहीत. पण त्या कठीण रस्त्यानेंच जावें अशी बुद्धि मला होऊन मीं तोच रस्ता धरिला. त्या भयंकर चढावाचा परिणाम माझ्या देहावर झाल्यावांचून राहिला नाही. थंडी तर अंगाला जणूं काय बोंचून खाते.'

**शिष्यः**—अमरनाथाचें दर्शन नग्नावस्थेत घ्यावें लागतें असें म्हणतात तें खरें काय ?

**स्वामीजीः**—होय. फक्त कौपीन अंगावर ठेवून आणि सर्व देहाला भस्म लावून मी गुहेंत प्रवेश केला. तेथे असताना शीतोष्णाची यत्किंचितही जाणीव मला झाली नाही. पण बाहेर येताच थंडीनें मी गारठून गेलो.

**शिष्यः**—तेथे कबुतरांची वस्ती आहे, असे मी ऐकतों. आपण कांहीं पाहिली काय ? ती खुद्द त्या गुहेंतच राहातात की, आजूबाजूच्या पहाडांच्या पोकळींत असतात याचा खुलासा मीं ऐकलेला नाही. एवढया थंडीत कोण-तेही प्राणी राहूं शकत नाहीत असेही मीं ऐकले आहे. तथापि कोठल्या तरी अज्ञात स्थळांतून कबूतराचा कळप तेथे वारवार येत असतो असे म्हणतात.

**स्वामीजीः**—तीनचार पांढरीं कबूतरें मला तेथे दिसली खरीं, पण तीं कोठून आली हें मलाही नक्की सांगतां येत नाही.

**शिष्यः**—गुहेंतून बाहेर आल्याबरोबर कबुतरांचें दर्शन झालें तर शिवाचा आशीर्वाद मिळाल्याचें तें चिन्ह आहे असेंही लोक बोलतात.

**स्वामीजीः**—अशी लोकवार्ता मीही ऐकिली आहे. कबुतरें दिसलीं कीं, तुमच्या इच्छा फलद्रूप होऊं लागतात असा लोकांचा समज आहे.

पुढें स्वामीजी म्हणाले, 'परत येतांना मी नेहमीच्या रस्त्यानेंच आलों आणि श्रीनगरला गेलो. तेथे कांहीं दिवस विश्रांति घेऊन मी क्षीरभवानीच्या दर्शनाला गेलों. तेथें सात दिवस राहून देवीची पूजा केली आणि क्षीराचा होम केला. प्रत्येक दिवशी एक मण क्षीर मी अर्पण करीत असें. एके दिवशीं पूजा करीत असतां एक विचार माझ्या मनांत आला कीं, हजारों वर्षें भवानी माता येथें वास करीत आहे. मुसलमानांनीं एकवार तिच्या देवळाची नासधूसही केली. पण येथले लोक इतके मेषपात्र कीं, त्यांच्या प्रतिकारासाठीं एक बोटही कोणी उचललें नाहीं. अरेरे ! त्या वेळीं मी जिवंत असतों तर

हा अनर्थ इतक्या मुकाट्यानें मी सहन केला नसता. या विचारानें माझें मन अत्यंत खिन्न झालें. इतक्यांत हे शब्द मला स्पष्ट ऐकूं आले, 'माझ्याच आज्ञेनें मुसलमानांनीं देवळाचा नाश केला. पडक्या झडक्या जागेंत राहावें ही माझीच इच्छा. अरे वेड्या, माझी मर्जी झाली तर सात मजली सुवर्ण-मंदिर मी येथें उठविणार नाही काय? तुम्हां मर्त्यांचें सामर्थ्य तें काय? तूं माझे रक्षण करणार की मी तुझे?' ही आकाशवाणी ऐकून मी माझ्या मनांतील सारे बेत सोडून दिले. मठ बांधावे, ही माझी पहिली कल्पना-सुद्धां मी आता सोडून दिली आहे. मातेची मर्जी असेल तसे होईल असें म्हणून स्तब्ध राहाणेंच बरें असे मला वाटूं लागले आहे.'

स्वामीजीचे हे उद्गार ऐकून शिष्य आश्चर्यानें मुग्ध होऊन गेला. त्याच्या मनांत पुढील विचारमालिका सुरू झाली. 'मी ऐकलें तें भाषण म्हणजे अंत-रात्म्याचाच प्रतिध्वनि असून बाह्याशी त्याचा काहीं संबंध नव्हता, असें यांनीच मला सागितलें नाही काय?' हा विचार शिष्याच्या मनांत येतांच तो धीटपणानें स्वामीजींना म्हणाला, 'महाराज, अशा प्रकारची वाणी म्हणजे आपल्याच अंतर्गत विचारांचें जड रूपातर असें आपणच मला सांगितलें नाहीं काय?'

स्वामीजी गभीरपणें म्हणाले, 'ही वाणी आंतली असो की बाहेरची असो, पण असे अशरीरी शब्द स्पष्टपणें कानांवर आल्यानंतर ते खोटे आहेत असें म्हणण्याची छाती तुला होईल काय? आपण आतां बोलत आहों तशाच स्पष्टपणानें ही आकाशवाणी मला ऐकूं आली.

स्वामीजीचें उत्तर समाधानकारक असल्यामुळें अधिक आक्षेप न घेतां शिष्यानें तें मान्य केलें. मग मृत आत्म्यासंबंधींचा विषय काढून शिष्य म्हणाला, 'भुताखेतांच्या पुष्कळ गोष्टी आपण ऐकतो आणि शास्त्रांनीही या गोष्टी मान्य केल्यासारख्या दिसतात. यांत कांहीं तथ्य आहे कीं हा साराच भ्रम?'

**स्वामीजीः**—या गोष्टी खऱ्या आहेत. आपल्याला दिसत नाहीं तें सारेंच खोटें अस म्हणावयाचें काय? तुझी नजर जेथें पोहोंचूं शकत नाही अशा अंतरावर कोट्यवधि विश्वें परिभ्रमण करीत आहेत. तुला तीं दिसत नाहींत म्हणून त्यांना अस्तित्वच नाहीं काय? पण असल्या गोष्टीच्या विचारांत आपलें मन तूं गुंतूं देऊं नको. असल्या भुताखेतांच्या कथांची उपेक्षा करणें चांगलें.

आत्मानुभव हें एकच ध्येय आपल्या चित्तापुढें असावें. चालू देहांत आत्मानुभव घेणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे. तें तूं साध्य केलेंस म्हणजे पिशाचें आणि समंध आपण होऊन तुझ्या पायीं लागतील.

**शिष्यः**—महाराज, पण भुतेंखेतें प्रत्यक्ष दिसलीं तर देहांतानंतरही अस्तित्व असतें या सिद्धांताचा प्रत्यक्ष अनुभव होऊन मन निःशंक होतें.

**स्वामीजीः**—अरे, तूंही इतका लेंचापेंचा आहेस काय ? तुला मी वीरपुरुष समजत होतों. असल्या भिकार गोष्टीच्या साहाय्याशिवाय तुझा विश्वास दृढ व्हावयाचा नाहीं असें आतां तू म्हणू लागलास कीं काय ? तूं इतकीं शास्त्रें पढलास, श्रुती आणि उपनिषदें वाचलीस, या अनंत विश्वांतील अनेक रहस्यांचा उलगडा तू पाहिलास, आणि एवढें ज्ञान संपादन करून अखेरीस भुतांखेतांच्या साहाय्यानें आत्मज्ञान तूं संपादन करूं पाहतोस, तस्मात् तुझी धन्य म्हटली पाहिजे ! खरोखर ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे !

**शिष्यः**—पण महाराज, स्वतः तुम्हांला कधी भूत दिसलें आहे काय ?

**स्वामीजीः**—माझा कोणी एक आप्त मेला होता आणि त्याचें भूत केव्हां केव्हां मला दिसत असे. मी न ऐकलेल्या कांहीं बातम्याही तें मला सांगत असे. पण असल्या बातम्यांचा पडताळा पाहतां त्यांतील कांही कांहीं खोट्या ठरत. पुढें एका तीर्थाला मी गेलो तेव्हां त्याला मुक्ति मिळावी म्हणून मनःपूर्वक मी देवाची प्रार्थना केली आणि तेव्हांपासून तें भूत मला पुन्हां दिसलें नाहीं.

यानंतर श्राद्धादि विधींचा प्रश्न निघाला. श्राद्धादि क्रिया आणि दानें केलीं असतां मृत आत्मे संतुष्ट होतात हें खरें आहे काय, असा प्रश्न शिष्यानें विचारला असतां स्वामीजी म्हणाले, ' असें होणें अगदींच अशक्य नाहीं. तथापि या प्रश्नाची तुझ्याशीं बरीच चर्चा मी पुढेंमागें करीन. श्राद्धादि विधींनीं मृत जीवात्मे संतुष्ट होतात याला चोख पुरावे आहेत. पण आज माझी प्रकृति बरी नसल्यामुळें पुढें एखादे वेळीं या विषयाची सांगोपांग माहिती मी तुला देईन.'

पण हा प्रश्न पुन्हां काढण्याची संधीच शिष्याला मिळाली नाहीं.

* * *

[ १७ ]

[ **स्थळः**—बेलूर येथील मठ, नोव्हेंबर १८९७. ]

श्रुतींचा अभ्यास आणि त्यावर वादविवाद यांत स्वामीजींचें लक्ष सध्यां बरेंच गुंतलें आहे. 'ॐ, ऱ्हीं, ऋतं' अशा रीतीनें आरंभ होणारें एक स्तोत्र स्वामीजींनीं आज रचिलें; आणि लिहिलेला कागद शिष्याच्या हातीं देऊन त्याला ते म्हणाले, 'यांत कांहीं छंदोभंगादि दोष आहेत कीं काय तें पहा बरें?' शिष्यानें त्याची एक नक्कल करून आपल्या खिशांत घातली.

आज भगवती सरस्वती स्वामींच्या जिह्वाग्रीं आरुढ झाली होती असें वाटलें. शिष्याबरोबर सुमारें दोन तास सुंदर संस्कृतांत त्यांनी अस्खलित भाषण केलें. नंतर स्वतः लिहिलेल्या स्तोत्रासंबधी ते म्हणाले, 'विचारांत गढून जाऊन मी कांहीं लिहिलें तर त्यांत व्याकरणाचे वगैरे दोष असतात. याकरितां तें स्तोत्र जरा काळजीपूर्वक पहा.'

**शिष्यः**—ते कांहीं दोष नव्हत. कवी बोलून चालून निरंकुश, आणि उत्तान बुद्धीला इतकी सूट पाहिजेच.

**स्वामीजीः**—हवें तर तूं तसें म्हण. पण तुझें म्हणणें लोकांनीं कां मान्य करावें? परवांच एक निबंध मी लिहिला होता आणि त्यांतील बंगाली भाषा फार जड आहे असा आक्षेप तुम्हांपैकीच पुष्कळांनी घेतला. कालांतरानें वस्तूला शिळेपणा येऊन ती निर्जीव होते. भाषा आणि विचार यांनाही हाच नियम लागू आहे. आमच्या देशांत आज अशीच स्थिति झाली आहे असें मला वाटतें. श्रीरामकृष्णांच्या आगमनानतर या वाक्प्रवाहाची दिशा बदलली. नवी विचारसरणी आणि नवी भाषा यांचा उद्भव झाला. आतां जुन्या विचारांनाही हें नवें वळण लावलें पाहिजे. जुनीं नाणीं या नव्या शिक्क्यानें आतां चालू केलीं पाहिजेत. फार लांब कशाला, संन्यासाश्रमाचे जुने धर्म आतां कसे कडाकड चुरडून जात आहेत पहा. आतां जुने सांचे जाऊन त्या जागीं नवे येत आहेत. सामान्य जनसमाज याबद्दल पुष्कळ कुरकुर करतो, पण असल्या कुरकुरीचा उपयोग काय? ती करण्यापासून कांही फायदा नाहीं आणि अस्मादिक तिला भीकही घालीत नाहींत. आतांचे संन्याशी लांबलांबच्या देशांचा प्रवास

करणार आणि तेथें जर ते अगाला राख फांसून आणि लगोटी लावून हिंडूं लागले तर त्याचें कसे होणार ? अशा अधनग्नावस्थेंत त्यांना कोणी बोटीवर-सुद्धां घेणार नाहीत आणि माराकुटीनें परदेशी ते जाऊन पोहोंचलेच तर बोटीं-तून बाहेर पडताच तुरुंगाचा रस्ता त्यांना धरावा लागेल. कालस्थलाचा विचार करणें केव्हांही अवश्य आहे. भोवतालचा जनसमाज, त्याची परिस्थिति आणि त्याच्या संस्कृतीची पायरी यांचा हिशेब करून आपला मार्ग आपण आंखला पाहिजे. या विषयावर चालू बंगाली भाषेत कांही निबंध मी लिहिणार आहें. माझ्या भाषापद्धतीला नाके मुरडणारे कांही पडित मला भेटतील हें मला ठाऊक आहे. पण त्यांच्या ओरडीकडे लक्ष न देतां बंगालीची एक नवीच मूस मी ओतणार आहें. आपली चालू भाषापद्धति नेभळट झाली आहे. विचारांचा जोर ती खाऊन जाते. याकरितां ही पद्धत आतां बदलली पाहिजे. 'उद्बोधन ' मासिकांत या नव्या पद्धतीनें तुम्ही आतां लिहूं लागा. भाषेत क्रियापदांचा उपयोग काय होतो हें तुला ठाऊक आहे काय ? क्रियापद आलें कीं, विचाराला स्तब्धता येते. विचार थांबल्याचें ते निदर्शक असतें. याकरितां क्रियापदाच्या मनमुराद उपयोगानें विचारसरणीला जागोजाग स्तब्धता येऊन ती दुबळी बनते. पुष्कळ क्रियापदें हीं दुबळ्या विचारांचीं निदर्शक होत. मनुष्य अशक्त झाला म्हणजे त्याचा श्वासोच्छ्वासही जलद चालू लागतो. त्याचप्रमाणें विचारसरणी दुबळी झाली कीं, तिला क्रियापदांचा आसरा जागोजाग घ्यावा लागतो. बंगाली भाषेंत क्रियापदांचा प्रचार फार झाला आहे, यावरूनच ती दुबळी झाली आहे असें मी म्हणतों. बंगालींत सरस भाषण करतां येत नाहीं याचें कारण हेंच. भाषेवर ज्याचा पूर्ण ताबा आहे त्याच्या विचारांत सहसा खंड पडत नाहीं. नुसता डाळभात खाऊन तुमचीं शरीरें जशीं दुबळीं झालीं आहेत तशीच तुमची भाषाही आज नेभळी झाली आहे. अन्नांत, रोजच्या जीवनक्रमांत, विचारांत आणि भाषेंतही नवें ओज घातलें पाहिजे. चोहोंकडे असा जिवटपणा आणला म्हणजे रक्ताभिसरण अधिक जोमानें होईल; आणि असें झालें तरच सांप्रतच्या दारुण जीवनसंग्रामांतून आमचे लोक सुखरूप बाहेर पडतील. तसें न झालें तर आपणांवर सांप्रत पडत असलेली मृत्यूची छाया अधिकाधिक गाढ होत जाऊन अखेरीस आपण नामशेष होऊं. हा काळ आतां फारसा लांब नाहीं.

**शिष्यः**—महाराज, आपल्या देशांतील समाजरचना फार प्राचीनकाळापासून कांहीं विशिष्ट पद्धतीनें बनत आली आहे. थोड्या काळांत तिच्यांत फेरफार घडवून आणणें शक्य आहे काय ?

**स्वामीजीः**—जुन्या चालीरीती चुकीच्या आहेत अशी तुझी खात्री होतांच त्या टाकून नव्या रीतीनें वागण्यास तूं कां शिकत नाहीस ? तुझ्या उदाहरणानें दुसरीं दहा माणसें तसें करण्यास उद्युक्त होतील आणि त्यांच्या उदाहरणानें आणखी पन्नास माणसे तोच मार्ग स्वीकारतील. अशा रीतीनें कालेंकरून साऱ्या समाजाच्या मनांत स्थित्यंतर होईल. पण समजून उमजूनही एकादी नवी रीत तूं प्रचारांत न आणशील तर तूं नुसता तोंडाचा शहाणा आहेस असें मी म्हणेन. ज्याची उक्ति कृतींत उतरत नाही तो मूर्खच म्हटला पाहिजे.

**शिष्यः**—महाराज, तुमच्या अशा शब्दांनीं कोणालाही धैर्य प्राप्त होईल; त्याचा उत्साह, त्याचें कर्तृत्व आणि त्याचा आत्मप्रत्यय हीं खचित वाढतील.

**स्वामीजीः**—आपलें अंतःकरण हळूहळू दृढ बनत गेलें पाहिजे. एक पुरुषार्थी मनुष्य आपण निर्माण केला तर एक हजार व्याख्यानांहून अधिक श्रेय आपल्या पदरीं पडतें. आपले ओंठ आणि मन हीं एकजीव होऊन जाण्यास आपल्या मानसिक विचारांना व्यावहारिक रूप देणें हा एकच उपाय आहे. 'आपल्या अतःकरणांतील विचार चोरीस जाऊं देऊं नको' असें श्रीरामकृष्ण म्हणत त्यांतील तात्पर्य हेंच. आपल्या साऱ्या व्यवसायांत उच्चार आणि आचार यांची एकवाक्यता आपण राखली पाहिजे. शेंकडों उपपत्तीच्या नुसत्या शाब्दिक बडबडीमुळेंच आपला देश आज रसातळाला गेला आहे. श्रीरामकृष्णांचा खरा पुत्र असेल तो सारीं धर्मतत्त्वें प्रत्यक्ष आचरून दाखवील. लोकसमाजाच्या बडबडीकडे लक्ष न देतां या कार्यास तो एकनिष्ठनें वाहून घेईल. **'हाथी चाले अपने चालसे । कुतरा भुकत वाकु भुकवा दे ॥'** हें तुलसीदासांचें वचन तुझ्या कानांवरून कधीं गेलें नाहीं का ? साऱ्या जगानें निंदा केली तरी साधुपुरुष तिकडे लक्ष देत नाहींत अथवा कोणाचा द्वेषही करीत नाहींत. प्रत्येक साधकानें आपली वर्तणूक अशीच ठेवली पाहिजे. लोकांच्या बडबडीचा हिशेब त्यानें ठेवूं नये. जगाच्या स्तुतीकडे अथवा निंदेकडे आपलें

लक्ष एकसारखें लागत राहिलें तर साऱ्या जन्मांत एकही महत्कार्य आपल्या हातून होणार नाहीं. जगाच्या स्तुतिनिंदेकडे लक्ष द्यावें असें वाटणें हें दुबळेपणाचें चिन्ह आहे; आणि दुबळ्याच्या हातून कोणतेंच कार्य पार पडणें शक्य नाहीं. '**नायमात्मा बलहीनेन लभ्यः।**' देह आणि मन हीं दृढ नसतील तर आत्मलाभ घडणें कधीच शक्य नाहीं. याकरितां आपण प्रथम देह दृढ केला पाहिजे. बळकट शरीराच्या संगतीनें मनही दृढ होतें. देहाचें सूक्ष्मरूप म्हणजेच मन. आपल्या मनांत सदोदित दृढतेचे विचार धरावे. मी क्षुद्र, मी पापी असल्या विचारांना कधीं थाराही देऊं नये. असले विचार ज्याच्या डोक्यांत सदोदित घोळतात, तो खरोखरच क्षुद्र आणि पापी बनत जातो. याकरितांच '**मुक्ताभिमानी मुक्तो हि बद्धो बद्धाभिमान्यपि। किं वदन्तीति सत्येयं या मतिः सा गतिर्भवेत्॥**' अशी मर्यादा शास्त्रांनीं घालून दिली आहे. मी मुक्त हाच छंद जो सदोदित घेतो तो अखेरीस खरोखरच मुक्त होतो. मी बद्ध असे जो म्हणतो तो जन्मजन्मांतरींही बद्धच राहतो. मी सांगतों या शिळोप्याच्या गोष्टी नव्हत. हें अक्षरशः सत्य आहे. ऐहिक आणि पारमार्थिक या दोन्ही बाबींतही हा नियम सारखाच लागू पडतो. सदोदित निरुत्साही असणाऱ्या माणसाच्या हातून एखादें क्षुल्लक कामही धड होत नाहीं. अशा माणसांनीं जन्ममरणाच्या फेऱ्यांत सदोदित घोटाळत राहावें हेंच योग्य. तस करण्यावांचून त्यांना गत्यंतरच नाहीं. त्यांनीं सदोदित रडावें आणि जन्मांतरें करीत फिरावें. बलहीनाला आत्मा जसा अलभ्य तसेच ऐहिक भोगही त्याला अलभ्यच होत. हा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे. याकरितां तूं शूर हो. मी निर्भय आहें असें सदोदित म्हणत जा. निर्भय व्हा हीच शिकवणूक दुसऱ्याला दे. भीति हाच मृत्यु; तेंच पातक; तोच नरकवास. भीति म्हणजे साऱ्या जन्माचें मातेरें. जगांतील साऱ्या नकारात्मक विचारांचा उद्भव भीतींतून झाला आहे. या भीतीमुळेंच सृष्टीच्या शृंखलेंत आपण कायमचे जखडले गेले आहों. सूर्य, चद्र, हवा, जन्म, मृत्यु इत्यादि प्रकृतींच्या सांखळ्या या भीतीनेंच उत्पन्न करून त्या कायमच्या टिकवून ठेवल्या आहेत. भीतीमुळेंच त्यांच्यांतून कोणी सुटूं शकत नाहीं. '**भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः। भयादिंद्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पंचमः॥**' या श्रुतिवचनाचें तात्पर्य हेंच. याकरितांच ' निर्भय हो ' असें इतक्या अट्टाहासानें मी तुला सांगत आहें.

हे शब्द बोलत असतां स्वामीजींचें मुख आणि त्यांचे नेत्र तेजाळ दिसूं लागले. निर्भयतेची प्रत्यक्ष मूर्तीच आपणांपुढें बसली आहे, असें शिष्याला वाटलें. स्वामीजींच्या सान्निध्यांत मृत्यूचें भयही आकाशांत विरून गेलें तर काय नवल ?

स्वामीजी पुढें बोलूं लागले, " आपण देहधारी असतां सुख आणि दुःख, श्रीमंती आणि गरिबी इत्यादि द्वंद्वांच्या लाटांवर एकसारखे हेलकावे खात असतों. या लाटा आपणांस निर्दयपणें इतस्ततः फेकीत असतात. तथापि हा सारा औट घटकांचा खेळ आहे हें ध्यानीं आण आणि हें समजून हर्षविषादां-तून मुक्त हो. मी जन्ममृत्युरहित शुद्ध आत्मरूप आहें, या मंत्राचा विसर केव्हांही पडूं देऊं नको. हा मंत्र आपल्या अतःकरणांत सदोदित जागृत ठेवून या जीविताचा काळ तूं कंठीत रहा. 'मी आत्मा' ही भावना तुझ्याशी इतकी एकरूप झाली पाहिजे कीं, स्वतःचें वेगळें अस्तित्वही तुला भासू नये. ही भावना तूं पूर्णपणें आपलीशी केलीस तर साऱ्या दुःखांच्या आणि आपत्तींच्या प्रसंगीं ती आपण होऊनच जागृत होईल; आणि तिला जागी करण्यास तुला कसलेच सायास पडावयाचे नाहींत. नुकताच मी वैद्यनाथ येथें गेलों होतों, तेव्हां बाबू प्रियनाथ मुकर्जी यांच्या येथें उतरलों होतों. तेथे असतां माझा दमा एकदम इतका उसळला कीं, यांत आपण आतां मरणार असे मला वाटूं लागलें. उशीवर डोकें टेंकून मी स्वस्थ राहिलों. अखेरचा चिद्वायु केव्हां निघून जातो याची वाट मी पहात होतों; पण त्या वेळीही 'सोहं सोहं' हा अंतरा-त्म्याचा ध्वनि मला स्पष्ट ऐकू येत होता. '**एकामेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किं च न**' ही जाणीव मनाच्या पृष्ठभागावर एकसारखी जागृत होत होती."

आश्चर्यानें थक्क होऊन स्वामीजींकडे पहात शिष्य म्हणाला, 'महाराज, आपले अनुभवाचे बोल ऐकून शास्त्रेंही तुच्छ वाटतात. त्या शुष्क ग्रंथांचा अभ्यास करण्यांत कांहीं हांशील नाहीं असेही मनांत येतें.'

**स्वामीजीः**—छे, छे ! असें म्हणूं नको. अरे, शास्त्राभ्यासही पाहिजेच. ज्ञानप्राप्तीसाठीं शास्त्राभ्यास अत्यावश्यक आहे. शास्त्रांच्या वाचनाची सुरवात या मठांत मी आतां लवकरच करणार आहें. श्रुती, उपनिषदें, गीता आणि भागवत यांचें वाचन करून पाणिनीची अष्टाध्यायीही मी शिकविणार आहें.

**शिष्यः**—आपण अष्टाध्यायीचा अभ्यासही केला आहे काय ?

**स्वामीजीः**—मी जयपुरांत असतां एका मोठ्या वैय्याकरणाची भेट झाली. तेव्हां व्याकरण शिकण्याची प्रबळ इच्छा मला झाली. व्याकरणविषयांत तो स्वतः महापडित होता. तथापि अध्यापनाची कला त्याला चांगलीशी ठाऊक नव्हती. पहिलें सूत्र तीन दिवस तो मला समजून देत होता. तथापि माझा उमज यत्किंचितही पडेना. अखेरीस कंटाळून तो मला म्हणाला, ' स्वामीजी, पहिलें सूत्र तीन दिवसांतही पुरें झालें नाहीं त्या अर्थी माझ्या अध्यापनाचा फारसा उपयोग तुम्हांला होणार नाहीं असें दिसतें. ' पंडितजींचे हे शब्द ऐकून मला मोठा विषाद वाटला. आहारनिद्रादि सर्व व्यवसाय टाकून पहिल्या सूत्राचा उलगडा करण्याची खटपट मीं स्वतःच सुरू केली. तीन तासांच्या अवधीत पहिल्या सूत्रावरील टीकेचा मतलब माझ्या ध्यानांत आला. मी तसाच उठून पंडितजींकडे गेलों, आणि मला समजलेलें टीकेचें रहस्य मीं त्यांजपुढें मांडलें. पंडितजी म्हणाले, 'मला जें तीन दिवसांत तुम्हांस सांगतां आलें नाहीं तें तीन तासांत इतक्या चांगल्या रीतीनें तुम्हांस समजलें हें नवल आहे.' यानतर पाणिनीचा अभ्यास मीं स्वतःच केला आणि अध्यायामागें अध्याय वाचून टाकिले. पुढें सारी टीका मला अधिकाधिक सुगम होत गेली. मन एकविषयनिष्ठ केल्यानें कोणतेंही कार्य सुलभ होतें. त्यानें पर्वतांचेंही चूर्ण करतां येतें.

**शिष्यः**—महाराज, आपलें सारेंच कर्तृत्व लोकोत्तर.

**स्वामीजीः**—विश्वांत लोकोत्तर अथवा आश्चर्यजनक असें कांहींच नाहीं. अज्ञानाच्या अंधकारानें बुद्धीला मोह होतो. हा एकच खरा अधार विश्वांत आहे. सर्व वस्तूंवर याचें पटल असल्यामुळें त्या रहस्यमय भासतात. त्यांजवर ज्ञानाचा प्रकाश पडला म्हणजे त्यांतील संदिग्धता नाहींशी होते. मायेसारखी अतर्क्य वस्तुही या प्रकाशांत क्षणार्धांत नष्ट होते. मायेची शक्ति इतकी विलक्षण आहे कीं, अशक्य गोष्टीही ती घडवून आणते. पण तिचें एवढें सामर्थ्य ज्ञानसूर्यापुढें सपूर्ण नष्ट होऊन जातें. जें जाणलें असतां जाणावयाचें असें कांहींच उरत नाही तें जाणण्याचा यत्न तूं कर. आत्मानुभव तुला झाला म्हणजे सर्व श्रुतींचा तात्पर्यार्थ करतलामलकवत् तुला दिसूं लागेल. प्राचीन ऋषींनीं हा अनुभव घेतला होता. मग आपणांस आतां तो कां होऊं नये ? आपण काय मनुष्य नाहीं ? कोणाही व्यक्तीच्या जीवितांत जो अनुभव एकवार आला

असेल तोच इतरांनाही परिश्रमानें अवश्य आला पाहिजे. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें म्हणतात तें खोटें नाहीं. आत्मरूप सर्वांच्या ठिकाणीं एकच आहे. वेगवेगळ्या व्यक्तींत त्याच्या आविष्करणाचें परिमाण वेगवेगळें असतें इतकाच काय तो फरक. हा आत्मा स्वतःच्या ठिकाणीं प्रकट होईल असा यत्न तूं कर. तुझा हा यत्न फलद्रूप होऊं लागला म्हणजे तुझी बुद्धि कोणत्याही विषयांत सहजपणें प्रवेश करूं शकेल. ज्याला आत्मानुभव नाहीं त्याची बुद्धि एकांगी असते; आणि आत्मानुभवी पुरुषाची बुद्धि सर्वग्राही असते. आत्मानुभव झाला म्हणजे भौतिक शास्त्रें आणि तत्त्वज्ञानादि विषय जातां जातां आपलेसे करतां येतात. आत्मानुभवाचें महत्त्व सिंहनादानें जाहीर कर. '**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान् निबोधत**' हेंच सर्वांना उच्च घोषानें सांग.

*
* *

[ १८ ]

[ **स्थळः**—बेलूर येथील मठ, १८९८ ]

बेलूर येथील नीलांबर बाबूंच्या बगीचांत गेले दोन दिवस स्वामीजी रहात असून शिष्यही त्यांजकडेच राहावयास गेला होता.

स्वामीजीच्या शयनगृहांत राहण्याची परवानगी आज शिष्याला मिळाली होती. स्वामीजींचें पादसंवाहन शिष्य करीत असतां ते त्याला म्हणाले, 'असलें रम्य स्थळ सोडून तुला कलकत्त्याला परत जावेंसें वाटतें ना? किती खुळा तूं! येथलें वातावरण किती शुद्ध आहे पहा. गंगेवरून येणारा वारा येथें वाहातो. साधूंचा संघ येथें आहे. हिच्यासारखी दुसरी जागा तुला कोठें आढळली आहे काय?'

**शिष्यः**—महाराज, गेल्या कित्येक जन्मांचीं माझीं पुण्यें फळास येऊन आपलें दर्शन मला घडलें. आपल्या संगतीचा अपूर्व लाभ मला झाला. आतां ही अज्ञानदशा संपावी आणि मायापटल दूर व्हावें असा शुभाशीर्वाद आपण मला द्या. महाराज, कांहीं तरी आत्मानुभव मला घडावा अशी तळमळ माझ्या चित्ताला लागून राहिली आहे.

**स्वामीजीः**—मलाही एका काळीं अशीच तळमळ लागली होती. काशीपुरच्या बगीच्यांत असतां एके दिवशीं अशीच अत्यंत तळमळ मला लागली.

परमहंसांची प्रार्थना अत्यंत काकुळतीनें मीं केली. सायंकाळीं मी ध्यानस्थ असतां देहभावाचा विसर मला पडला. देह ही वस्तूच नाहीं असें मला वाटूं लागलें. सूर्य, चंद्र, आकाश, काल, इत्यादि साऱ्या वस्तूंचें भिन्नभिन्न अस्तित्व भासेनासें झालें. हा सारा एकच गोळा आहे, असे दिसूं लागलें. थोड्या वेळानें हा गोळाही भासेनासा झाला. जणूं काय अज्ञात तत्त्वांत तो वितळूनच गेला. देहभाव नाहींसा झाला होता हें खरें, तथापि 'अहं' या ऊर्मीचा अल्पशेष शिल्लक राहिला होता. यामुळेंच मी देहभानावर आलों. समाधीच्या पूर्णावस्थेंत मी आणि ब्रह्म ही द्वैतभावना पूर्णपणें नष्ट होते. महासागराच्या पाण्याप्रमाणें सर्व एकरूप होतें. सर्वत्र एकाच जलाचा विस्तार दिसूं लागतो. विचार आणि उच्चार हीं सुद्धां या स्थितीत जिवंत राहूं शकत नाहींत. वाचा आणि मन यांच्या पलीकडची ही स्थिति आहे. मी ब्रह्मरूप आहें अशी द्वैतभावना गेली नाहीं तोंपर्यंत या मनातीत अवस्थेचा अनुभव व्हावयाचा नाहीं. तोंपर्यंत मी आणि ब्रम्ह हें द्वैत कायमच राहातें. ही द्वैतभावना म्हणजे द्वैताची अखेरची पायरी आहे. या मनातीत स्थितीचा अनुभव एकवार मला घडला होता. पण त्यानंतर अनेकवार यत्न करूनही मला समाधिस्थिति स्थापन करितां आली नाही. श्रीरामकृष्णाना ही हकीकत मीं सांगितली तेव्हां ते म्हणाले, 'अरे, समाधिसुखांत तूं अहोरात्र निमग्न राहू लागलास तर जगन्मातेचा कार्यभाग कसा संपादन होणार ? यासाठींच हा अनुभव तुला पुन्हां प्राप्त व्हावयाचा नाहीं. तुझें कार्य झालें म्हणजे त्या स्थितीवर तूं पुन्हां आरूढ होशील.

**शिष्यः**—निर्विकल्प समाधीनंतर 'अहं' या ऊर्मीमुळें साधक पुन्हां परत येतो काय ? जगाच्या द्वैताचें भान त्याला पुन्हां होऊं लागतें काय ?

**स्वामीजीः**—जगाच्या कल्याणाकरितांच ज्यांचा अवतार आहे असेच पुरुष निर्विकल्प समाधींतून परत येतात असें श्रीरामकृष्ण म्हणत. सामान्य जीव या स्थितींतून परत येत नाहींत. निर्विकल्प समाधीच्या प्राप्तीनंतर त्या देहांत त्यांचा वास एकवीस दिवस असतो. त्यानंतर संसारतरूचें जीर्णपत्र गळून पडल्याप्रमाणें त्यांचा देह पतन पावतो.

**शिष्यः**—समाधिस्थितींत मन ब्रह्माशीं ऐक्य पावलें म्हणजे जाणिवेच्या लाटा त्याजवर उठूं शकत नाहींत. अशा स्थितींत मनाचें मनपणच गेल्यावर

तें ऐहिकांत परत कसे येणार? मनच नाहींसें झालें म्हणजे समाधींतून परत यावयास शिल्लक काय उरतें, आणि परत यावयास साधन तरी काय?

**स्वामीजीः**—निर्विकल्प समाधि सिद्ध झाला तरच पुनरावृत्ति नाहीं असा वेदांतशास्त्राचा अंतिम सिद्धांत आहे. आतां अवतारी पुरुष असतात, त्यांच्या ठिकाणीं विश्वकल्याणाच्या इच्छेचा अंश शिल्लक राहिलेला असतो आणि त्या धाग्याचा आश्रय करून मनातीत स्थितींतूनही ते जगद्भानावर येतात.

**शिष्यः**—पण महाराज, एखाददुसरी इच्छा तरी जेथें शिल्लक राहूं शकते त्या स्थितीला मनातीत असे कसे म्हणावें? अशी स्थिति निरपेक्ष कशी होऊं शकेल? कारण तेथें साऱ्या इच्छा निर्मूल होतात, असें तिचें वर्णन श्रुतींनीं केलें आहे.

**स्वामीजीः**—अरे, तसे झालें तर महाप्रलयानंतर पुनरुत्पत्ति तरी कशी होईल? महाप्रलयाच्या वेळीं सर्व वस्तु ब्रह्मांत विलीन झालेल्या असतात. पण अशा स्थितींतूनही पुनरुत्पत्ति होते असे श्रुतींनींच वर्णिलें आहे. उत्पत्ति आणि लय अथवा आकुंचन आणि विकसन हीं लाटांप्रमाणें जात येत असतात. महाप्रलयाच्या वेळची हीच स्थिति अवतारी पुरुषांच्या ठिकाणींही तशाच रीतीनें प्रत्ययास येते असे म्हणणें तर्कवादास सोडून नाहीं.

**शिष्यः**—पण मला आणखीही एक आक्षेप घेतां येण्यासारखा आहे. महाप्रलयाच्या काळीं सर्व वस्तू ब्रह्माच्या ठिकाणीं बीजरूपानें राहात असल्यानें निर्विकल्प समाधीशीं त्या स्थितीचें साम्य सिद्ध होत नाहीं असें मीं म्हटलें तर?

**स्वामीजीः**—मग मीही एक उलट प्रश्न तुला विचारीन. ब्रह्म निर्गुण आणि केवलरूप आहे. त्याला कशाचाही लेप लागूं शकत नाहीं. मग अशा स्थितींत ब्रह्मातून विश्व प्रादुर्भूत होतें, हें कसे?

**शिष्यः**—कां बरें? दृश्य विश्व हा नुसता आभास आहे. आपल्या प्रश्नाचें उत्तर श्रुतींनींच दिलें आहे. महारण्यांत मृगजलाचा जसा भास होतो, पण वास्तविक पाणी तेथें असत नाहीं; त्याचप्रमाणें सृष्टि वगैरे कांहींच अस्तित्वांत नसून तो केवळ भास आहे. हा भास मायाजनित आहे. ब्रह्म ही एकच सत्यवस्तु आहे.

**स्वामीजीः**—जर सारें विश्व खोटें तर त्यांतील जीवाचा निर्विकल्प समाधिही खोटा; आणि त्याचें त्यांतून परत येणेंही खोटें असें तूं कां म्हणत

नाहींस ? परमार्थतः जीव ब्रह्मरूपच आहे. मग त्याला बंधनाचा अनुभव तरी कसा होणार ? मी ब्रह्मरूप आहें, या वस्तुस्थितीचा अनुभव व्हावा असें जें तुला वाटतें तोही तुझा भ्रमच आहे. कारण, 'तत्त्वमसि' तूं तें आहेसच, असें श्रुतीच तुला सांगत आहेत. '**अयमेव हि ते बन्धः समाधिमनुतिष्ठसि।**' समाधिप्राप्तीसाठीं तूं खटपट करतोस हेंच तुझे बंधन.

**शिष्यः**—महाराज, हा एक विचित्र घोंटाळा आहे. मी जर ब्रह्मरूप आहें तर मला तसा अनुभव नित्य कां होऊं नये ?

**स्वामीजीः**—तो अनुभव जाणिवेंत येण्यास कसल्या तरी उपकरणाची आवश्यकता आहे. आपल्या ठिकाणीं मन हेंच जाणिवेचें साधन आहे. पण तें स्वतः जड आहे. आत्म्याच्या परावर्तित प्रकाशामुळेंच तें चैतन्यरूप भासतें. यासाठींच '**चिच्छायावेशतः शक्तिश्चेतनैव विभाति सा**' असें पंचदशीकार म्हणतात. आत्म्याच्या प्रकाशामुळेंच शक्ति चैतन्यरूप भासते. यामुळेंच आपणांस मनही चिद्रूप भासतें. याकरितां मनाच्या द्वारें आत्मानुभव होणें शक्य नाहीं; आणि म्हणूनच त्याकरितां आपणांस मनातीत झालें पाहिजे. मनाच्या पलीकडे कोणी मध्यस्थ नसल्यामुळें तेथें ज्ञान आणि ज्ञानसाधन हीं आपोआपच एकरूप होतात. ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञानसाधन अशी वेगळी त्रयी तेथें भासत नाहीं. '**विज्ञातारमरे केन विजानीयात्**' असें श्रुतिवचन याच अर्थाचें आहे. जाणिवेच्या पलीकडच्या हद्दींत ज्ञाताज्ञेयादि अनेकपणाला वावच नसतो. मनाचें मनपण नाहींसें झालें म्हणजे तेथें ही स्थिति दृश्यमान होते. या अनुभवाला श्रीशंकराचार्यांनीं अपरोक्षानुभूति असें म्हटलें आहे. या अपरोक्षानुभूतींतूनही अवतारी पुरुष ऐहिकाच्या हद्दींत परत येतात आणि स्वतःचा अनुभव ते आपणांस सांगतात. ऋषींनीं जें कांहीं पाहिलें त्यांतूनच श्रुती आणि उपनिषदें निर्माण झालीं आहेत. पण सामान्य जीव या स्थितींत एकवार प्रविष्ट झाले कीं तींतून ते परत येत नाहींत. एका मिठाच्या बाहुलीला समुद्राचा ठाव पाहाण्याची इच्छा झाली. पण समुद्रांत बुडी मारतांच विरून जाऊन ती त्याच्याशीं एकरूप झाली. सामान्य जीवांचेंही असेंच होतें. एकंदरीनें मुद्दा इतकाच कीं मी ब्रह्मरूप आहें हाच अनुभव घेण्यासाठीं तुला ही धडपड करावयाची आहे. वस्तुतः तें तूं आहेसच; पण मायेचा मनोरूपी पडदा मध्यंतरीं आल्यामुळें हें ज्ञान तुजपासून लपलें आहे. मन

अत्यंत विरल वस्तूंचें बनलें असलें तरी तें जड आहे. मनाचा हा पडदा दूर झाला कीं स्वयंप्रकाश आत्मा तेथें आहेच. मन हें मायावी आहे, तें स्वतः चिद्रूप नाहीं, तें अज्ञानरूप आहे. तथापि ज्ञानरूप आत्मा त्याच्या मागें असल्यामुळें तें चिद्रूप भासतें. जड वस्तु चिद्रूप वाटणें याचेंच नांव माया. मनाचें हें वास्तविक रूप तूं ओळखलेंस म्हणजे तें मनपण टाकून देईल; आणि '**अयमात्मा ब्रह्म**' असा अनुभव तुला होईल.

बोलतां बोलतां शिष्याकडे पाहून स्वामीजी म्हणाले, 'अरे, पण तुला झोंप येऊं लागलीसें दिसतें. जा, आतां स्वस्थ आराम कर.'

* * * *

रात्रीं शिष्याला अति आनंददायक स्वप्न पडलें. स्वामीजींची षोडशोपचारें पूजा करावी, अशी अनावर इच्छा त्याला झाली. पूजा करण्यास स्वामीजींची परवानगीही मिळाली. पूजा आटोपल्यावर स्वामीजी म्हणाले, 'पूजा तर झाली, पण प्रेमानंद आतां किती रागावतील तुला माहीत आहे? अरे हें सारें साहित्य श्रीरामकृष्णांच्या पूजेचें होतें. त्यांच्या ताम्हनांत माझे पाय तूं धुतलेस. तुझे हें कर्म निवळ पाप आहे, असें प्रेमानंद म्हणतील.' स्वामीजींचे हे शब्द पुरे होत आहेत तोंच स्वामी प्रेमानंद हे पण आले. त्यांजकडे पाहून स्वामीजी म्हणाले, 'यानें काय अपकृत्य केलें पाहिलेंत? श्रीरामकृष्णांच्या पूजासाहित्यानें माझी पूजा त्यानें केली.' स्वामी प्रेमानंद हंसत हंसत म्हणाले, 'त्यानें ठीक केलें. विवेकानंद आणि रामकृष्ण यांत कांहीं भेद आहे काय?' प्रेमानंदाचे हे शब्द ऐकून शिष्याचा जीव खालीं पडला.

शिष्य म्हणजे बोलून चालून पक्का कर्मठ. अभक्ष्य अन्न त्याला चालावयाचें नाहींच, पण भलत्यासलत्यानें स्पर्शिलेलें अन्नही त्याच्या उपयोगाचें नव्हतें. स्वामीजींना हें ठाऊक होतें; आणि या त्याच्या वृत्तीवरून त्याला स्वामीजी केव्हां केव्हां सोंवळा भट म्हणत. त्या दिवशीं सकाळीं सकाळच्या न्याहारीबरोबर स्वामीजी बिस्किटें खात होते. ते स्वामी सदानंदांना म्हणाले, 'अहो, त्या सोंवळ्या भटाला जरा हाक मारा पाहूं.' आपल्या ताटलींतील दोन तीन बिस्किटें शिष्याच्या हातीं त्यांनीं दिलीं. शिष्यानेंही अगदीं कांकूं न करितां तीं भक्षण केलीं. तें पाहून स्वामीजी म्हणाले, 'अरे, तूं काय खाल्लेंस तुला

ठाऊक आहे ? त्यांत अंडीं आहेत अंडीं.' शिष्यानें उत्तर दिलें, 'महाराज, त्यांत कांहींही असलें तरी आपल्या हातून मिळालेला पवित्र प्रसाद खाऊन मी अमर झालों आहें. त्यांत काय आहे याची चौकशी मला कशाला ?' त्यावर स्वामीजी म्हणाले, 'उच्च वर्ण, मोठें कुळ, मोठा धार्मिकपणा, असल्या प्रकारचा सारा खोटा अहंकार तुझ्यांतून निघून जावो, हाच माझा तुला आशीर्वाद.'

* * *

[ १९ ]

[ स्थळः—बेलूर येथील मठ, सन १८९८ ]

आज सुप्रभातीं शिष्य मठांत आला होता. स्वामीजींचें पादवंदन करून तो उभा राहातांच स्वामीजी म्हणाले, 'तूं आतां अशी नोकरीच करून पुढें काय करणार ? कांही स्वतंत्र कामधंदा कां पाहात नाहीस ?' शिष्य म्हणाला, 'स्वतंत्र धंदा म्हटला तर मास्तरकीशिवाय मला दुसरें काय करतां येणार ?' स्वामीजी म्हणाले, 'शिक्षणाचें काम फार काळ करीत राहिल्यानें मनुष्याची बुद्धि बोथट होते. बुद्धीचें वैभव बाहेर पडण्यास या धंद्यांत अवकाश नाहीं. मुलांच्या घोळक्यांत अहोरात्र राहिल्यानें मोठा माणूसही हळू हळू मूल बनत जातो. छे, हा धंदा उपयोगाचा नाही.'

**शिष्यः**—तर मग मी काय करूं ?

**स्वामीजीः**—तुला संसार करण्याची इच्छा अद्यापि आहे. पैसाही तुला हवासा वाटतो. मग तूं अमेरिकेंत कां जात नाहींस ? मी तुझी सोय तेथें लावून देईन. पांच चार वर्षांच्या अवधींत तूं पैसाच पैसा करशील.

**शिष्यः**—पण मी तेथें धंदा तरी कोणता करूं ? आणि त्याला लागणारें भांडवल कोण देणार आहे ?

**स्वामीजीः**—किती मूर्खासारखें बोलतोस ? मी कःपदार्थ, माझ्या हातून काय होणार, असलें चिंतन अहोरात्र करून तूं दुबळा बनला आहेस. तुझ्या ठिकाणीं अनंत सामर्थ्य आहे. पण असल्या चिंतनानें त्याची ओळख तुला होत नाहीं. तुझीच गोष्ट कशाला ? आज आपले सारेच लोक या स्थितीला येऊन पोंचले आहेत. एकदां जगभर हिंडून पहा, म्हणजे जिवंतप-

णाचा जोरदार प्रवाह इतर साऱ्या देशांत कसा वाहात आहे हें तुला दिसेल. तुमची अवस्था आज किती हीन झाली आहे पहा. शीक शीक शिकावें, आणि एवढी उरस्फोड केल्यानंतर कोणाच्या तरी दाराशीं जाऊन 'एखादी खर्डेघाशी देतां का हो' म्हणून दीनपणें याचना करावी. दुसऱ्यांच्या पायांखालीं सदोदित तुडवून घेऊन आणि गुलामगिरी करून तुमच्यांतली माणुसकीसुद्धां आतां गेली आहे. फुटक्या कवडीचीसुद्धां किंमत तुम्हांला आता उरली नाहीं. आमची ही भरतभूमि इतकी सुपीक, पाण्याउदकाची इतकी सुबत्ता, कीं प्रकृतीनें जणूं या देशाला पूर्ण आशीर्वाद दिला आहे. येथल्याइतकी खनिज व उद्भिज्ज संपत्ति दुसऱ्या कोणत्याही देशांत एकत्र आढळणार नाहीं; आणि त्याच भरत-भूमीचीं तुम्ही प्रत्यक्ष लेंकरें अन्नावांचून भटकतां ? शरीर झांकण्यापुरतेंही वस्त्र तुम्हांस मिळूं नये काय ? आमच्या देशांतील अन्न खाऊन परके लोक धष्टपुष्ट होतात. आमच्या भूमीच्या आधारानें दिवसेंदिवस ते अधिक सुधारत आहेत, आणि उलटपक्षीं त्या भूमीची तुम्ही मुले दिवसेंदिवस अधिक खालीं जात आहां. रस्त्यांतल्या फाटक्या तुटक्या कुत्र्यापेक्षांही तुमची योग्यता कमी झाली आहे, तरी तुमची बढाई केवढी ! 'आमच्याजवळ वेद आहेत, वेदांत आहे, आम्ही धार्मिक आहों !' वाः ! अगदी गरजेपुरतें सुद्धां अन्नवस्त्र ज्यांना धडपणें मिळवितां येत नाहीं आणि प्रत्येक वस्तूसाठीं ज्यांना सदोदित लोकांच्या तोंडा-कडे पहावें लागतें, असल्या माणसांजवळ बढाई मारण्यासारखे काय असणार ? आतां हीं धार्मिक क्रियाकर्मांतरें बस झालीं. जगांत जगावें कसे हाच मोठा प्रश्न आज तुम्हांपुढें आहे. त्याचें उत्तर देण्यास तुम्हीं प्रथम सज्ज झालें पाहिजे. तुमच्या देशांतील माती नेऊन परके लोक तिचें सोनें करीत आहेत आणि तुम्ही मात्र कुंभाराच्या गाढवाप्रमाणें ती माती वाहाण्याचें काम करीत आहां ! हिंदुस्थानांतून कच्चा माल न्यावा आणि त्यांतून नानाविध चमत्कार निर्माण करावे हें काम परके लोक करीत आहेत. ईश्वरदत्त बुद्धीचा उपयोग करून ते महत्त्वास चढत आहेत आणि आपली बुद्धि खोलीत कोंडून ठेवून आपला वारसा तुम्ही इतर लोकांच्या हवाली करीत आहां. अशा रीतीनें स्वतः-च्याच मूर्खपणानें कफल्लक बनून अन्नासाठीं दारोदार याचना करीत तुम्ही हिंडावें याहून अधिक आश्चर्य तें कोणतें ?

**शिष्यः**—पण महाराज, असे उद्योगधंदे करण्यास लागणारीं साधनें कोठून आणावीं ?

**स्वामीजीः**—डोळे उघडून पहाल तर तुमच्याच हातीं तीं तुम्हांस सांपडतील. आपल्या हातानें आपले डोळे बांधावे आणि म्हणावें मी आंधळा, मला कांहीं दिसत नाहीं. असल्या मूर्ख आंधळयाला डोळे कोण देणार ? हा पडदा तुम्हीं फाडून टाकला तर माध्यान्ह सूर्याचा झगझगीत प्रकाश साऱ्या जगभर पसरला असल्याचें तुम्हांला दिसून येईल. परदेशांत जा, काय भाड्याचे पैसे नाहींत ? बोटीवर लास्कर 'खलाशी' हो. हिंदुस्थानांतला कलाकुसरीचा माल पाठीला मारून युरोप अमेरिकेंत तूं फेरीवाला झालास तरी किती तरी पैसे मिळविशील. आजमितोलाही त्या देशांत आपल्या वस्तूंची किती चहा आहे, हें तुला समजेल. हुगळी प्रांतांतले कांहीं मुसलमान मला अमेरिकेंत आढळले. आरंभीं ते नुसते फेरीवाले होते. हिंदी मालाचीच फेरी ते करीत. अशा रीतीनें हळूहळू तेच आतां शेट सावकार आणि व्यापारी बनले आहेत. तुझी बुद्धि त्यांच्याहूनही कमी प्रतीची आहे काय ? आज बनारशी जरतारी मालासारखा माल जगांत दुसऱ्या कोठेंही होत नाहीं. या कापडाचे बस्ते पाठीवर घेऊन तूं अमेरिकेंत हिंडलास तर तुझा धदा उत्तम प्रकारें चालेल. अरे, या कापडाचे गाउन वगैरे कपडे तू बनविलेस तर पशाचा पाऊस पाडशील.

**शिष्यः**—महाराज, बनारसी कापडाचे कपडे ते लोक काय म्हणून वापरतील ? चित्रविचित्र रंगाचें कापड तिकडच्या स्त्रियांना आवडत नाहीं असें मीं ऐकिलें आहे.

**स्वामीजीः**—हें कापड त्या वापरतील कीं नाहीं याची काळजी तुला नको. तें सारें मी पाहीन. तेथें माझे पुष्कळ स्नेही आहेत, त्यांजकडे मी तुझी शिफारस करीन. प्रथम स्नेही मंडळींतच विक्री सुरू होऊं दे. मग मागणी कशी झपाट्यानें वाढते, हें तुझ तुलाच दिसेल. अरे, त्यांची मागणी पुरी पाडतां पाडतां तुझ्या नाकीं नऊ येतील.

**शिष्यः**—पण या साऱ्या कामाला भांडवल कोठून आणूं ?

**स्वामीजीः**—तुझें गाडें कसेंबसें मी चालतें करून देईन. पुढचा रस्ता तुझा तूंच पाहिला पाहिजे. आपण उद्योगरत राहावें. मग त्याचें फळ येणार असेल तें येवो. '**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।**' हें वचन अर्जुनाइतकेंच तुलाही लागू आहे. तुझा हा यत्न निष्फळ झाला तरी

त्यापासून दुसरे लोक धडा घेतील. या मार्गानें दुसरे लोक जाऊं लागतील. अशा रीतीनें तुझें उदाहरण पुष्कळांना दाखल्यासारखें होऊन राहील. उलटपक्षीं तुला यश आलें तर बेट्या, चैनींत लोळशील.

**शिष्यः**—महाराज, आपलें म्हणणें योग्य आहे; पण खरें म्हणाल तर तसें करण्यास अद्यापिही माझी छातीच होत नाहीं.

**स्वामीजीः**—अरे, मी म्हणतों तें हेंच. तुम्ही लोक अगदीं अश्रद्ध आहां. तुम्हांला आत्मविश्वास नाहीं. मग तुमच्या हातून कसला पराक्रम होणार ? तुम्हांला ऐहिक नाहीं आणि पारलौकिकही नाहीं. तुम्ही दोन्ही गोष्टींना पारखे होऊन बसलां आहां. एक तर मी म्हणतों तसें धाडस करून ऐहिक भोग मिळव, नाहीं तर आमच्यासारखी डोई बोडून काषायवस्त्र घे ! संन्यास ग्रहण करून जगाला ज्ञानदान कर. असें कांहीं केलेंस तरच पोटा-पुरतें गोळाभर अन्न मागण्याचा अधिकार तुला आहे. जगांत तूं कोणाच्याच उपयोगीं पडला नाहींस तर तुल घालण्यास जग काय बांधलें गेलें आहे ? या जगांत कोणी कोणाची काळजी करीत बसत नाहीं. जग आम्हांला खाऊं घालतें तें फुकटचें घालीत नाहीं. संसाऱ्यांना आम्ही पारलौकिक ज्ञान देतों आणि त्याच्या बदल्यांत पांच चार घांस अन्न ते आम्हांला देतात. तूं कांहींच करणार नाहींस तर जगानें तुला काय म्हणून पोसावें ? परक्यांची नोकरी करणें म्हणजे शुद्ध गुलामगिरी आहे याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊनही तुझे डोळे अद्याप उघडूं नयेत ? माया म्हणतात ती हीच. खरोखर मायेचें सामर्थ्य अतर्क्य आहे ! तुझ्या डोळ्यांवर तिनें कशी झांपड घातली आहे पहा. पाश्चात्य देशांत नोकर पार्लमेंटाचा सभासद झाला तरी त्याची बैठक मागल्या रांगेंत असते; आणि स्वतःच्या पौरुषानें, शिक्षणानें आणि बुद्धीनें जे प्रसिद्धीस आले आहेत त्यांच्यासाठीं पुढल्या रांगा राखून ठेवलेल्या असतात. तिकडे स्वयंसिद्ध जातिभेद नाहीं. स्वतःच्या उद्योगशीलतेनें आणि पराक्रमानें ज्यांनीं आपलें दैव उघडलें आहे, तेच जनतेचे पुढारी बनतात. देशाचें दैव त्यांच्या हातीं येतें. याच्या उलट तुमचा प्रकार आहे. मी ब्राम्हण म्हणून पोकळ आढयता तुम्ही मिरवितां आणि या पोकळ घमेंडींत बसून राहतां राहतां अखेरीस घांस-भर अन्नालाही महाग होतां ! एक सुईसुद्धां बनविण्याची अक्कल तुम्हांला नाहीं. पण इंग्रजांना शिव्या देण्यांत मात्र तुम्ही कोणाला हार जाणार नाहीं ! अरे,

मूर्खांनो, त्यांना तुम्ही आपले गुरू केलें पाहिजे. जगाच्या जीवनकलहांत टिकाव कसा धरावा, नव्या नव्या कला कशा निर्माण कराव्या, उद्योगधंदा कसा चालवावा, हें व्यवहारी शिक्षण त्यांच्या पायांपाशीं बसून तुम्हीं घेतलें पाहिजे. तुमच्या अंगीं तितकी योग्यता आली म्हणजे जग आपण होऊनच तुम्हांस मान देऊं लागेल. मग जग तुमच्या म्हणण्याकडे लक्ष पुरवील. पण अशी खरी तयारी कांहींच नसतां शुष्क कांग्रेसा भरवून घसा फुटेपर्यंत ओरडलें तरी काय होणार ?

**शिष्यः**—पण महाराज, आपले सारे सुशिक्षित लोक तिच्यांत शिरले आहेत हें काय उगीच ?

**स्वामीजीः**—पण तुम्ही सुशिक्षित कोणाला म्हणतां ? दोनचार परीक्षा उतरल्या, आणि बरीचशीं व्याख्यानें देतां येऊं लागलीं, कीं झाला तुमचा सुशिक्षित. पण हें सारें शिक्षण सामान्य लोकांत नेऊन उभे केलें तर त्यांना घांसभरसुद्धां अन्न मिळविण्याचें साधन तें दाखवूं शकत नाहीं. जगाच्या रगाड्यांत जगावें कसे हें त्यांना तें दाखवीत नाहीं. त्याच्या योगानें कणखर दानत बनत नाही. परोपकाराची बुद्धि जागृत होत नाहीं आणि सिंहाची छातीही निर्माण होत नाहीं. मग याला शिक्षण कसें म्हणावें ? ज्याच्या योगानें स्वातंत्र्य-वृत्ति बाणून मनुष्य पुरुषार्थी होतो तेंच खरें शिक्षण. सध्यां जें शिक्षण तुम्हांला मिळतें त्यानें अग्निमांद्याच्या रोग्यासारखे मात्र तुम्ही बनतां, त्या शिक्षणाचें अपचन तुम्हांला झालेलें असतें. मग सदोदित निरुत्साह होऊन यंत्रासारखे हातपाय हालवावे आणि कसेंबसें आयुष्य कंठावें, यापलीकडे तुमच्या हातून कांहींच होऊं शकत नाहीं.

सुतार, शिपी, चांभार, धेड आणि इतर हलक्या जातीचे लोक यांच्या आंगींही तुमच्यापेक्षां अधिक स्वावलंबित्व आणि अधिक उद्योगशीलता आहे. आज युगानुयुगे हे लोक कष्ट करून भूमिगत संपत्ति वर आणीत आहेत. या देशांतील सारी संपत्ति त्यांच्याच कष्टाचें फळ आहे; आणि इतके कष्ट करूनही ते बिचारे कधीं तक्रार करीत नाहींत. आतां लवकरच त्यांचें महत्त्व तुमच्याहून अधिक वाढेल. हळूहळू त्यांच्या हातीं देशांतील पैसा जात आहे. तशांतून तुम्हांप्रमाणें त्यांच्या गरजाही फार नाहींत. अर्वाचीन शिक्षणानें तुमची जुनी

रहाणी बदलून टाकली, तुमचा खर्च वाढला, पण अधिक पैसा मिळविण्याचीं साधनें मात्र उपलब्ध झालीं नाहींत. कल्पक बुद्धीच्या अभावामुळें नवे मार्ग तुम्हांला सुचतच नाहींत. गरीब बिचाऱ्या सोशिक जनतेवर आपला करडा अंमल आजपर्यंत तुम्हीं चालविला; पण आतां मनु बदलला आहे. आतां त्यांचे दिवस आले आहेत. तुम्ही तर अद्यापि नोकरी नोकरी करीत हिंडतां. आपल्या जीविताचें सारें सार नोकरींतच आहे, असे अद्यापि तुम्हांस वाटतें. याच मार्गानें तुम्ही पुढें चालणार असाल तर तुम्ही लवकरच नामशेष व्हाल, हें ध्यानांत ठेवा.

**शिष्यः**—महाराज, आमची कल्पक बुद्धि इतर देशांतील लोकांपेक्षां कमी प्रतीची आहे हें खरें, तथापि आमच्या सामान्य जनतेचें पुढारीपण अद्यापि आमच्याकडेच आहे. आमची संस्कृति सामान्य लोकांना अद्यापि प्राप्त झालेली नाहीं. मग त्यांच्या आमच्या भांडणांत सारी सत्ता त्यांच्या हातीं जाईल असें आपण कसें म्हणतां ?

**स्वामीजीः**—अरे, तुमच्यासारखीं दोन चार पुस्तकें ते पढले नसतील; पण म्हणून काय झालें ? आणि तुमची संस्कृति म्हणजे तरी काय ? 'फॅशनेबल' कपडे वापरणें हीच कीं नाहीं ? ही शिप्याची संस्कृति त्यांना प्राप्त झाली नाहीं हें मला कबूल आहे. पण आज देशाचे खरे आधारस्तंभ तेच आहेत. सर्व देशांत देशाची खरी कर्तबगारी सामान्य जनतेवरच अवलंबून असते. येथले कुणबी आणि हलके कारागीर आज हातपाय जोडून बसले तर तुमची चूल कशी पेटणार ? अशा स्थितींत शरीर झांकण्यापुरतेंही वस्त्र तुम्हांस मिळावयाचें नाही. कलकत्त्यांतील भंग्यांनीं एक दिवस संप केला तर तुमच्या तोंडचें पाणी पळतें; आणि हा संप तीन चार दिवस चालू राहिला कीं रोगाच्या सांथींनीं साऱ्या शहराला मरगळ लागते. या हलक्या ज्ञातींवर प्रत्यक्ष तुमचें जीवित अवलंबून असतां तुम्ही त्यांना तुच्छ लेखतां आणि स्वतःच्या संस्कृतीची पोकळ बढाई मिरवितां हें केवढें नवल ?

जीवनकलहांत हातातोंडाची गांठ ठेवतां ठेवतांच त्या बिचाऱ्यांचा जन्म जातो, मग ज्ञानार्जनाची संधि त्यांना कोठून मिळणार ? यंत्राप्रमाणें काम करण्यांत त्यांचे आजपर्यंतचे दिवस गेले; आणि तुम्हीं सुशिक्षित धूर्तांनीं

त्यांच्या साऱ्या श्रमांचें फळ आयतेंच लुबाडलें. साऱ्याच देशांत असा प्रकार घडून आला आहे. पण काळ आतां बदलत चालला आहे. तुम्हां सुशिक्षितांचा हा कावा त्यांच्या ध्यानांत येऊं लागला आहे. देशांतील संपत्तीचा न्याय्य भाग आपल्या हातीं यावा म्हणून एकजुटीनें ते यत्न करूं लागले आहेत. युरोप आणि अमेरिका या खंडांतील हलका वर्ग सर्वांच्या आधीं जागा होऊन त्यानें लढाईस सुरवात केली आहे. या जागृतीचीं चिन्हें आपल्या देशांतही दिसूं लागलीं आहेत. आजच किती संप होऊं लागले आहेत याचा हिशेब करा. या वाढत्या शक्तीला आळा घालणें वरच्या वर्गाला यापुढें शक्य होणार नाहीं. तुम्ही कितीही धडपड केली तरी त्यांचें सामर्थ्य वाढतच जाणार. त्यांचा न्याय्य भाग त्यांना मिळावा म्हणून त्यांना मदत करण्यांतच तुम्हां सुशिक्षितांचें शहाणपण आणि तुमची सुरक्षितता आहे.

यासाठींच सामान्य जनतेंत ज्ञानाचा प्रसार करा असें मी तुम्हांस सांगतों. आपण सर्व एकाच भूमीचीं लेंकरें असल्यामुळें आपण बधू आहो हें त्यांस तुम्ही शिकवा. तुम्ही त्यांचा द्वेष करीत नाहीं हें त्यांच्या ध्यानी आणून द्या. तुमची सहानुभूति त्यांना मिळाली, तर त्यांचें कर्तृत्व शेंकडों पटीनें वाढेल. अर्वाचीन भौतिक शास्त्रांचें ज्ञान त्यांना द्या. इतिहास, भूगोल आणि सामान्य शास्त्रें ही त्यांना पढवा; आणि यांजबरोबरच त्यांना धर्मशास्त्रही सांगा. त्यांचें खरें गुरुपण तुम्ही स्वीकारिलें तर गुरूचें पोट रिकामें राहूं न देण्याची खबरदारीही ते घेतील. अशा रीतीच्या परस्परविनिमयानें दोघांचेंही कल्याण साधणार आहे. यासाठींच सामान्य जनतेंत विद्येचा प्रसार करण्याच्या कामास तुम्हीं आपणांस वाहून घेतलें पाहिजे असें मी म्हणतों.

**शिष्यः**—पण महाराज, त्यांच्यांत विद्येचा प्रसार झाला तर त्यांच्या मेंदूची शक्ति वाढेल आणि त्यांच्यांत चौकसपणा अधिक येईल हें खरें, पण कालांतरानें आमच्याचसारखे तेही आळशी बनतील. हातानें काम करणें त्यांना आवडणार नाहीं, आणि आम्ही आज जसे त्यांजवर चरत आहों, त्याचप्रमाणें तेही स्वतःहून खालच्या लोकांवर चरूं लागतील.

**स्वामीजीः**—असें कां व्हावें? सामान्य लोकांना लिहितां वाचतां येऊं लागलें तरी आपला पिढिजाद धंदा ते सोडतील असें नाहीं; आणि त्यांनीं

असें करणें युक्तहि नाहीं. '**सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।**' हा सिद्धांत सर्वांनाच सारखा लागू आहे. त्यांना शिक्षण देतांना त्यांच्या गुरूंनीं हा मुद्दाही त्यांच्या मनांत बिंबविला पाहिजे. तो त्यांना चांगला समजला तर आपल्या ज्ञानाचा उपयोग आपला पिढिजाद धंदाच चांगला चालविण्याकडे ते करतील. अशा रीतीनें सर्व धंद्यांत सुशिक्षितांचा भरणा झाला तर कालेंकरून त्यांच्यांत उत्तानबुद्धीचीं माणसेंही निर्माण होतील. मग जो जातिभेदाचा प्रश्न सध्यां मोठा बिकट होऊन बसला आहे तोही आपोआप सुटेल. हलक्या पण सुशिक्षित आणि सुवृत्त अशा माणसांस तुम्ही उच्चवर्णीय लोक आपोआपच जवळ कराल. क्षत्रिय विश्वामित्र ब्राह्मण म्हणून गणला गेला हें आपणांस ठाऊक आहेच. क्षत्रियाला ब्राह्मणत्व मिळूं शकतें असे दिसतांच सारा क्षत्रिय वर्ण ब्राह्मणांचा किती तरी उपकारबद्ध झाला. सहानुकंपेनें पशुपक्षीसुद्धां आपलेसे करतां येतात मग माणसांची गोष्टच कशाला ?

**शिष्यः**—महाराज, आपण म्हणतां तें खरें. पण आमच्या येथें खालच्या आणि वरच्या वर्गांत सध्यां एवढें अंतर पडलें आहे कीं, तें भरून निघणें दुष्कर दिसतें. या दोन वर्गांत परस्परप्रेम उत्पन्न करणें फार कठीण काम आहे.

**स्वामीजीः**—पण हें कठीण काम केल्याशिवाय तुम्हां उच्चवर्गीयांची धडगत नाहीं हेंही लक्षात ठेवलें पाहिजे. हें काम तुम्ही न केलें तर अंतःकलहानें तुम्ही नाश पावाल. या आपसांतील भांडणांनीं आज किती तरी शतके तुमची नासाडी केली आहे. खालच्या लोकांना जागृति आली म्हणजे त्यांच्या एका फुंकरासरसे तुम्ही उच्चवर्गीय लोक उडून जाल. आमची संस्कृति असें जिला तुम्ही म्हणतां ती त्यांनीं निर्माण केलेली आहे आणि तिचा नाशही तेच करतील. गॉल लोकांच्या हातून प्रबळ रोमन संस्कृतीचा नाश कसा झाला याची साक्ष इतिहास देतच आहे. यासाठींच या खालच्या वर्गांत ज्ञानाचा प्रसार करण्यास झटा, असें वारंवार मी तुम्हांस सांगत आहें. आपणांस ज्यांनीं ज्ञानदान केलें त्यांच्याशीं हे लोक निमकहराम होणार नाहींत. तुमच्या सेवेचा विसर त्यांना पडणार नाहीं आणि तीबद्दल तुमचे ते सदैव ऋणी राहतील.

थोडा वेळ थांबून स्वामीजी म्हणाले, 'हा विषय आतां राहूं दे. तूं स्वतःबद्दल काय विचार केला आहेस तें सांग पाहूं. तूं कांहीं तरी उद्योगधंद्याला

सुरवात कर. कसलाही धंदा तूं केलास तरी मला चालेल; आणि कांहीं धंदा तुला करावयाचाच नसेल, तर आमच्यासारखा संन्यासी तरी हो. आत्ममोक्ष आणि जगाचें हित त्याशिवाय साधावयाचें नाहीं. वास्तविक पाहतां संन्यास हाच खरा मार्ग आहे. क्षुद्र संसारी बनण्यांत काय हंशील आहे ? '**नलिनी-दलगतजलमतितरलम् तद्वज्जीवितमतिशयचपलम्** ।' हें आपणांस माहीत आहेच. याकरितां आत्मज्ञानप्राप्तीची खरी लालसा तुला असेल तर पुढें सरण्यास आतां अगदीं कांकूं करूं नको. '**यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्** ।' परहितासाठीं आपल्या साऱ्या जीविताचें बलिदान दिलें पाहिजे. हें बलिदान तूं दे. '**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्यवरान्निबोधत**' हा संदेश दारोदार पोंचवून सर्वांस निर्भय कर.

***

[ २० ]

[ **स्थळ**ः—कलकत्ता, १८९८ ]

भगिनी निवेदिता, स्वामी योगानंद, वगैरे मंडळीसह स्वामीजी आज दुपारीं अलिपुर येथील संग्रहालय पाहाण्यास आले होते. बागेचे अधिकारी राय रामब्रह्म संन्यालबहादूर यांनीं आदरपूर्वक मंडळीचें स्वागत करून त्यांस बागेंत फिरावयास नेलें. नानाप्रकारचीं जनावरें पिंजऱ्यांत ठेवलीं होतीं. या पिंजऱ्यांचें अवलोकन करीत करीत आम्ही चाललो असतां स्वामीजींना डारविनच्या उपपत्तीचें स्मरण झालें. प्राण्याचें अनेक प्रकारें रूपांतर होत होत अखेरीस मनुष्य बनला असें डारविनचें म्हणणें आहे. पाहतां पाहतां सर्प ठेवलेल्या स्थळाजवळ आम्ही आलों. तेथे एक प्रचंड सर्प स्वस्थ पडला होता, त्याजकडे पाहून स्वामीजी म्हणाले, ' दीर्घकाळ एकाच स्थितींत पडून राहिल्यामुळें या बिचाऱ्याचे मणके आंखडून जखडल्यासारखे झाले आहेत. ' नंतर शिष्याकडे वळून ते थट्टेनें म्हणाले, ' तूं कांसव खातोस, नाहीं ? सर्पाचें रूपांतर होत होत त्याचें कांसव बनलें असें डारविन म्हणतो. तर मग तुला सापखाऊ म्हणण्यास काय हरकत आहे ? '

यावर शिष्यानें उत्तर दिलें, ' महाराज, उत्क्रांतीनें कोणाही प्राण्याचें पूर्ण रूपांतर झालें म्हणजे त्याच्या पूर्वीच्या रूपांत कांहींच साम्य राहात नाहीं.

त्याचा आकार बदलतो, त्याचप्रमाणें त्याच्या साऱ्या संवयीही बदलून जातात. मग कांसव खाणें आणि साप खाणें एकच असे कसें म्हणतां येईल ?'

शिष्याचें हें उत्तर ऐकून सर्व मंडळी हंसूं लागली. आणखी कांहीं वस्तु-संग्रह पाहिल्यावर आम्ही सारी मंडळी रामब्रह्मबाबूंच्या राहत्या घरांत गेलों. कांहीं खाद्य पदार्थ आणि चहा बाबूसाहेबांनीं मंडळीस आणून दिला. भगिनी निवेदिताही या मंडळीतच बसल्या होत्या. त्यांचा स्पर्श झालेल्या पदार्थास हात लावण्यास शिष्य कांकू करूं लागला. 'अरे कांहीं तरी खा' म्हणून स्वामीजी तर त्याच्या मागे लागले. अखेरीस नाइलाज होऊन त्यानें कांहीं पदार्थ खाल्ले. बाकीच्या मंडळींनीं चहा घेतला. स्वामीजींनीं जलप्राशन केलें आणि तें भांडें शिष्याच्या हातीं दिलें. यानंतर डार्विनच्या उपपत्तीसंबंधीं कांहीं संभाषण झालें.

रामब्रह्मबाबू म्हणाले, 'डारविनच्या उत्क्रांतिवादाबद्दल आपलें काय मत आहे ? आपल्या मताच्या पुष्टीसाठीं त्यानें दाखविलेलीं कारणें पुरेशीं आहेत असें आपणांस वाटतें काय ?'

**स्वामीजीः**—डारविनचें मत बरोबर आहे, असेंही घटकाभर मानलें तरी हा वाद अखेरच्या पायरीपर्यंत त्यानें पोंचविला आहे हें म्हणणें मला मान्य नाहीं. त्यानें दाखविलेलीं कारणें अपुरीं आहेत.

**रामब्रह्मबाबूः**—आपल्या प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं या विषयाचा ऊहापोह केला होता काय ?

**स्वामीजीः**—सांख्यांनीं या विषयाचें सुंदर विवेचन केलें आहे. आमच्या आर्य तत्त्ववेत्त्यांनीं या वादाची अखेर लावली आहे, असें माझें मत आहे.

**रामब्रह्मबाबूः**—हा विषय थोडक्यांत सांगतां येण्यासारखा असला तर आपल्या मुखांतून तो ऐकावा अशी माझी फार इच्छा आहे.

**स्वामीजीः**—आपलें अस्तित्व कायम राखण्यासाठीं चाललेली अहमहमिका आणि या भांडणांत योग्यतेनुरूप टिकाव धरतां येणें इत्यादि मुद्यांबद्दल विशेष सांगण्याची जरूर असेल असें मला वाटत नाहीं. या चढाओढीमुळेंच हलक्या जातीचा प्राणी उच्चावस्थेकडे जातो, असें पाश्चात्य पंडितांचें म्हणणें आहे. पण पतंजलींनीं हीं कारणें कोठेंही दाखविलेलीं नाहींत. 'प्रकृत्यापूरात्'

म्हणजे प्रकृतीच्या ठिकाणींच आविर्भाव हें जातीच्या उत्पत्तीचें कारण पतंजलींनीं सांगितलें आहे. सदोदित अडथळ्यांशीं भांडण्यानें जातीची उत्क्रांति होते असे नाही. किंबहुना उत्क्रांतीच्या मार्गात सदोदित अडथळेच येत गेल्यानें ती खुटते असे माझे मत आहे. हजार प्राण्यांचा विध्वंस होण्यानेंच एका प्राण्याची उत्क्रांति होत असेल, तर असल्या उत्क्रांतीनें जगाचें फारच थोडें हित साधतें असें म्हटलें पाहिजे. असल्या विनाशक कलहामुळें देहाचें बळ वाढतें असेही कबूल केलें तरी आध्यात्मिक उन्नतींत यामुळें भयंकर अडथळा उत्पन्न होतो असें म्हणणें भाग आहे. प्रत्येक जीवात्मा आधीच परिपूर्ण आहे, असें आमचे तत्त्ववेत्ते म्हणतात; आणि जगाच्या स्वरूपांत उच्चनीचतेचे जे अनेक भेद प्रत्ययास येतात, त्याचें कारण आत्म्याचें अधिक स्पष्टीकरण हेंच आहे. या स्पष्टीकरणाच्या मार्गातील अडचणी पूर्णपणें दूर झाल्या, कीं आत्मा पूर्णत्वानें प्रकाशमान होतो. तिर्यग्योनींत काय घडत असेल तें असो, पण उच्च दर्जाच्या प्राण्यांत तरी अखड जीवनकलहानें अडथळाच उत्पन्न होतो यांत संशय नाहीं. सदोदित चालणाऱ्या अहमहमिकेनें प्राण्याची उत्क्रांति होते हें म्हणणें उच्चवर्गीयांबद्दल तरी बरोबर नाहीं. योग्य शिक्षण, संस्कृति, मनःसंयम आणि ध्यान यांच्या योगें हे अडथळे दूर होऊन मनुष्यप्राणी उत्क्रांत होतो असा अनुभव आहे; आणि या साधनांहूनही उच्च प्रतीचें साधन म्हटलें तर स्वार्थत्याग अथवा आत्मयज्ञ हें होय. अशा प्रकारचे अडथळे हें उत्क्रांतीचें कारण होय हें म्हणणें तर्कबुद्धीलाही विसंगत आहे. किंबहुना हे अडथळे उत्क्रांतीला पोषक नसून उलट ते विघातकच आहेत. हे अडथळे बाह्य साधनांनीं म्हणजे युद्धादि प्रकारांनीं कमी होण्याऐवजीं उलट वाढतच जातात. जगांतील दुःखें कमी करण्यासाठीं एक हजार दुष्टांचा संहार करण्यानें दुष्टपणा कमी होण्याऐवजीं तो अधिकच होतो. उलटपक्षीं मनुष्यांना आध्यात्मिक उन्नतीला लावलें आणि दुष्टत्वापासून परावृत्त होण्यास त्यांना शिकविलें तर जगांतील दुष्टत्व हटकून कमी होईल. डारविनच्या जीवनकलहाच्या वादाचें ग्रहण युरोपनें केलें आणि तेव्हांपासून पाश्चात्यांची स्थिति किती भयंकर झाली आहे पहा.

स्वामीजींचें हें भाषण ऐकून रामब्रह्मबाबू आश्चर्यचकित होऊन म्हणाले, 'पौर्वात्य आणि पाश्चात्य अशा दोन्ही तत्त्वज्ञानांत मुरलेल्या आपणांसारख्या चतुरंगपडितांची आपल्या देशाला सध्यां अतिशय जरूर आहे. आमच्या

अर्वाचीन सुशिक्षितांच्या चुका दाखविण्यास आपणांसारखेच पंडित पाहिजेत. आमचे सुशिक्षित सध्यां अगदीं एककल्ली झाले आहेत. त्यांचें शिक्षण अगदीं एकेरी आहे. उत्क्रांतिवादाबद्दलचें आपलें म्हणणें ऐकून मला अतिशय आनंद झाला.'

थोड्या वेळानें सर्व मंडळी तेथून बाहेर पडली आणि बागबझारांतील बलराम बोसच्या घरीं गेली. तेथें थोडा वेळ विश्रांति घेतल्यानंतर स्वामीजी दिवाणखान्यांत येऊन बसले. या वेळीं रात्रीचे आठ वाजले होते. संग्रहालयांत काय संभाषण झालें हें जाणण्यास मंडळी उत्सुक होऊन बसली होती. मंडळीची ही इच्छा जाणून शिष्यानेंही याच विषयाचा उपक्रम केला.

**शिष्यः**—महाराज, उत्क्रांतीसंबंधी बागेत आपण जें विवेचन केलें तें मला पुरतेंसे समजलें नाहीं. कृपा करून त्याची पुनः एकवार उजळणी करावी.

**स्वामीजीः**—त्यांतले कोणते मुद्दे तुला समजले नाहीत ?

**शिष्यः**—बाह्य अडथळ्यांशीं झुंजून त्यांजवर विजय मिळविणें हेंच जिवंतपणाचें लक्षण आहे आणि आत्मोन्नतीच्या मार्गातील पहिली पायरी हीच आहे, असें किती वेळां तरी आपणच सांगितलें आहे; आणि आजचें आपलें भाषण या मताच्या अगदीं उलट होतें.

**स्वामीजीः**—काय ? उलट होतें ? तुझ्या समजुतींत घोंटाळा झाला आहे. तिर्यग्योनींत अशा प्रकारचा जीवनकलह स्पष्ट दिसतो. जगण्यास योग्य तेच प्राणी जगतात हेंही तेथें उघड दिसून येतें; आणि डार्विनची उपपत्ति येवढयापुरती खरी आहे. पण मानवयोनींत तर्कबुद्धीची स्पष्टावस्था दिसून येते; आणि येथें डार्विनची उपपत्ति लंगडी पडते. उदाहरणार्थ, ज्यांना आपण खरोखर महापुरुष समजतों, अथवा ज्यांची दानत आपण आदर्शवत् मानतों, अशा पुरुषांच्या चरित्रांत हा जीवनकलह बहुधा अगदींच अल्प असतो. तिर्यग्योनीचें अस्तित्व उपजतबुद्धीवर अवलंबून असतें. तेथें उपजतबुद्धि हेंच प्रधान अंग आहे. पण मनुष्यप्राण्याच्या ठिकाणीं विवेकबुद्धीचें प्राधान्य आहे. मनुष्यप्राण्याचें स्वरूप जों जों अधिक उत्क्रांत तों तों त्याच्या ठिकाणीं विवेकबुद्धीची स्पष्ट दशाही अधिक प्रमाणावर आढळून येते. मनुष्याचा कलह अंतस्थ आहे. मन ही त्याची रणभूमि आहे. बाह्य जगाशीं त्याचा संबंध

नसतो. अंतर्गत रणभूमीवर विजयांचें प्रमाण जों जों अधिक तों तों मनुष्याची उन्नति अधिक. हा अंतर्गत संग्राम समाप्त झाला आणि मनुष्याचें मन निर्वात-स्थलाप्रमाणें साम्यावस्थेला आलें म्हणजे आत्मरूप स्वयमेव प्रकट होतें. नीच प्राण्यांचा कलह देहरक्षणापुरता असतो. आपल्या जडदेहाचें रक्षण करावें हा एकच हेतु त्यांच्या ठिकाणीं असतो. पण मनुष्यप्राणी मनावर विजय मिळवि-ण्यासाठीं धडपडत असतो. मनाची विसकटलेली घडी चापूनचोपून पुनः बस-वावी आणि त्याला साम्यावस्थेला आणावें इतक्यासाठींच मनुष्याची ही सारी धडपड चाललेली आहे. नदीकांठच्या झाडाचें प्रतिबिंब पाण्यांत उलटें पडतें. झाड वर वाढत जाण्याऐवजीं खालीं वाढत गेल्यासारखें दिसतें. नीच प्राणी आणि मनुष्य यांच्यांतील वाढीची दिशाही अशीच परस्परविरुद्ध आहे.

**शिष्यः**—तर मग शरीर सुदृढ करण्याबद्दल आपण आम्हांस इतक्या अट्टाहासानें कां सांगतां ?

**स्वामीजीः**—पण तुम्ही मनुष्य तरी आहां काय ? तुमच्यांत बुद्धीची अल्पस्वल्प जागृति आहे इतकेंच. त्यांतून शरीर सुदृढ असल्याशिवाय तुम्ही मनावर ताबा कसा मिळविणार ? खरें पाहातां तुम्हांला आज मनुष्यसुद्धां म्हणतां येत नाहीं. '**आहारनिद्राभयमैथुनं च**' या पशूंच्या व्यवहारापली-कडे तुमच्याजवळ अधिक काय आहे ? अद्यापि जमिनीवर हात टेंकून तुम्ही चालत नाहीं हेंच तुमचें भाग्य समजा. 'मी पुरुष आहें,' ही जाणीव ज्याला आहे तोच खरा मनुष्यप्राणी आहे असें श्रीरामकृष्ण म्हणत. स्वतःच्या मह-त्त्वाची जाणीव प्रत्येकाला असलीच पाहिजे. तुमच्या ठिकाणीं ती आज नाहीं. '**पुनरपि जननं पुनरपि मरणं**' या चक्रांत फिरणाऱ्या कीटकयोनीहून आज तुमची स्थिति अधिक चांगली नाहीं. आपसांत भांडणें करावीं, एकमेकांबद्दल मत्सरबुद्धीनें जळावें आणि परकीयांच्या दृष्टीनें स्वतःस हास्यास्पद करून घ्यावें याहून अधिक तुम्ही काय करतां ? यासाठींच सामान्य पशूप्रमाणें जीवनकल-हांत पडण्याचा उपदेश मी तुम्हांस देतों. नुसत्या शाब्दिक उपपत्तींचा उपयोग तुम्हांस कांहींच नाहीं. सकाळीं उठल्यापासून रात्रीं झोंपीं जाईपर्यंत आपण काय काय व्यवहार करतों याचा विचार शांत मनानें तुम्हीं केला म्हणजे जनावरें आणि मनुष्यें यांच्या मधल्या कोटींतले तुम्ही प्राणी आहां, हें तुमचें तुम्हांलाच दिसून येईल. यासाठींच शरीर सुदृढ करण्यापासून तुम्हीं आरंभ

केला पाहिजे. तसें झालें तरच तुम्हांस मनावर विजय मिळवितां येईल. '**नायमात्मा बलहीनेन लभ्यः।**'

**शिष्यः**—पण महाराज, बलहीन याचा अर्थ ब्रह्मचर्यविहीन असा श्रीशंकराचार्यांनीं केला आहे.

**स्वामीजीः**—ठीक आहे. त्यांचा अर्थ बाजूला राहूं दे. शरीरानें दुबळा तो आत्मज्ञानाला नालायक असा माझा अर्थ आहे.

**शिष्यः**—पण, नुसतें शरीर लठ्ठ असून काय उपयोग ? शरीरानें लठ्ठ व बुद्धीनें मठ्ठ अशीं किती तरी माणसें आपण पाहतों.

**स्वामीजीः**—पण चांगल्या कल्पनांचें बीजारोपण त्यांच्या ठिकाणीं करण्याचा यत्न तुम्ही कधीं करितां काय ? अशा कल्पना त्यांच्या ठिकाणीं एकवार रुजल्या कीं, किती तरी झपाट्यानें तेथें त्या वाढीस लागतील. दुबळ्या माणसांत हा जोम नसतो. दुबळ्या माणसाच्या मनाची कोणातीही भावना किती लवकर बेताल होते, हें तूं पहात नाहींस काय ? अल्पस्वल्प कारणावरूनही त्याला राग किती लवकर येतो ? पाप्याच्या पितरांना स्त्रीविषयक वासनाही कशी जलाल असते ?

**शिष्यः**—पण या गोष्टीला अपवादही आहेतच.

**स्वामीजीः**—नाहीं कोण म्हणतो ? ज्यानें मनावर पूर्ण ताबा आधीं मिळविला असेल, त्याला शरीराची काय किंमत ? शरीर कोणत्या स्थितींत आहे याचा हिशेबच त्याला नसतो. माझ्या म्हणण्याचा मुख्य मुद्दा इतकाच कीं, आरंभीं शरीर सुस्थितींत असल्यावांचून आत्मानुभवाच्या मार्गावर पाऊल ठेवण्याची योग्यता प्राप्त होत नाहीं. शरीरांत अल्पस्वल्प व्यंग असलें तर तेवढेंसुद्धां आत्मानुभवाच्या आड येतें असें परमहंसही सांगत.

स्वामीजींचा नूर बदलला आहे असें पाहून हा विषय अधिक पुढें रेंटण्याची हिंमत शिष्याला झाली नाहीं. तेव्हां स्वामीजींचें मत ग्राह्य मानून तो स्वस्थ बसला. थोड्या वेळानें इतर मंडळीला स्वामीजी म्हणाले, 'अहो, पण आज एक नवल तुम्हीं ऐकलें काय ? निवेदितेच्या स्पर्शानें अपवित्र झालेलें अन्न या भटानें खाल्लें ! बरें, मिठाई खाल्ली तर खाल्ली; पण तिनें शिवलेलें पाणीसुद्धां तो प्याला ! ( शिष्याकडे वळून ) अरे, हें पाणी तूं कसें प्यालास ?'

**शिष्यः**—महाराज, आपली आज्ञा म्हणून. श्रीगुरूच्या आज्ञेनें हवी ती गोष्ट मी करीन. पण खरें म्हणाल तर तें पाणी पितांना मला कसेंसेंच होत होतें. पण आपण तें प्यालां तेव्हां आपला प्रसाद म्हणून मीही तें प्यालों.

**स्वामीजीः**—अरेरे! आतां तुझी जात कायमची गेली. ब्राह्मणवर्गातील आचार्य म्हणून तुला कोणीही मानणार नाहीं.

**शिष्यः**—न मानीनात, मला त्याची काय पर्वा आहे? आपला हुकूम झाला तर म्हाराचें अन्नसुद्धां मी खाईन!

शिष्याचे हे शब्द ऐकून सर्व मंडळी खोखो हंसत सुटली. आमची ही बैठक मध्यरात्रीपर्यंत चालू होती.

कालचक्र फिरत आहे. स्वामीजी, स्वामी योगानंद, भगिनी निवेदिता या विभूती या जगावर आतां राहिल्या नाहींत. त्यांचें पुण्यस्मरण मात्र अगदीं ताजें आहे. त्यांचें हें स्मरण अल्पस्वल्प अंशानें तरी लोकांस करून देण्याचें भाग्य शिष्यास प्राप्त झालें, ही त्याची मोठीच पुण्याई आहे असें तो समजतो.

***

## [ २१ ]

[ **स्थळः**—बेलूर येथील मठ, १८९८ ]

आज शिष्य मठांत आला होता. मठाची जागा बदलून सध्यां मठस्थ मंडळी नीलांबरबाबूंच्या बगीच्यांत रहात होती. स्वतःचा मठ बांधण्यासाठीं विकत घेतलेली जागा पाहण्यास शिष्याला बरोबर घेऊन स्वामीजी गेले. त्या वेळीं या जागीं पुष्कळ रान वाढलें होतें. त्याच्या उत्तरेच्या भागांत एक लहानसें दुमजली घरही होतें. स्वामीजी इकडे तिकडे फिरतां फिरतां मठाच्या इमारतीची रूपरेषा शिष्याला सांगूं लागले.

दुमजली घराच्या पूर्वेकडील बाजूस बोट करून स्वामीजी म्हणाले, 'या ठिकाणीं साधूंना रहावयास जागा होईल. आमचा मठ म्हणजे बौद्धिक ज्ञान आणि अभ्यास यांचें घर व्हावें अशी माझी इच्छा आहे. या ठिकाणीं उत्पन्न झालेली शक्ति साऱ्या जगभर संचरेल; आणि मानवी जीवनाचा ओघ ती पार बदलून टाकील. ज्ञान, भक्ति, योग आणि कर्म यांचा समुच्चय ज्यांत

होईल अशीं ध्येयें येथून बाहेर पडतील. येथील रहिवाशांच्या नुसत्या शिर-श्चालनानें साऱ्या जगाला नवी जीवनकला प्राप्त होईल. खरे सत्यान्वेषी लोक कालांतरानें आपलें हें मध्यवर्ती स्थान बनवितील. काय सांगूं, असे हजारों विचार या वेळीं माझ्या मनांत उभे राहतात.

या समोरच्या दक्षिणभागीं शालागृह होईल. त्या ठिकाणीं व्याकरण, मीमांसा, न्याय, वाङ्मय, श्रुति इत्यादि विषयांचा अभ्यास चालेल, आणि त्याबरोबरच इंग्रजी भाषेचें ज्ञानही दिलें जाईल. या ठिकाणीं बालब्रह्मचाऱ्यांची राहाण्याची जागा करूं. जे ब्रह्मचारी येथें कायमचे राहून वेदाभ्यास करतील त्यांच्या अन्नवस्त्राची सोय मठांतून करण्यांत येईल. पांच वर्षे येथें राहिल्या-नंतर वाटल्यास त्यांनीं बाहेर जाऊन गृहस्थाश्रम स्वीकारावा. कोणा ब्रह्मचा-ऱ्याची वर्तणूक अयोग्य आहे असें दिसल्यास त्याला तात्काळ हाकून देण्याचा अधिकार मठाधिकाऱ्यांकडे राहील. जात अथवा धर्म यांचा विचार आमच्या मठांत केला जाणार नाही. याबद्दल ज्याला वैषम्य वाटेल त्यानें आमच्या मठांत येऊ नये. तथापि, सर्वांच्या पंक्तीला बसून ज्याला जेवावयाचें नसेल त्यानें आपली व्यवस्था वेगळी करण्यास हरकत नाहीं. त्यांनीं इतरांबरोबर शाळेच्या वर्गांत हजर राहावें. तथापि, अशांच्या वर्तणुकीवरसुद्धां मठाधिका-ऱ्यांची देखरेख राहील. अशा रीतीनें सर्व कारभार सुरळीत चालला तर मोठी मजा होईल, नाहीं बरें ?'

**शिष्यः**—प्राचीन काळीं गुरुगृहींच राहून शिष्य अभ्यास करीत. त्याच पद्धतीचें पुनरुज्जीवन आपण करणार तर ?

**स्वामीजीः**—बरोबर बोललास. अर्वाचीन पद्धतींत तत्त्वज्ञानाच्या अभ्या-सास वाव नाहीं. ब्रह्मचर्य स्वीकारून हा अभ्यास करतां येईल अशीं स्थळें आपण निर्माण केलीं पाहिजेत. तथापि, अर्वाचीन परिस्थितीला अनुसरून जुन्या पद्धतींत थोडाबहुत बदल करणें अवश्य आहे. असा बदल करण्यास आपणच आरंभ केला पाहिजे. असो; पण याविषयीं पुन्हां केव्हां तरी बोलूं.

या जाग्याचा तो दक्षिणेकडचा भाग केव्हां तरी घेऊन टाकला पाहिजे. त्या ठिकाणीं आपण अन्नसत्र घालूं. खऱ्या साधकांची सोय मात्र तेथें कर-ण्यांत येईल. त्याला श्रीरामकृष्णाचें नांव देण्यांत येईल. पैसा जमेल त्या

मानानें या कार्याचा परिघ आंखला पाहिजे. तथापि दोन तीन माणसांपासूनच आरंभ करण्यास हरकत नाहीं. कांहीं चलाख ब्रह्मचाऱ्यांना विशेष शिक्षण देऊन हा आश्रम चालविण्यास पात्र केलें पाहिजे. प्रसंगीं भिक्षा मागूनसुद्धां अन्नसत्र चालविण्याची त्यांची तयारी असली पाहिजे. पैशाची मदत त्यांना मठांतून मिळणार नाहीं. अन्नसत्राला लागणारा पैसा स्वतःच्या बळावर त्यांनीं उभा केला पाहिजे. पांच वर्षे अन्नसत्रांत राहिल्यानंतर त्यांचा मठांत प्रवेश होईल; आणि पांच वर्षे मठवास केल्यानतर त्याची इच्छा असल्यास मठाधिकारी त्यांना संन्यासदीक्षा देतील. संन्यास घेण्याची पात्रता त्यांच्या आंगीं आहे की नाहीं, हें ठरविण्याचा अधिकार अर्थातच मठाधिकाऱ्यांकडे राहील. तथापि, हे नियम सामान्य स्वरूपाचेच समजावे. एखादा ब्रह्मचारी कांहीं विशेष गुणांनीं युक्त असला तर या नियमांचें उल्लंघन करूनही त्याला दीक्षा देण्याचा अधिकार मठाधिपतींकडे राहील. सामान्य ब्रह्मचाऱ्यांनीं मात्र या नियमांनीं चालून स्वतःची योग्यता हळू हळू वाढविली पाहिजे.

**शिष्यः**—महाराज, मठांत असे वेगवेगळे भाग करण्याचें कारण काय ?

**स्वामीजीः**—माझ्या म्हणण्याचा मतलब तुझ्या ध्यानांत आला नाहीं. अन्नदान हें सर्वांत श्रेष्ठ होय. प्रथम अन्न पाहिजे. नंतर विद्यादान; आणि विद्यादानानंतर सर्वात वरिष्ठ असें ब्रह्मज्ञान. या तीन दानांचा संगम आपण आपल्या मठांत केला पाहिजे. ब्रह्मचाऱ्यांच्या हातून रोज अन्नदान घडूं लागलें म्हणजे निरपेक्ष सेवेची कल्पना त्यांच्या चित्तांत येईल. अशा प्रकारची जनसेवा हीच ईश्वराची सेवा आहे, हें त्यांच्या मनावर ठसेल. अशा रीतीनें लोकसेवेचें वळण त्यांच्या मनाला लागलें म्हणजे चित्तशुद्धि होऊं लागेल आणि तीबरोबर सात्विक वृत्ती उदय पावूं लागतील. चित्त सत्त्वस्थ झालें म्हणजे ब्रह्मज्ञानग्रहणास तें पात्र होतें. अशा रीतीनें हे ब्रह्मचारी हळू हळू संन्यासदीक्षेला योग्य होतील.

**शिष्यः**—महाराज, ब्रह्मज्ञान जर सर्वांत श्रेष्ठ तर अन्नदान आणि विद्यादान यांजपासून आरंभ करण्याची काय जरूर आहे ?

**स्वामीजीः**—अरे वेड्या, अजूनसुद्धां हें तुला समजलें नाहीं ? आपले सध्यांचे दिवस बोलूनचालून दुष्काळाचे आहेत. स्वतः भिक्षा मागून क्षुधितांना

तुम्हीं अन्नदान केलें तर त्यांत तुमचेंच हित आहे असें नसून तुमच्या सत्कार्याला सामान्य जनतेची सहानुभूतीही मिळेल. तुम्ही निरपेक्ष जनसेवा करतां हें पाहून संसारांत डुबलेले आणि कनककामिनीच्या मागें लागलेले सामान्य संसारी लोकसुद्धां तुम्हांस मदत करण्यास पुढें सरसावतील. नुसतें विद्यादान करण्यापेक्षां अन्नदानही त्याबरोबरच तुम्हीं केलें, तर तुमच्या मदतगारांची संख्या हजारपटीनें वाढेल. अन्नदानाकरितां जितकी मदत तुम्हांला मिळेल, तितकी इतर कोणत्याही कामासाठीं मिळणार नाहीं. अशा प्रकारच्या कार्यांत प्रत्यक्ष परमेश्वरसुद्धां तुमचा पाठीराखा होईल. मग माणसाबद्दल काय बोलावें? अशा रीतीनें आपल्या कार्याकडे सामान्य जनतेचें लक्ष वेधलें म्हणजे त्यांच्यांतसुद्धां विद्यार्जनाची हौस उत्पन्न होईल. यासाठींच अन्नदान प्रथम पाहिजे असें मी म्हणतों.

**शिष्यः**—महाराज, अन्नसत्र घालावयाचें म्हणजे प्रथम जागा पाहिजे. तीवर इमारत बांधली पाहिजे; आणि तें चालवावयास शिवाय पैसाही पाहिजे. इतका पैसा कोठून आणावयाचा?

**स्वामीजीः**—या जाग्याचा दक्षिणेकडील भाग मी अगोदरच तुमच्या स्वाधीन करणार आहें. त्या बेलाच्या झाडाखालीं प्रथम लहानसें गवती झोंपडें आपण उभारूं. कोणी आंधळे, लंगडे तेथें बाळगून त्यांच्या सेवेला तूं सुरवात कर. स्वतः माधुकरी मागून अशा एकदोन माणसांना तूं पोटाला घाल किंवा कोरान्न मागून तें शिजवून घाल. कांहीं दिवस अशी सेवा तू केलीस म्हणजे तुला माणसांच्या अथवा पैशांच्या मदतीची उणीव पडत नाहीं, असें तुलाच दिसून येईल. '**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति।**'

**शिष्यः**—आपलें म्हणणें खरें आहे; पण हेंच कार्य एकसारखें करीत राहिल्यानें अखेरीस तेंच बंधनरूप होणार नाहीं काय?

**स्वामीजीः**—कर्मांच्या फळाची आसक्ति तुझ्या चित्तांत नसली आणि स्वार्थाच्या पलीकडे जाण्याची तीव्र इच्छा तुला खरोखर झाली असली तर अशीं सत्कार्यें तुझीं बंधनें तोडतील ही खूणगांठ लक्षांत ठेव. अरे, अशीं कर्में बंधनरूप होतात हें तुझें म्हणणें किती अविचाराचें आहे बरें? स्वार्थबुद्धीमुळें उत्पन्न झालेलीं बंधनें तोडण्यास निष्काम कर्मांवांचून दुसरा मार्ग नाहीं.

**शिष्यः**—आपले हे विचार अधिक विस्तारानें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**स्वामीजीः**—गरिबांसाठीं लहान लहान पण हवा खेळेल अशा खोल्या आपण बांधल्या पाहिजेत. एका खोलींत दोनतीन माणसें असावीं. स्वच्छ आंथरूण पांघरूण आणि कपडा हीं आपण त्यांना पुरवावीं. आठवड्याकांठीं एखाद-दुसरे वेळां कोणी वैद्यानें आपल्या सवडीप्रमाणें त्यांना येऊन पहावें. हा सेवाश्रम म्हणजे अन्नसत्राचाच एक भाग समजावा. या ठिकाणीं आजाऱ्यांची शुश्रूषा करावी. अशा रीतीनें या कार्याला स्वल्प आरंभ आपण केला, तर पैशाची पुष्कळ मदत आपणांस मिळेल. अधिक पैसा हातीं येतांच कार्याचें क्षेत्र वाढविण्यास हरकत नाहीं. आपले अन्नसत्र अन्नदानानें सदोदित गजबजलेलें राहिलें पाहिजे. तांदळाच्या पेजेचे ओघ गंगेत मिळून तिचें पाणी अधिक पांढरें झालें पाहिजे. एवढें अन्नसत्र माझ्या डोळ्यांनीं मीं पाहिलें तर माझा जीव थंड होईल.

**शिष्यः**—महाराज, आपल्याला ही सदिच्छा होत आहे त्या अर्थी आज ना उद्यां ती खचित पूर्ण होईल.

शिष्याचे हे शब्द ऐकून स्वामीजी कांहीं काळ स्तब्ध होत्साते गंगेच्या ओघाकडे पहात राहिले. मग थोड्या वेळानें शिष्याला ते प्रफुल्ल वदनानें म्हणाले, ‘ अरे, तुम्हांपैकीं कोणाला केव्हां ही जागृति येईल हें कोणीं सांगावें ? तुम्हांपैकीं एकावरही जगन्मातेची कृपा झाली, तर तो एकटाच असलीं शेंकडों अन्नसत्रें उभारील. ज्ञान, सत्ता आणि भक्ति हीं सर्वांच्या ठिकाणीं बीजरूपानें आहेतच. त्यांची व्यक्तदशा मात्र कमीअधिक प्रमाणानें आपल्या नजरेस येते; आणि यामुळेंच आपण कोणाला लहान तर कोणाला मोठा समजतों. जीवमात्राच्या अंतःकरणावर जो पडदा पडला आहे त्यामुळें त्याचें पूर्णत्व झांकून गेलें आहे. हा पडदा दूर होतांच पूर्णत्व तेथें स्वयंभू असतेंच. हें पूर्णत्व स्पष्टत्वास आलें, कीं इच्छा आणि तिची तृप्ति हीं बरोबरच घडून येतात.

परमेश्वराची कृपा झाली तर हा मठ एक नमुनेदार संस्था होऊन बसेल. मानवी जीविताच्या अनेक साध्यांचें केंद्रस्थान ती होईल. परमहंसांच्या ठिकाणीं सर्व साध्यांची एकवाक्यता झाली होती. अशीच एकवाक्यता या संस्थेंत आपण निर्माण करूं शकलों तर परमहंसांचें तें कायमचें स्मारक होईल.

आब्रह्मचांडाल सर्व धर्माची एकरूपता येथें प्रत्ययास आली पाहिजे. श्रीरामकृष्णांची स्थापना मठाच्या भूमींत परवां मीं केली तेव्हां त्यांच्या कल्पनांचा पूर साऱ्या जगावर वहात आहे, या भावनेनें माझें अंतःकरण भरून गेलें. माझ्या हातून होईल तितकी कामगिरी मी तरी उत्तम रीतीनें बजावीत आहें; आणि जीवमान असेपर्यंत ती मी तशीच चालवीन. लोकांत हिंडून श्रीरामकृष्णांच्या कल्पनांचा प्रसार तुम्हीं केला पाहिजे. वेदांत ग्रंथ नुसते वाचून काय फायदा? अद्वैतसिद्धांताची सत्यता आपण व्यवहारांत पटविली पाहिजे. हें अद्वैत तत्त्वज्ञान शंकराचार्यांनीं पर्वतांच्या गुहांत आणि अरण्यांत कोंडून ठेविलें आहे. तेथून तें बाहेर आणून सामान्य जनांच्या व्यवहारांत त्याला चालतेंबोलतें करावें हाच माझा जीवितहेतू आहे. अद्वैतसिद्धांताच्या सिंहनादानें सारें जग दुमदुमून गेलें पाहिजे. त्याचे ध्वनि आणि प्रतिध्वनी प्रत्येक झोंपड्यांत आणि राजवाड्यांत उमटत राहिले पाहिजेत. पर्वताच्या शिखरावर, भूमीच्या सपाटीवर, वृक्षमय अरण्यांत आणि वालुकामय रखरखीत जाग्यांत हा ध्वनी ऐकूं आला पाहिजे. तुम्ही सारे माझ्या मदतीला या. याच कार्याला तुम्ही आपणांस वाहून घ्या.

**शिष्यः**—पण महाराज, अशा रीतीनें कर्माच्या पसाऱ्यांत गढून जाण्यापेक्षां एकांतवासांत ध्यानस्थ राहून आत्मानुभव घ्यावा, हें माझ्या बुद्धीला अधिक पटतें.

**स्वामीजीः**—याचें कारण हेंच कीं, तुझ्या बुद्धीला बेशुद्धि आली आहे, ती बधिर झाली आहे. असें नुसतें लांकूड होऊन काय होणार आहे? अशा रीतीनें अद्वैत ज्ञान तुझ्या अनुभवाला आलें, तरी गोड रस एकेकट्यानेंच चाखण्यांत तुला मौज वाटते काय? त्याचा वांटा आपण सर्वांना द्यावा. अशा रीतीनें तूं एकटा मुक्त झालास तर तुझ्या मुक्तीचा जगाला काय उपयोग? आपला देह सोडविण्यापूर्वी साऱ्या जगाला आपण मुक्तीच्या वाटेला लावावें. तसें झालें तरच ब्रह्माच्या ठिकाणीं तूं कायमचा स्थिर होशील. आकाशाप्रमाणें अनंत अशा सत्यरूपांत तुला मिसळून जावयाचें आहे. गवताच्या पातीपासून तों अखेरच्या व्यक्तरूपापर्यंत सर्वत्र आपला वास आहे, हें तुला अनुभवावयाचें आहे. तूं परसेवेच्या मार्गानें चाललास तर या अनुभवाचा आरंभ आतांच होईल. अद्वैत सिद्धांताचा प्रत्यय तुला येऊं लागला, तर मी आणि

तो वेगळा ही भावना आपोआपच नष्ट होईल. मग सर्वांना एकाच प्रेमानें मिठी मारण्याशिवाय तुला गत्यतर उरणार नाहीं. मी ज्याला व्यवहारी वेदांत म्हणतों तो हाच. आतां तरी तुझ्या ध्यानांत आलें ना ? ब्रह्म वस्तुतः एकच आहे. पण सापेक्ष अवस्थेंत तें अनेकरूपानें भासतें. नाम आणि रूप यांमुळेंच ही सापेक्ष अवस्था निर्माण झाली आहे. अरे, या कुंभाचें नामरूप नष्ट झालें तर बाकी काय उरेल ? बाकी उरेल ती शुद्ध माती; आणि त्याचें चिरंतन रूप म्हटलें तर तेंच. अशाच रीतीनें भ्रमदृष्टीनें अनेक आकार तूं पाहातोस आणि त्यांना कुंभ, भित, मठ अशीं नांवें तू देतोस. या नामरूपांमुळेंच दृश्य जगाला अस्तित्व आलें आहे आणि यामुळेंच आत्मानुभवाच्या मार्गात मोठा अडथळा उत्पन्न झाला आहे. नाम आणि रूप यांचें अस्तित्व वास्तविक नसून तें आभासरूप मात्र आहे. नामरूपामुळेंच सृष्टींत विविधता उत्पन्न झाली आहे. ही विविधता दिसेनाशी झाली कीं ब्रह्मानुभव वेगळा नाहीं.

**शिष्यः**—विविधतेचा हा भ्रम कोठून उत्पन्न झाला ?

**स्वामीजीः**—तो कोठून उत्पन्न झाला हें मीं तुला पुढें सांगेन. जेव्हां दोरी सापासारखी दिसते तेव्हां तिचें रूपांतर होऊन ती खरोखरच साप बनलेली असते काय ? साप पाहून तूं भीतीनें पळतोस. येथें तुला त्या दोरीनें पळविलें कीं, तुझ्या अज्ञानानें ?

**शिष्यः**—अर्थात् माझ्या अज्ञानानें.

**स्वामीजीः**—ठीक; तर मग तूं असा विचार कर कीं, ज्या वेळीं हा आभास नाहींसा होऊन ती दोरी आपल्या खऱ्या स्वरूपानें तुला दिसू लागेल, तेव्हां पूर्वीच्या अज्ञानाबद्दल तुझें तुलाच हंसूं येणार नाहीं काय ? त्या वेळीं सर्प आणि सर्पाचा आकार हीं दोन्ही नामरूपें नुसतीं भ्रमामुळें उत्पन्न झालीं होतीं हें तुला उघड दिसेल कीं नाहीं ?

**शिष्यः**—होय महाराज.

**स्वामीजीः**—असें आहे तर नाम आणि रूप हीं दोन्ही असत्य आहेत हें आपोआपच सिद्ध झालें. अशा रीतीनें ब्रह्म हें एकच अस्तित्व सत्यरूप आहे हेंही स्पष्ट होतें. भ्रमाच्या संधिप्रकाशांत अनेक आकार तुला दिसून ही माझी बायको, हें माझें मूल, हें माझें अमकें, हें दुसऱ्याचें, अशा प्रकारची

विविधता तुला दिसू लागते आणि यामुळें तुला आत्मानुभव होत नाहीं. गुरुकृपेनें आणि तुझ्या स्वतःच्या बुद्धीच्या जागृतीनें विविधतेचा हा पडदा दूर झाला म्हणजे हें नामरूपांचें जग तुला दिसेनासें होईल. त्या सर्वांच्या पाठीमागें असलेलें स्वयंभू आणि स्वयंप्रकाश आत्मरूप तुझ्या प्रत्ययास येईल. असें झालें म्हणजेच ती स्वतः विश्वरूप आहे हा अनुभव तुला येईल. त्याच वेळीं गवताच्या पातीपासून ब्रह्मदेवापर्यंत सारें अस्तित्व एकरूप आहे असें तुझ्या प्रत्ययास येईल. त्या वेळींच '**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्व संशयाः**' ही स्थिति तुला प्राप्त होईल.

**शिष्यः**—महाराज, पण या साऱ्या भ्रमाचें अथवा मायेचें मूळ कोठें आहे, हें जाणण्याची उत्कट इच्छा साहजिकपणेंच होते.

**स्वामीजीः**—जी वस्तु कधींकाळीं तरी नष्ट होते, तिला खरें अस्तित्वच नसतें, हा सिद्धांत तुझ्या लक्षांत आला असेलच. कांहीं काळ तिचें अस्तित्व भासतें हीच माया. ज्याला ब्रह्मानुभव झाला तो माया कोठें आहे असाच प्रश्न करील. माया ही नुसती कल्पनाच होती असें तो म्हणणार नाहीं काय? त्याला दोरी ही दोरीच दिसेल. सर्परूपानें ती तो कधींही पाहणार नाहीं. तिला सर्प समजून पळत सुटणाऱ्याकडे पाहून त्याला हसूं मात्र येईल. यासाठींच अज्ञान, भ्रम अथवा माया यांना वास्तविक अस्तित्व नाहीं. त्यांचें अस्तित्व निरपेक्ष नाहीं. यामुळें मायेचें स्वरूप सत्य नाहीं आणि असत्यही नाहीं. तें अमुक असा कांहीं निश्चय त्याबद्दल करितां येत नाहीं. '**सन्नाप्यसन्नाप्युभयात्मिकानो।**' ती सत्य नाहीं, असत्य नाहीं अथवा उभयतांचें मिश्रणही नाहीं अशा प्रकारें जिचें वर्णनच करितां येत नाहीं तिजबद्दल कांहीं प्रश्न अथवा उत्तर हींही संभवत नाहींत. अशा वस्तूबद्दलचा प्रश्न जसा निरर्थक तसेंच त्याचें उत्तरही निरर्थक होय. याशिवाय अशा वस्तूबद्दल प्रश्न करणें हें मुळांतच तर्कबुद्धीला विरुद्ध आहे. हें कसें होतें तें आतां तुला सांगतों. ज्या वस्तूला आपणांस कांहीं नांव देतां येतें अथवा जिचा कांहीं आकार आपल्या डोळ्यांना दिसतो तिजबद्दलच प्रश्नोत्तरें संभवतात. काल, दिशा, नाम आणि रूप या बंधनांत असलेल्या वस्तूबद्दलच कांहीं चर्चा संभवते. पण जेथें हीं बंधनें नाहींशीं झालीं आहेत तेथें बुद्धि पोहोंचूं शकत नाहीं. मग प्रश्न विचारणें आणि उत्तर देणें हीं दोन्ही कार्यें असंभाव्यच नव्हेत काय? ब्रह्म दिक्कालातीत आहे. प्रश्नो-

त्तरांनीं तें समजुतीच्या आटोक्यांत कधीं तरी येईल काय ? यासाठींच शास्त्रें आणि मंत्र यांतील सत्यही सापेक्ष आहे. तें निरपेक्ष नव्हे. अज्ञानाला स्वतःचें असें कांहीं स्वरूपच नाहीं. मग अशी वस्तु तुझ्या जाणिवेंत कशी येणार ? ब्रह्मानुभवानंतर अशा प्रश्नोत्तरांना अवकाशच उरणार नाहीं. श्रीरामकृष्ण एक गोष्ट सांगत असत.

एके वेळीं एक ब्राह्मण आपल्या शिष्याच्या घरीं जावयास निघाला. बरोबर थोडें ओझें होतें, तें घेण्याकरितां कोणी तरी मजूर तो शोधूं लागला. बराच शोध करूनही वरच्या जातीचा मजूर कोणी मिळेना. तेव्हां एका चांभाराला तें ओझें उचलण्यास त्यानें सांगितलें. आपण हीन जातीचा हें जाणून तो चांभार कांकूं करूं लागला. ब्राह्मण म्हणाला, 'तूं मुकाट्यानें चल, कोणीं कांहीं विचारलें तर जबाबच देऊं नको म्हणजे झालें.' अखेरीस हो ना करतां चांभारानें ब्राह्मणाचें ओझें उचललें आणि त्याजबरोबर तो चालूं लागला. शिष्याच्या घरीं पोंचतांच चांभारानें डोक्यावरील ओझें खाली ठेवलें आणि तो बाजूस उभा राहिला. जवळच एक जोडा पडला होता त्याजकडे बोट दाखवून घरचा यजमान म्हणाला, 'अरे, तो जोडा जरा पलीकडे ठेव पाहू ?' चांभार स्वस्थ राहिला. तेव्हां यजमान ओरडून म्हणाला, 'अरे, चांभारड्या, मी सांगतों तें तुला ऐकूं आलें नाहीं काय ?' हे शब्द ऐकतांच ब्राह्मणाकडे वळून चांभार म्हणाला, 'महाराज, आतां येथें राहण्याची सोय नाहीं. माझें बेंड फुटलें.' इतकें बोलून तो पळतच सुटला.

स्वतःच्या अज्ञानाची ओळख होतांच तेंही असेंच पळून जातें.

**शिष्यः**—पण महाराज, हें अज्ञान आलें कोठून ?

**स्वामीजीः**—अरे, ज्याला अस्तित्वच नाहीं तें येणार कोठून ? येणें आणि जाणें या क्रिया संभवण्यास आधीं अस्तित्व तरी हवें ना ?

**शिष्यः**—तर मग हे इतके जीवजीवडे आणि या जड वस्तु कोठून आल्या ? यांचें मूळ कोठें ?

**स्वामीजीः**—त्या आल्या नाहींत आणि गेल्याही नाहींत. मग त्यांना मूळ कशाचें ? सर्व अस्तित्व एकच आहे. तेंच ब्रह्म. तें एकच ब्रह्म तूं नानाविध रूपांनीं पाहतोस. मायेनें तुझे डोळे विकृत झाले असल्यामुळें एकाचीं

अनेक रूपें तुला भासतात. नाम आणि रूप यांचा छंद घेऊन अनेक नामरूपें तूं पहातोस.

**शिष्यः**—पण हीं अनेक नामरूपें तरी कोठून आलीं ? मुळांत कांहींच नसतां हा भ्रम कसा झाला ?

**स्वामीजीः**—हें अज्ञान अथवा ही माया अनिर्वचनीय आणि अनादि आहे असे तिचें वर्णन शास्त्रांनीं केलें आहे. चक्राकार परिभ्रमण करीत असलेल्या वस्तूंत अमुक पहिली म्हणून जसे निश्चित करितां येत नाहीं, त्याचप्रमाणें मायेचें उगमस्थान अमुक असें बोटानें दाखवितां येत नाहीं. तथापि मायेला अंत आहे. अनाद्यनंत असें एक ब्रह्म मात्र आहे. सर्पभ्रम दूर झाला म्हणजे दोरीचें मूळचें स्वरूप जसें कायमच असतें, त्याचप्रमाणें मायानिर्मित भ्रम दूर झाला म्हणजे स्वयंभू ब्रह्म जसेंच्या तसेंच राहतें. याकरितांच ब्रह्मावर विश्वाचा आभास झाला आहे असे वेदान्तशास्त्राचें म्हणणें आहे. गारुडी जसा दृष्टि-भ्रम उत्पन्न करितो आणि नानाविध पदार्थ दृष्टीस पाडतो तसेंच हें आहे. पण विश्वाच्या या आभासामुळें ब्रह्मस्वरूपांत कांहीं फरक पडत नाहीं. आतां तुझ्या लक्षांत आलें ना ?

**शिष्यः**—तथापि एका गोष्टीबद्दल मला शंका आहे.

**स्वामीजीः**—ती कोणती ?

**शिष्यः**—उत्पत्ति, स्थिति आणि लय हे ब्रह्मरूपावर होणारे आभास असून त्यांना निरपेक्ष अस्तित्व नाहीं असें आपण आतांच म्हणालां. पण असें कसें व्हावें ? आभास झाला तरी तो पूर्वानुभवाच्या वस्तूचाच असणार. जिचा अनुभव पूर्वी कधींच आला नाहीं, अशी वस्तु पाहिल्याचा भ्रम तरी कसा होईल ? ज्यानें सर्प कधींच पाहिला नाहीं त्याला दोरीवर सर्पाचा भासही होणार नाहीं. त्याचप्रमाणें ज्यानें पूर्वी सृष्टि अनुभविली नाहीं त्याला ब्रह्माच्या ठिकाणीं सृष्टि तरी कशी दिसेल ? याकरितां सृष्टि ही सत्य वस्तु असली पाहिजे. तसें असल्याशिवाय तिचा आभास होणें शक्य नाहीं. सृष्टि सत्यवस्तु आहे असें म्हटलें कीं कायमचें द्वैत उभें राहिलेंच.

**स्वामीजीः**—ज्याला ब्रह्मानुभव झाला आहे, त्याला सृष्टीचें अस्तित्वच भासत नाहीं. सृष्टि मुळांतच नाहीं असें म्हणून तुझा प्रश्न तो उडवून देईल.

'एकमेवाद्वितीय ब्रह्म' मात्र तो अनुभवीत असतो. तो सर्प कधींच पहात नसून नित्य दोरी पहात असतो. आतां, तुला दोरी दिसत नसून सर्प दिसतो ही तुझ्या दृष्टीची उणीव आहे असें म्हणून तो ती दृष्टि साफ करण्याच्या नादाला लागेल. त्याच्या कृपेनें आणि तुझ्या अभ्यासानें तुझी दृष्टि निवळली म्हणजे सर्पाचा आभास आपोआपच नाहींसा होईल. सर्पानुभव गेला म्हणजे स्वयंभू दोरी आपोआपच प्रकट होईल. ब्रह्मानुभव होतांच सृष्टीचा अनुभव नाहींसा होईल. अशा स्थितीत पहिला अनुभव खोटा होता असे म्हणण्यावांचून तुला गत्यंतर काय आहे? सत्य ब्रह्मरूपावर तो मिथ्या आभास होतो असेंच तुला म्हटलें पाहिजे. या आभासाला आरंभ केव्हां आणि कसा झाला हें सांगतां न आलें तर न येऊ दे. हा प्रश्न तडीस लावण्याच्या नादीं लागून कांहीं फायदा नाहीं. करतलामलकवत् ब्रह्मानुभव होईपर्यंत हा प्रश्न सुटणें शक्य नाहीं; आणि ब्रह्मानुभवानंतर तो उरत नाहीं. किंबहुना तो उत्पन्न होण्याचीच जरूर नसते. मुक्यानें साखर खावी तसा प्रकार मग घडून येतो. साखरेची गोडी अनुभविली तरी ती त्याला सांगतां येत नाहीं.

**शिष्यः**—तर मग असल्या गोष्टींची इतकी चर्चा तरी कां करावी? कारण असली चर्चा म्हणजे शेवटीं एरंडाचें गुऱ्हाळच.

**स्वामीजीः**—छे, छे, असें म्हणूं नको. हे मुद्दे प्रथम बुद्धिपूर्वक ग्रहण व्हावे लागतात. त्यांची समजूत बुद्धीला तरी पटणें अवश्य असतें. यासाठीं हा वादविवाद आरंभीं आवश्यकच आहे. तथापि, नुसत्या बुद्धीच्या समाधानानें सत्यवस्तूचा अनुभव होणार नाहीं हेंही खरें आहे. **'नैषा तर्केण मतिरापनेया।'** अनुभव ही तर्काच्या आणि बुद्धीच्या पलीकडली चीज आहे.

अशा प्रकारें संभाषण चालू असतां आम्ही मठांत येऊन पोंचलों. तेथील संन्याशांना व ब्रह्मचाऱ्यांना आमच्या सभाषणाचें सार सांगितलें. माडीवर जातां जातां शिष्याकडे वळून ते म्हणाले, **' नायमात्मा बलहीनेन लभ्यः।'**

*

* *

[ २२ ]

[ **स्थळः**—बेलूर येथील मठ, १८९९ ]

श्रीरामकृष्णांचा संदेश जगापुढें आणण्याकरितां स्वामी त्रिगुणातीत यांनीं उद्बोधन नांवाचें बंगाली पाक्षिक नुकतेंच सुरू केलें होतें. या कार्याची रूपरेषाही स्वामीजींनींच आंखून दिली होती. पाक्षिकाचा पहिला अंक बाहेर पडल्यानंतर नीलांबरबाबूंच्या बगीच्यांतील मठांत स्वामीजींच्या दर्शनासाठीं शिष्य आला. स्वामीजींचे शेजारीं उद्बोधनाचा ताजा अंक पडला होता. तो हातीं घेऊन ते शिष्याला म्हणाले, 'अरे, हें उद्बंधन तूं पाहिलेंस काय?' असें म्हणून स्वामीजींनीं तो अंक उंच हातानें लोंबता धरला. उद्बंधन या शब्दाचा अर्थ गळफास घेऊन आत्महत्या करणें असा होतो. असो. स्वामीजींना शिष्यानें उत्तर दिलें, 'होय महाराज, अंक फार चांगला निघाला आहे.'

**स्वामीजीः**—याची भाषा, यांतील विचार इत्यादिकांत आपणांस पुष्कळशी उलथापालथ करावी लागेल. या गोष्टींना अगदीं नवेंच वळण आपण लावलें पाहिजे.

**शिष्यः**—तें कसें?

**स्वामीजीः**—श्रीरामकृष्णांचे नवे विचार लोकांपुढें तर मांडावयाचेच, पण त्यांबरोबरच बंगाली भाषेत नवा जोम आपण भरून दिला पाहिजे. उदाहरणार्थ, क्रियापदांचा मनमुराद उपयोग केल्यानें भाषेचा जोरकसपणा कमी होतो. यासाठीं क्रियापदांचा उपयोग कमी केला पाहिजे. अशा पद्धतीनें एखादा लेख लिहून तो छापण्यास जाण्यापूर्वी मला दाखव.

**शिष्यः**—महाराज, या पाक्षिकावर स्वामी त्रिगुणातीत इतकी मेहनत करीत आहेत कीं, त्या बाबतींत स्पर्धा करणें कोणालाही शक्य नाहीं.

**स्वामीजीः**—यांत विशेष तें काय? अशी मेहनत केलीच पाहिजे. झाडाखालीं धुन्या पेटवून हात जोडून बसण्यासाठींच श्रीरामकृष्णांचीं संन्यासी मुलें जन्मास आलीं आहेत असा तुझा समज आहे काय? त्यांनीं कोणतेंही काम हातीं घेतलें तर त्यांचा दांडगा उत्साह आणि मेहनत हीं पाहून लोकांनीं तोंडांत बोटच घातलें पाहिजे. उद्योग कसा करावा हें त्यांजपासून तूं शीक. हा त्रिगुणातीतच पहा ना? बिचाऱ्यानें आपला अभ्यासुद्धां सोडला. ध्यान

नाहीं, धारणा नाहीं, कांहीं नाहीं. माझ्या इच्छेची अंमलबजावणी करण्याकरितां हें सारें सोडून या उद्योगाला तो लागला. हा काय लहानसहान स्वार्थत्याग? माझ्यासाठीं एवढा त्याग करण्यास तो सिद्ध झाला, यावरून माझ्यावर त्याचें केवढें प्रेम असलें पाहिजे हें तूंच पहा. आतां अखेर मारीपर्यंत तो थांबावयाचा नाहीं. तुम्हां घरभऱ्यांत असला जोम आहे काय?

**शिष्यः**—पण महाराज, स्वामी त्रिगुणातीतांसारख्या भगव्या वस्त्राच्या संन्याशानें दारोदार हिंडावें हें आमच्या दृष्टीला कसेंसेंच दिसतें.

**स्वामीजीः**—कां बरें? आमचें हें पाक्षिक संसाऱ्यांच्याच उपयोगासाठीं नाहीं काय? नव्या विचारांचा प्रसार देशांत पुष्कळ झाला तर सामान्य जनांचेंच हित त्यांत अधिक आहे. अशा निष्काम कर्माची योग्यता ध्यानधारणेपेक्षां तूं कमी समजतोस काय? जनसेवा करून लोकहित साधावयाचें हें आमचें उद्दिष्ट आहे. पाक्षिकाचा खप वाढवून आपले खिसे भरावयाचे ही कल्पनासुद्धां आम्हांस शिवली नाहीं. आमचें काय, ना बायका ना पोरें! त्यांच्यासाठीं कांहीं कुणगा तर आम्हांस करून ठेवावयाचा नाहीं ना? पाक्षिक चांगलें चालून त्यांतून कांही नफा उरला तर त्याचा विनियोग जनसेवेकडेच होईल. नफा पुष्कळसा राहिला तर नवे मठ व सेवाश्रम आम्ही स्थापूं. याशिवाय बनतील तीं जनसेवेचीं दुसरीं कामेंही आम्ही करूं. संसाऱ्यासारखी पेटी भरून ठेवण्यासाठीं कसलाही उद्योग आम्ही खास करणार नाहीं. तूं एक गोष्ट लक्षांत ठेव कीं, आमचो प्रत्येक हालचाल लोकहितासाठींच असेल.

**शिष्यः**—पण आपले हे स्तुत्य हेतू साऱ्यांच्याच लक्षांत येतील असें नाहीं.

**स्वामीजीः**—न येईनात बापडे! आमचें सत्कर्म कोणीं जाणलें अथवा न जाणलें तरी त्यांत आमचें बरें वाईट काय आहे? लोक काय म्हणतील याकडे दृष्टि ठेवून कोणताही उद्योग आम्ही हातीं धरणार नाहीं.

**शिष्यः**—हें पाक्षिक लवकरच साप्ताहिक झालें तर फार बरें होईल.

**स्वामीजीः**—तें खरें, पण पैशाची काय वाट? श्रीरामकृष्णांच्या आशीर्वादानें द्रव्यनिधि उभा राहिला तर पुढें आम्ही दैनिकसुद्धां करूं. रोज एक लाख प्रती छापून कलकत्त्याच्या गल्ल्यागल्ल्यांतून त्या फुकट वांटूं.

**शिष्यः**—आपले हे विचार सर्वोत्कृष्ट आहेत.

**स्वामीजीः**—पण या पत्रानें आपला स्वतःचा खर्च तरी आरंभीं भागविला पाहिजे. तसें झालें म्हणजे तुलाच त्याचा संपादक बनवूं. तें आजच तुझ्या हातीं देऊन उपयोगी नाहीं. कोणताही धंदा स्वावलंबी करण्याची हिंमत आणि पात्रता तुझ्या अंगीं नाहीं. हें भाग्य आमच्यासारख्या संन्याशांसाठींच राखून ठेविलें आहे. आम्ही सर्वसंगपरित्यागी. तथापि असलीं कामें आम्हींच केलीं पाहिजेत. मरूं पण हत्यार खालीं ठेवणार नाहीं अशा निश्चयानें हीं कामें आम्हींच तडीस लावलीं पाहिजेत. तुझ्यासारखे संसारी लोक कसे असतात पहा. कोठेंही जरा खुट् झालें किंवा कोणा एखाद्यानें प्रतिकूल टीकेचा एखादा शब्दही उच्चारला कीं, तुमचे हातपाय लटपटलेच.

**शिष्यः**—महाराज, उद्बोधनाचा छापखाना सुरू झाला त्या दिवशीं कामास सुरुवात होण्यापूर्वी स्वामी त्रिगुणातीतांनीं श्रीरामकृष्णांच्या चित्राची पूजा केली; आणि या कार्यात यश यावें म्हणून आपला आशीर्वाद मागितला.

**स्वामीजीः**—त्यानें केलें तें बरोबर केलें. श्रीरामकृष्ण म्हणजे आमचें सूर्यबिंब. त्या बिंबांतून निघणाऱ्या किरणांप्रमाणें आम्ही आहों. म्हणून कोणत्याही कार्याला लागण्यापूर्वी श्रीरामकृष्णांचें पूजन करणें हेंच योग्य. त्यानें फार चांगली गोष्ट केली; पण याबद्दल मजजवळ तो कांहीं बोलला नाहीं.

**शिष्यः**—महाराज, त्यांना आपली भीति वाटते. आपणांस भेटून पहिल्या अंकाबद्दल आपलें काय मत झालें तें विचारून येण्यास त्यांनीं मला सांगितलें. आपलें मत आधीं समजल्यानंतर ते आपणांस भेटणार आहेत.

**स्वामीजीः**—अंक फार चांगला निघाला आहे आणि त्याचें एकंदर काम पाहून मला फार संतोष झाला असें त्याला कळव. त्याला प्रेमाशीर्वादही सांग. तुम्हीं सर्वांनींच आपल्याकडून होईल ती मदत त्याला केली पाहिजे. तुमची ही मदत म्हणजे रामकृष्णांची सेवाच होय.

एवढें बोलून होतें न होतें तोच स्वामी ब्रह्मानंद यांस हांक मारून उद्बोधनासाठीं लागेल तो पैसा स्वामी त्रिगुणातीत यांस देण्यास स्वामीजींनीं सांगितलें.

त्याच दिवशीं संध्याकाळीं उद्बोधनाचा विषय पुन्हां निघाला तेव्हां स्वामीजी म्हणाले, ' उद्बोधनांत आपण विधायक विचारांची मात्र चर्चा करावी. निषेधक

गोष्टी सांगितल्यानें मनुष्याचें मन अधु होतें. पुष्कळ आईबापें आपल्या मुलांना नेहमीं मूर्ख मूर्ख म्हणून अभ्यास करण्यास सांगत असतात. तूं निर्बुद्ध आहेस, तुला कांहीं येणार नाहीं, असें नित्य म्हणून अभ्यास करण्यासाठीं तीं त्यांच्या पाठीमागें लागतात. पण असें केल्यानें मुलांचा कांहींच फायदा होत नाहीं. अशा मुलांपैकीं पुष्कळशीं खरोखरच मूर्ख निपजतात असा अनुभव आपणांस येतो. असें करण्याऐवजीं दोन ममतेचे शब्द बोलून त्यांचा उत्साह वाढविला तर कालेंकरून तीं खचित सुधारतील. मुलांची ही गोष्ट मोठ्या मुलांनाही तितकीच लागू पडते. उच्च विचारांच्या बाबतींत मोठीं माणसेंही मुलांसारखीच असतात. त्यांना विधायक विचार आपण सांगत गेलों तर कालांतरानें पुरुषार्थ-लालसा त्यांच्या चित्तांत उपजेल. आपण कांहीं तरी विशेष करावें असें त्यांना वाटूं लागेल. अशा रीतीनें स्वावलंबनाची गोडी त्यांना लागेल. भाषेंत, वाङ्मयांत, काव्यांत आणि कलांत त्यांच्या चुका दाखविण्याऐवजीं या गोष्टी अधिक चांगल्या कशा कराव्या हें आपण त्यांना शिकविलें पाहिजे. कोणाचीही चूक दाखविल्यानें ऐकणाराच्या मनाला विषाद उत्पन्न होतो. आम्ही ज्यांना मूर्खातले मूर्ख समजत होतों त्यांनासुद्धां श्रीरामकृष्ण कसे हातीं धरीत, हें आम्हीं पाहिलें आहे. श्रीरामकृष्णांच्या सहवासांत त्यांच्या जीवनाचा सारा ओघ बदलून गेल्याचें आम्हांस ठाऊक आहे. निर्बुद्धांनासुद्धां शिकविण्याची त्यांची कला खरोखर मोठी प्रेक्षणीय होती.'

थोडा वेळ थांबून स्वामीजी पुढें म्हणाले, 'धर्मशिक्षण देणें म्हणजे प्रत्येक गोष्टीसंबंधीं नाक मुरडण्यास शिकविणें नव्हे. सर्व बाबींत विधायक विचार आपण लोकांस सांगितले पाहिजेत. कोणी कोणत्याही पंथाचा अथवा धर्माचा असला तरी आपले विचार त्याजपुढें स्पष्टपणें मांडावे. कोणाचाही द्वेष करण्याचें आपणांस कारण नाहीं. परस्परांचा द्वेष आणि मत्सर या दुर्गुणांनींच तुम्हांला सांप्रतच्या अवनतीस पोंचविलें आहे. आतां नवे विधायक विचार लोकांपुढें मुक्तहस्तानें मांडून या स्थितींतून त्यांना आपण वर काढलें पाहिजे. आर्यांच्या वंशजांची उन्नति अशा रीतीनें झाली तर बाकीचें जग आपोआप त्याच्या मागें जाईल. श्रीरामकृष्णांचा अवतार याच कार्यासाठीं होता. कोणाचाही बुद्धिभेद त्यांनीं केला नाहीं. जो ज्या स्थितींत असेल तेथेंच त्याला हातीं धरून पुढील मार्ग त्यांनीं दाखविला. बुद्धींत आणि नीतींत अगदीं

खालावलेल्या मनुष्यालासुद्धां दोन सुखाचे शब्द बोलून सत्कार्याकडे ते त्याला प्रवृत्त करीत. निराश झालेल्या अंतःकरणांत आशेचा अंकुर ते फोडीत. अशा रीतीनें हलक्यांतल्या हलक्या माणसालासुद्धां त्यांनीं सन्मार्गाला लावलें. त्यांच्याच मार्गानें जाऊन लोकोन्नतीचें कार्य आपण केलें पाहिजे.

तुमचा इतिहास, तुमचें वाङ्मय, तुमच्या दंतकथा आणि तुमचीं शास्त्रें-पुराणें या साऱ्यांनीं मिळून लोकांना घाबरवून टाकण्याचा उद्योग केला आहे. 'तूं अमक्या नरकांत जाशील, यमधर्म तुला अमुक शिक्षा करील,' असल्या भेसुर गोष्टी आजपर्यंत लोकांच्या कानांवर एकसारख्या पडत आहेत. यामुळें जनतेच्या चित्तावर विषादाचें दडपण पडून तें आळशी बनलें आहे. तुमच्या जिह्वारांत नुसती उदासीनता आढळून येते. याकरितां वेदवेदांताचें ज्ञान आपण लोकांस दिलें पाहिजे. त्यांतील उच्च तत्त्वें त्यांच्या चित्तावर आपण बिंबविलीं पाहिजेत. नीति, धर्म आणि सदाचार यांचें शिक्षण सर्वांस देऊन चांडाळांस आपण ब्राह्मण बनविलें पाहिजे. या साऱ्या गोष्टींची चर्चा उद्बोधनाच्या द्वारें करा. म्हातारेकोतारे, स्त्रीपुरुष या सर्वांनाच तुम्हीं जागें केलें पाहिजे. लोकांत अशी जागृति मला दिसली तरच तुमची विद्वत्ता फळास आली असें मी समजेन. तुझें काय मत आहे ?

**शिष्यः**—आपल्या आशीर्वादानें आणि आज्ञेनें मी सर्वत्र विजयी होईन असा मला भरंवसा आहे.

**स्वामीजीः**—आतां आणखीही एक गोष्ट लक्षांत ठेव. तुला आधीं शरीर सुदृढ केलें पाहिजे; आणि लोकांनाही या बाबतींत उपदेश केला पाहिजे. अजूनसुद्धां रोज डंबेलचे हात करतांना तूं मला पहातोसच. सकाळ संध्याकाळ दूरवर फिरत जा. शारीरिक श्रमही पुष्कळ कर. देह आणि मन हीं हातांत हात घालून जोडीनें चाललीं पाहिजेत. सर्व गोष्टींत आपण स्वावलंबी असावें. कोणत्याही बाबींत लोकांच्या हातानें पाणी पिण्याची संवय अगदीं वाईट. शरीर सुदृढ असल्याशिवाय सारें व्यर्थ, ही गोष्ट लोकांच्या चित्तांत ठसली म्हणजे आपण होऊनच ते तिकडे लक्ष देतील. शरीरस्वास्थ्याचें महत्त्व लोकांना अजूनही चांगलेंसें पटलेलें नाहीं. याकरितां या गोष्टीचें शिक्षण त्यांना आधीं दिलें पाहिजे.

***

[ २३ ]

[**स्थळः**—बेलूर मठ, १८९९]

**शिष्यः**—महाराज, आपल्या देशाची व समाजाची अशी दुःस्थिति कशानें झाली बरें ?

**स्वामीजीः**—तिचें खापर तुमच्याच डोक्यावर फोडलें पाहिजे.

**शिष्यः**—हें कसें ? आपण तर मला चकित केलें.

**स्वामीजीः**—आज कित्येक शतकें खालच्या वर्गांच्या लोकांस तुम्ही तुच्छ लेखीत आलां आहां; यामुळेंच साऱ्यांची अवनती होऊन जगाच्या दृष्टीनें तुमचा देश तुच्छ झाला आहे.

**शिष्यः**—त्यांना आम्ही तुच्छ लेखतों असें आपणांस कोठें आढळलें ?

**स्वामीजीः**—असें कसें म्हणतोस ? तुम्हीं ब्राह्मणांनींच वेदवेदांताचें ज्ञान इतरांपासून लपवून ठेवलें. अशा शास्त्रांना नुसता स्पर्शसुद्धां तुम्हीं त्यांना करूं दिला नाहीं. त्यांनीं सदोदित आपल्या पायांखालीं रहावें एवढी खबरदारी मात्र तुम्हीं घेतली. तत्त्वज्ञानाचा अभ्यास म्हणजे एकट्या ब्राह्मण वर्गाचा वारसा. अशा रीतीनें तुम्ही आजपर्यंत वागत आलां. यांतला वांटा कोणाला मिळावा कीं नाहीं हें ठरविण्याचा अधिकार तुम्हीं आपल्या हातांत ठेवला. येथें आलेल्या इतर मानववंशास तुम्हीं क्षुद्र आणि अनार्य लेखिलें आणि आपल्या या कल्पनांची ओरड त्यांच्या कानीं कपाळीं तुम्हीं इतकी केली कीं, आपण खरोखरच तसे आहों असें त्यांना वाटूं लागलें. केवळ स्वार्थाला बळी पडून या गोष्टी तुम्हीं केल्या. तूं क्षुद्र आहेस, तूं जंतु आहेस, असें कोणालाही वेळीं अवेळीं तुम्ही म्हणत राहिलां, तर ही कल्पना त्याच्या डोक्यांत हळूहळू बिंबत राहिल्याशिवाय राहणार नाहीं आणि कालांतरानें ती तेथें दृढ होते. यालाच मंत्रमोहिनी म्हणतात. ब्राह्मणेतर वर्ग या मोहनिद्रेंतून आतां जागा होऊं पहात आहे. ब्राह्मणांच्या विधिविधानांत आणि मंत्रांत कांहीं राम नाहीं असें त्यांना आतां वाटूं लागलें आहे. विलायती विद्येच्या प्रसारानें ब्राह्मणांच्या साऱ्या हातचलाख्या उघड्या होऊं लागल्या आहेत. या साऱ्या गोष्टी तुला दिसत असतीलच.

**शिष्यः**—होय महाराज. जुन्या कर्मठपणाचीं बंधनें आतांच्या काळीं ढिलीं होत चालल्याचें स्पष्ट दिसतें.

**स्वामीजीः**—आणि असें होणें हें रास्तच आहे. ब्राह्मण वर्ग आधीं होता तसा पुढें राहिला नाहीं. कालेंकरून त्याच्यांत अनीति वाढत गेली. स्वतःचें महत्त्व रक्षण करण्यासाठीं तो जुलूम करूं लागला. स्वार्थासाठीं अनेक वेदबाह्य अनीतीचीं आणि तर्कबाह्य अशीं मतेंही स्वधर्मांत घुसडण्यास त्यानें कमी केलें नाहीं. हेतु हाच कीं, आपलें महत्त्व कायम रहावें. स्वतः लावलेल्या विषवृक्षाचीं फळें तो आज खात आहे.

**शिष्यः**—महाराज, या फळांचें स्वरूप तरी काय आहे ?

**स्वामीजीः**—काय, तें तुला अजूनही दिसत नाहीं ? तुम्ही उच्च वर्गीयांनीं सामान्य जनतेला तुच्छ केल्यामुळेंच गेलीं हजार वर्षें तुम्हांस गुलामगिरींत दिवस कंठावे लागत आहेत. यामुळेंच परकीयांच्या दृष्टीनें तुम्ही कःपदार्थ झालां आहां. यामुळेंच तुमचे स्वतःचे देशबंधूही तुमची उपेक्षा करूं लागले आहेत.

**शिष्यः**—पण महाराज, अजूनसुद्धां साऱ्या धर्मक्रिया ब्राह्मणांच्याच हातानें होतात. या बाबींत ब्राह्मणांचेंच मत सामान्य लोकांना अद्यापि अधिकारयुक्त वाटतें. मग सामान्य जनता ब्राह्मणांची उपेक्षा करिते असें आपण कसें म्हणतां ?

**स्वामीजीः**—तूं सांगतोस तितकी माझी खात्री पटत नाहीं. दश संस्कारांचे सारे विधि आज कोण पाळीत आहे ? अरे, सारा हिंदुस्थान मी फिरलों, आणि सर्वत्र एकच गोष्ट मला आढळून आली, ती ही कीं, शास्त्रविधीपेक्षां स्थलाचारांकडेच लोकांचें लक्ष अधिक आहे. आपापल्या गांवांतल्या चालीरीती म्हणजेच शास्त्र असेंच लोकांना वाटतें. फार काय, पण श्रुति आणि स्मृति यांच्या दृष्टीनें नीतिबाह्य ठरणाऱ्या चालीसुद्धां शास्त्र म्हणून ग्राह्य ठरतात. लोकरीत, गांवांतली चाल हेंच काय तें शास्त्र. विशेषतः बायका म्हणतील तें शास्त्र असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. श्रुतिस्मृतींची जागा लोकरूढीनें बळकावली नाहीं काय ? श्रुतिप्रामाण्य आज कोण मानतो ? या बाबतींत कोण गुरु, आणि कोण चेला ? तुझ्या खिशांत पुरेसा पैसा असला कीं, तुझ्या हव्या त्या

कर्माला शास्त्राधार काढून देण्यास भटभिक्षुकें एका पायावर तयार असतात. तुला कोणाला वाळींत टाकावयाचें असलें, तर पिशवीचें तोंड थोडें अधिक सैल केलें कीं तुझी इच्छा पुरी झालीच. या भिक्षुकवर्गांपैकीं कल्प, गृह्यसूत्रें, श्रौतविधि इत्यादिकांचा अभ्यास कितीकांनीं केला आहे बरें? अमुक एक स्मृति प्रमाण असें तरी कोठें आहे? बंगालच्या एका भागांत मिताक्षरा प्रमाण तर दुसऱ्या भागांत रघुनंदन प्रमाण आणि तिसऱ्या कोठें हा अधिकार मनूकडे. एकच स्मृति सर्वत्र ग्राह्य आहे असा तुझा समज असला, तर ती मोठी चूक आहे. याकरितांच वेदवेदांगांचा अभ्यास आज सर्वत्र झाला पाहिजे. या ग्रंथांचें महत्त्व लोक विसरले आहेत. तें त्यांना पुनः पटविलें पाहिजे. पूर्वीप्रमाणेंच ते पुनः पूज्य वाटूं लागले पाहिजेत, त्यांजबद्दलचा आदर पुनः उत्पन्न केला पाहिजे. सर्वत्र श्रुतिप्रामाण्य रूढ झालें पाहिजे.

**शिष्यः**—महाराज, आतांच्या काळीं हें होणें शक्य आहे काय?

**स्वामीजीः**—श्रुतींनीं जुन्या काळीं सांगितलेले सर्वच विधि आतां ग्राह्य मानले जाणार नाहींत हें खरें; पण त्यांत कालाला अनुरूप इतकाच फेरबदल करून नवी स्मृति आपण निर्माण केली पाहिजे. समाजापुढें हा नव्या स्मृतीचा आदर्श आपण नित्य ठेवीत गेलों तर हळू हळू तो ग्राह्य कां मानला जाणार नाहीं?

**शिष्यः**—महाराज, निदान मनुस्मृति तरी सर्व हिंदुस्थानभर प्रमाण मानली जात असावी असा माझा समज होता.

**स्वामीजीः**—छे, छे; तसें मुळींच नाहीं. तुझ्याच प्रांताकडे पहा ना? तंत्रांतील वामाचार तुमच्या हाडींमासीं कसे खिळून बसले आहेत हें तुला ठाऊक आहेच. मृत बौद्धधर्माचा अवशेष अर्वाचीन वैष्णव पंथाच्या स्वरूपांत आढळतो. हा पंथ तर वामाचारांनीं थबथबलेला आढळतो. असल्या श्रुतिबाह्य आचारांची ही लाट आपण आतां परतविली पाहिजे.

**शिष्यः**—महाराज, अशा दृष्टीनें पाहिलें तर असल्या घाणीचे पर्वतच सांचल्यासारखे दिसतात. हे सव नामशेष करून टाकणें शक्य तरी आहे काय?

**स्वामीजीः**—तूं शुद्ध भेकड आहेस. किती मूर्खासारखें बोललास! हें अशक्य, तें अशक्य असें म्हणतां म्हणतां सारा देश तुम्ही विनाशाच्या पंथाला आणलात. अरे, मनुष्याच्यानें होणार नाहीं अशी कोणती गोष्ट आहे?

**शिष्यः**—पण महाराज, मनु, याज्ञवल्क्य अशांसारखे महापुरुष निर्माण झाल्याशिवाय ही गोष्ट होणें मला अशक्य दिसतें.

**स्वामीजीः**—अरे, पण मनु आणि याज्ञवल्क्य एवढ्या मोठ्या योग्यतेला कसे चढले? पवित्र आचार आणि निष्काम कर्म याच मार्गांनीं कीं दुसऱ्या कोणत्या मार्गांनीं? आपण उद्योग केला तर मनु आणि याज्ञवल्क्य यांहूनही आपण अधिक वंद्य होऊं. आपण तसे झालों तर आपलीं मतें लोक कां मानणार नाहींत?

**शिष्यः**—महाराज, श्रुति स्मृतींनीं प्राचीन काळीं घालून दिलेलीं समाजबंधनें पुनः चालू केलीं पाहिजेत असें आपण आतांच म्हणालां. मग त्याच मन्वादिकांना आपण आतां तुच्छ कां करितां?

**स्वामीजीः**—किती वेडगळ प्रश्न हा? माझा मुद्दाच तुला समजला नाहीं. कालांतरानें बदललेल्या समाजरचनेला अनुकूल असे फेरफार जुन्या बंधनांतच केले पाहिजेत, इतकेंच मी म्हटलें. माझ्या शब्दांतलें रहस्य ध्यानांत घे. जुनें टाकावें असें मी म्हटलें नाहीं. त्याचें स्वरूप बदलावें इतकेंच मीं म्हटलें, नव्हे काय?

**शिष्यः**—होय महाराज.

**स्वामीजीः**—मग असें खुळ्यासारखें काय बोललास? तूं शास्त्रें पढला आहेस. तुझ्याच सारखीं माणसे कांहीं तरी करतील अशी मला आशा आहे. माझा सारा भरंवसा तुझ्याच सारख्या माणसांवर आहे. याकरितां माझ्या शब्दांचें तात्पर्य लक्षांत घेऊन तुम्हीं कामाला लागलें पाहिजे.

**शिष्यः**—पण महाराज, आमचें ऐकणार कोण? आमचें म्हणणें लोकांनीं तरी कां ऐकावें?

**स्वामीजीः**—स्वतः बोलण्याप्रमाणें आचरण करून लोकांची खात्री तुम्हीं पटविली तर तुमचें म्हणणें लोकांनीं ऐकलेंच पाहिजे. उलटपक्षीं आचरणहीन राहून श्रुतिस्मृतींची नुसती पोपटपंची तुम्हीं केली तर तुमचें म्हणणें कोण ऐकणार आहे?

**शिष्यः**—सांप्रतच्या समाजसुधारणेसंबंधीं आपलें काय मत आहे? यासंबंधांत आपली काय सल्ला आहे?

**स्वामीजीः**—पुरून उरेसा उपदेश या बाबतींत मी करून चुकलों आहें. त्या भाराभर शब्दांपकीं एकाची तरी अंमलबजावणी करून दाखवा. शास्त्राभ्यास आणि गुरूपदेश हीं तुमच्या ठिकाणीं फलद्रूप झालीं आहेत असें जगाला आतां दिसूं द्या. मन्वादिकांचा अभ्यास तू केलास आणि उंटाच्या ओझ्याचीं पुस्तकें वाचलींस. पण त्या साऱ्यांचा मूळ हेतु आणि मथितार्थ काय आहे याचा विचार तूं कधीं केलास काय ? तो हेतु कायम राखून कालमानाप्रमाणें त्याला पुस्ती जोडणें इतकेंच तुझें कर्तव्य आहे. देशांतील सर्व मानववंशांना आणि सर्व पंथांना या नव्या स्मृतीचा सारखाच उपयोग व्हावा एवढी खबरदारी मात्र तुला घेतली पाहिजे. अशी एखादी स्मृति लिहून काढ बरें ! मग मीही तिच्यावर एक वेळ नजर फिरवीन.

**शिष्यः**—महाराज, ही कांहीं लहानसहान कामगिरी नव्हे आणि समजा कीं अशी स्मृति कोणीं लिहिली, तरी ती सर्वमान्य होईल काय ?

**स्वामीजीः**—कां होऊं नये ? आधीं लिहून तर पहा. '**कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ।**' ती योग्य रीतीनें तू लिहिली असलीस तर ती मान्य होण्याचा योग आज ना उद्यां येईलच. तुला इतका आत्मविश्वास कां नाहीं ? तुझेच पूर्वज ऋषि नव्हते काय ? आज मनु थोडा बदलला आहे इतकेंच. त्या मंत्रद्रष्ट्यांचेच तुम्ही वंशज आज थोड्या वेगळ्या रूपानें अवतरलां आहां. तुमच्या ठिकाणीं तेंच अनंत सामर्थ्य आहे, ही गोष्ट मला सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसते. निद्रावस्थेंत पडलेलें हें सामर्थ्य जागें करा. उठून उद्योगाला लागा. कीर्ति, पैसा इत्यादि क्षणभंगुर वस्तूंच्या मागें लागून तुम्ही काय मिळवणार ? फार काय, पण मी तर मुक्तीचीसुद्धां इच्छा करीत नाहीं. या साऱ्या कल्पना तुमच्या अंतःकरणांत भरवून द्याव्या हाच माझा जन्महेतु आहे. तुझ्यासारख्या एखाद्या मनुष्यालाही खरी जागृति आणण्यास मला एक लाख जन्म घ्यावे लागले तर ते मी आनंदानें घेईन.

**शिष्यः**—पण महाराज, कार्यभाग पर्वतप्राय आणि आमचें आयुष्य तें किती ? मृत्यु आमच्या पाठीलाच उभा नाहीं काय ?

**स्वामीजीः**—धिक्कार, धिक्कार असो तुला ! अरे, खरा मृत्यु एकवारच येतो. पण तुझ्यासारखीं भेकड माणसें 'मेलों मेलों' म्हणून मृतासारखें आयुष्य दरक्षणींच कंठीत असतात. मृत्यु येण्यापूर्वीच तुम्ही असे कां मरतां ?

**शिष्यः**—ठीक महाराज. पण मृत्यूचें चिंतन सोडून या कामाला मी लागलों तरी जगाची तरी शाश्वती कोठें आहे? मग माझ्या त्या कामगिरीचा काय उपयोग?

**स्वामीजीः**—माझ्या मुला, मृत्यु अपरिहार्य आहे, त्या अर्थी दगडा-धोंड्यासारखें जड होऊन बसण्यापेक्षां शूराचें मरण कां पत्करूं नये? तूं जग क्षणभंगुर म्हणतोस. मग त्या क्षणभंगुर जगांत एखाददुसरा दिवस अधिक काढण्यांत तरी काय मतलब आहे? गंजून नाहींसें होण्यापेक्षां झिजून नाहींसें झालेलें बरें. विशेषतः ही झीज परसेवेंत आली तर त्याहून अधिक श्लाघ्य-वाणें काय आहे?

**शिष्यः**—होय महाराज. आपलें म्हणणें खरें आहे. आपणांस इतका त्रास दिल्याबद्दल मी आपली क्षमा मागतों.

**स्वामीजीः**—खऱ्या जिज्ञासु माणसाशीं सबंध दोन रात्री मी बोलत राहिलों तरी मला त्रास वाटणार नाहीं. जेवणखाण आणि झोंप टाकूनसुद्धां त्याच्याशीं मी एकसारखा बोलत राहीन. मला अगदीं स्वस्थ बसण्याची इच्छा झालीच तर हिमालयाच्या एखाद्या दरींत जाऊन तेथें मी समाधिमग्न राहीन. मातेची कृपा आजकाल मजवर अशी आहे कीं, पोटाची विवंचना मला मुळींच करावी लागत नाहीं. कोठून तरी अन्न चालून येतें. मग हिमालयांत जाऊन बसावयास मला काय हरकत आहे? पण तसें न करितां मी येथें दिवस काढतों. आपल्या देशाची सध्यांची विपन्नावस्था आणि त्याच्या पुढील स्थितीची काळजी हीं मला स्वस्थ बसूं देत नाहींत. ध्यान आणि समाधि ह्या गोष्टीसुद्धां मला निरर्थक वाटतात. ब्रह्मसुखसुद्धां मला बेचव वाटूं लागतें. हा जन्म तुमच्या कल्याणांत खर्च करीन अशी शपथ मीं वाहिली आहे. ज्या दिवशीं या शपथेचा हेतु सफल होईल त्या दिवशीं हा देह सोडून मी सरळ उड्डाण करीन.

स्वामीजींचे हे शब्द ऐकून शिष्य स्तब्ध राहिला. त्यांच्या मुखाकडे पाहात असतां आश्चर्यानें तो थक्क होऊन गेला. मग स्वामीजींची रजा घ्यावी या हेतूनें त्यांचें पादवंदन करून त्यानें त्यांची परवानगी मागितली.

स्वामीजी म्हणाले, 'येथून जाण्याची तुला इतकी घाई कां? आतां मठां-तच कां राहीनास? संसारी लोकांच्या संगतींत तूं पुनः जाऊन पडलास तर

तुझें मन पुनः बिघडून जाईल. हा पवित्र गंगातटाक, हे ध्यानस्थ साधु, हें प्रसन्न वातावरण आणि या उच्च कथांचें श्रवण अशा वस्तू सोडून, पुनः संसारांत जाऊन पडावेंसें तुला वाटतें ? कलकत्त्यांत तुझा पाय पडण्याचा अवकाश कीं तुझें मन संसाराची घाण पुनः उपसूं लागेल.'

शिष्य आनंदानें म्हणाला, 'ठीक आहे महाराज, आजचा दिवस मी मठांत राहीन.'

**स्वामीजीः**—काय, आजचाच दिवस ? तूं येथें कायमचाच कां राहीनास ? संसारांत परत जाऊन पडण्यांत तुझा कोणता स्वार्थ साधणार ?

स्वामीजींचें हें भाषण एकून शिष्यानें आपली मान खालीं घातली. अनेक प्रकारच्या विचारांनी त्याच्या चित्तांत इतके काहूर करून सोडले कीं आतां काय बोलावें हें त्याला सुचेना.

***

[ २४ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, १८९९ ]

आज शिष्यासमवेत स्वामीजींची स्वारी मठाच्या आजूबाजूच्या मोकळ्या प्रदेशांत दुपारीं हिंडत होती. फिरतां फिरतां एका बिल्ववृक्षाजवळ आम्ही येऊन पोंचलों. एक बंगाली गाणें स्वामीजी गुणगुणूं लागले. दुर्गापूजेच्या दिवशीं हें गाणें म्हणण्याचा प्रघात बंगाल्यांत आहे. 'पुष्कळ दंडी आणि योगी तुझ्या दर्शनासाठीं येतील. जटाधारी तुला नमन करतील.' ही ओळ म्हणून स्वामीजी शिष्याला म्हणाले, 'समजलास, आपल्या मठांतही पुष्कळ साधु आणि संन्यासी पुढें असेच येणार आहेत.' बोलतां बोलतां स्वामीजी बेलाच्या झाडाखालीं जाऊन बसले आणि म्हणाले, 'बिल्ववृक्षाचा तळ ही पवित्र भूमि आहे. येथें ध्यानाचा अभ्यास केल्यास फलप्राप्ति त्वरित होऊन बुद्धीला जागृति येते. असें श्रीरामकृष्ण म्हणत.'

**शिष्यः**—महाराज, नित्यानित्यविवेकाची खरी गोडी ज्याला लागली त्याला कालस्थलादिकांच्या शुद्धपणाचा कांहीं विचार करणें आवश्यक आहे काय ?

**स्वामीजीः**—जो या विचारांत निमग्न होऊन अंतर्मुख झाला त्याला कालस्थलादिकांचा कांहींच बाध नाहीं. पण ही स्थिति चुटकीसरशीं प्राप्त होत

नाहीं. दीर्घ कालाच्या अभ्यासानेंच ती मिळणारी आहे. यासाठींच आरंभीं तरी बाह्य वस्तूंची मदत आवश्यक आहे. स्वतःच्या पायांवर उभें राहतां येईपर्यंत पांगुळगाडा नको काय ? पुढें चित्त ध्यानारूढ झालें आणि बाह्य मुखता त्यानें सोडली म्हणजे कोणत्याही बाह्यवस्तूच्या मदतीची अपेक्षा त्याला उरत नाहीं.

अभ्यासाचे अनेक मार्ग श्रुतींत सांगितले आहेत. तथापि या अनेक मार्गांच्या पर्यवसानाचें ठिकाण एकच आहे. तें ठिकाण म्हणजे आत्मज्ञान. साधकाच्या अधिकाराप्रमाणें त्याच्या अभ्यासाचे मार्गही अधिक उण्या प्रतीचे असलेच पाहिजेत. वस्तुतः हे सारे कर्ममार्गच होत. यांपैकीं प्रत्येकांत कोणतें ना कोणतें कर्म करावेंच लागतें; आणि कर्माची आवश्यकता आहे तोंपर्यंत आत्मदर्शन होणें नाहीं. आत्मदर्शनाच्या मार्गातील अडथळे दूर होणें हेंच श्रुतिप्रणीत अभ्यासाचें फळ आहे. आत्मदर्शन घडविण्याचें सामर्थ्य केवळ कोणत्याही कर्ममार्गाला नाहीं. नुसतें कर्म करीत राहिल्यानें ही गोष्ट त्रिकाळांत घडावयाची नाहीं. आत्मज्ञानावर ओढलेला पडदा अंशतः दूर करावयाचा इतकाच काय तो कर्ममार्गाचा उपयोग. आत्मा स्वयंप्रकाश आहे. त्याला दाखविण्यास बाहेरच्या दिवटीची गरज नाहीं. यासाठींच ब्रह्मज्ञानाला ‘कर्माचा संपर्क सोसत नाहीं’ असें श्रीशंकराचार्यांनीं म्हटलें आहे.

**शिष्यः**—पण महाराज, कर्म केल्याशिवाय ज्या अर्थी आत्मज्ञानाच्या मार्गातील अडथळे दूर होणें शक्य नाहीं, त्या अर्थी परोक्षपणें तरी कर्म हेंच ज्ञानाचें साधन आहे असें ठरत नाहीं काय ?

**स्वामीजीः**—सृष्टींत कार्यकारण भाव आहे, असें ज्याला वाटतें त्याला तुझी विचारसरणी मान्य होईल. पण ही गोष्ट केवळ वरवर पाहणाराची झाली. हीच विचारसरणी पूर्वमीमांसकांनीं मान्य केली आहे. यामुळेंच अमुक प्रकारच्या कर्मानें अमुक कार्यसिद्धि होईल असा निश्चय ते करतात. पण तीं कर्में आणि त्यांचें कार्य हीं दोन्ही त्रिगुणांच्या हद्दींतलींच आहेत. आत्मा त्यांच्या पलीकडचा आणि स्वयंभू आहे. यामुळें कोणत्याही कर्माच्या आटोक्यांत तो येऊं शकत नाहीं. यासाठीं आत्मलाभाच्या इच्छेनें जो कर्म करीत असेल त्यानें फळाची इच्छा धरूं नये, असा निर्बंध श्रुतींनीं घातला आहे. फलेच्छा नसतांना कर्म केलें म्हणजे त्याचा परिणाम चित्तशुद्धि हाच होणार. केवळ कर्मांनींच आत्मलाभ होत असता तर ‘फलेच्छा धरूं नको’ अशी-

आज्ञा श्रुतींनीं कधींच केली नसती. यासाठींच पूर्वमीमांसकांच्या कर्ममार्गाचा उच्छेद करण्यास्तव गीतेनें निष्काम कर्मयोगाचा उपदेश केला. तुझ्या ध्यानांत आलें ना ?

**शिष्यः**—पण महाराज, कर्म करणें ही गोष्ट आधींच त्रासदायक आणि इतक्या त्रासाचें फळही आपण घ्यावयाचें नाहीं असें आपण म्हणतां, मग कर्म करण्याची बुद्धि आम्हांला कां व्हावी ?

**स्वामीजीः**—'**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्य कर्मकृत ।**' कसलें ना कसलें कर्म करणें आम्हांला भागच आहे. आमचें जीवित त्याशिवाय चालवयाचें नाहीं. कर्म करणें ज्या अर्थी भाग आहे, त्या अर्थी तें कसें करावें हें समजणें उपयोगाचें आहे. कर्म करतां करतां आत्मज्ञान कसें मिळवावें आणि आत्मज्ञानाच्या द्वारें मुक्ति कशी संपादावी हेंच कर्मयोगानें सांगितलें आहे. फळाच्या आशेवांचून कर्म करण्याची इच्छा कोणास व्हावयाची नाहीं असें तू म्हणतोस; पण कोणतेंही कर्म झालें तरी त्याच्या मागे हेतू असतोच. हेतूवांचून कर्मप्रवृत्ति नाहीं. पण कर्मप्रवाहांत एक वेळ वहावत चालल्यावर मूळ हेतूचा विसर पडतो. मग एक कर्म दुसऱ्याला प्रसवतें. अशा रीतीनें कर्मपरंपरेची लांबण लागते; आणि हा जीव तींत गुरफटून जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतो. केव्हां तरी त्याची विवेकबुद्धि जागृत होते. मग या कर्मपरंपरेचा अंत कोठें, हा प्रश्न त्याच्या चित्तांत उद्भवतो. या प्रश्नानें चित्तांत काहूर उत्पन्न केलें म्हणजे भगवान् श्रीकृष्णाच्या उपदेशाचें रहस्य समजण्यास तो पात्र होतो. '**गहना कर्मणो गतिः**' ही गोष्ट अक्षरशः खरी आहे. सुखाच्या आशेनें मनुष्य कर्माला प्रवृत्त होतो. पण कितीही कर्म केलें तरी तें सुख उत्पन्न करीत नाहीं, असें त्याला दिसून आलें म्हणजे कर्मत्यागाकडे त्याची प्रवृत्ति होते. पण मनुष्याची प्रकृतीच अशी आहे कीं, कसलें तरी कर्म करणें त्याला भाग असतें. अशा स्थितींत त्यानें कोणतें कर्म करावें आणि तें कसें करावें हें समजणें युक्त नाहीं काय ? अशा वेळीं कोणतें तरी परहिताचें कर्म त्यानें हातीं घ्यावें आणि फळाची आशा सोडून तें शेवटास नेण्याचा यत्न करावा हाच योग्य मार्ग आहे. कर्माच्या फळांत पुढील जन्मजन्मांतरांचीं अनंत बीजें सांठवलेलीं असतात. हें सत्य ज्यानें जाणलें तो कर्मफळाची अपेक्षा कधींच करणार नाहीं. *असा सत्यनिष्ठ पुरुष बाह्यतः कर्म करतांना दिसत असला तरी वस्तुतः कसलेंच कर्म

तो करीत नसतो. कारण कोणत्याहि कर्मांच्या फळाची आसक्ति त्याला नसते. अशा पुरुषांना कर्मयोगी ही संज्ञा लागते.

**शिष्यः**—महाराज, तर मग ब्रह्मनिष्ठ पुरुषाचें कर्म आणि वेड्याच्या कृती ह्या सारख्याच म्हणावयाच्या ?

**स्वामीजीः**—असें कसें होईल ? कर्मफलत्याग म्हणजे स्वार्थसिद्धीसाठीं कोणतेंही कर्म न करणें. स्वतःच्या देहाच्या अथवा मनाच्याही स्वास्थ्याची अपेक्षा न करितां कर्म करणें. ब्रम्हनिष्ठ पुरुष स्वतःच्या सुखाची अपेक्षा करीत नाहीं. तथापि परहितासाठीं त्यानें कर्म करण्यास कोणती अडचण आहे ? फलत्याग करून त्यानें केलेलें प्रत्येक कर्म जगाचें हित साधतें. जनतेच्या कल्याणासाठीं तो कर्म करितो. अशा पुरुषांच्या हातून असत्क्रिया कधींच घडत नाहीं असें श्रीरामकृष्ण म्हणत. ' **ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ।** ' हें उत्तररामचरित्रांतील वचन तुला आठवत असेलच. त्याचा अर्थ हाच. बाह्य वस्तूंवरून परावृत्त झालेलें मन आत्म्याच्या ठिकाणीं लीन झालें म्हणजे कसलीही अपेक्षा तें करीत नाहीं. ऐहिक अथवा पारलौकिक सुखाची अपेक्षा त्याला उरत नाहीं. कारण सुख भोगावें इतकी ऊर्मिसुद्धां त्याच्या ठिकाणीं नसते. यामुळें कर्म आणि प्रतिकर्म यांचें द्वंद्वही त्याच्या चित्तांत नसतें. पण ही स्थिति सोडून त्याचें मन लौकिकांत परत आलें म्हणजे पूर्वकर्मांची शिल्लक राहिलेली शक्ति त्याला कर्माकडे ढकलते. जुन्या संवई अथवा पूर्व संस्कार हीं मरून गेलेलीं नसतात. तीं आपापलीं कामें पुन्हा करूं लागतात. तथापि त्याचें ब्रह्मनिष्ठ मन त्या कर्मप्रवाहांत सांपडत नाहीं. पूर्वसंस्कारांच्या बळावर त्याचा देह जरूरीचीं कामें करीत असतो. त्याची देहाच्या अस्तित्वाची भावनाही अत्यंत संकुचित झालेली असते. अशा स्थितींत घडलेलें प्रत्येक कर्म युक्तच असतें. अशा स्थितींत घडलेल्या कर्मांनीं जगाचें खरें हित साधत असतें. कारण अस कर्म स्वार्थाच्या संपर्कानें दूषित झालेलें नसतें. अशा प्रकारच्या विचारातीत स्थितींत राहून परमेश्वरानें हें आश्चर्यमय विश्व उत्पन्न केलें आहे. यामुळेंच त्यांत कोठेंही अपूर्णावस्था नाहीं. याकरितांच कर्मफळाच्या आशेवांचून आत्मनिष्ठ पुरुषानें केलेलें प्रत्येक कर्म जगाला कल्याणप्रद होत असतें असें मीं म्हटलें.

**शिष्यः**—पण महाराज, कर्म आणि ज्ञान हीं परस्परविरोधी आहेत असें आपण आतांच म्हटलें. आत्मज्ञानाच्या ठिकाणीं कर्माचा संपर्कही संभवत नाहीं. एकंदरींत कर्मापासून ब्रह्मानुभव मिळत नाहीं असें आपलें म्हणणें होतें. मग आतां रजोगुणोत्पादक भाषण आपण कसें करितां ? एकसारखें कर्म करीत राहावें असा उपदेश आपण मला कसा करितां ?

**स्वामीजीः**—मी साऱ्या जगभर फिरलों. त्यांत मला एवढाच अनुभव आला कीं, इतर देशांच्या तुलनेनें आमचा देश तमोगुणांत बुडालेला आहे. बाह्यतः सत्त्वगुणाचें सोंग त्यानें केलें आहे. पण वस्तुस्थिति अगदीं वेगळी आहे. या पांघरुणाच्या आंत शुद्ध जडता भरली आहे. लांकडाचे ओंडके आणि दगड हे पदार्थ सत्त्वगुणी नव्हत. अशा क्रियाशून्य लोकांच्या हातून जगांत कोणता कार्यभाग घडणार ? इतके आळशी आणि नुसत्या इंद्रियतृप्तीमागें लागलेले लोक जगांत किती दिवस निभाव काढणार ? तूं आधीं इतर जग पाहून ये, आणि मग माझ्याशीं असला वाद कर. पाश्चात्य लोकांत आज केवढी कार्यप्रवणता, केवढा उत्साह आणि केवढी निधडी छाती आहे याची कल्पना तरी तुला आहे काय ? त्यांच्या ठिकाणीं रजोगुण मूर्तिमंत अवतरलेला दिसतो. तेंच तुझ्या देशाकडे पहा. त्याच्या हृदयांतलें सारें रक्त गोठून गेलें आहे. एके जागीं घट्ट झालेलें हें रक्त सर्व देहभर प्रसरण कसे पावणार ? त्याचा देह पक्षाघातानें झपाटलेला आहे. यामुळें तो अगदीं मलूल होऊन पडला आहे. तमोगुणाचा हा भयंकर रोग हटविण्यास रजोगुणासारखी मात्रा नाहीं. यासाठीं लोकांत कांहीं रजोगुण उत्पन्न करावा अशी खटपट मी करितो. त्याच्यांत कर्मप्रवणता आली तरच चालू जीवनकलहांत टिकाव धरण्याची पात्रता त्याच्या आंगीं येईल. शरीरांत ताकद नाहीं, अंतःकरणांत उत्साह नाहीं आणि मेंदूंत कल्पकता नाहीं. असल्या मृत्पिंडांच्या हातून काय होणार ? त्यांना डिंवचून त्यांच्यांत कांहीं उत्साहजागृति होते कीं काय हें मला पहावयाचें आहे. याच कार्याला मीं आपलें जीवित वाहिलें आहे. श्रुतिमंत्रांच्या अमोघ शक्तीनें त्यांना मी पुन्हां जागृति आणीन. ‘ **उत्तिष्ठत जाग्रत** ’ हा श्रुतींचा निर्भय उपदेश उच्च घोषानें मी ओरडून सांगेन. माझ्या या जन्महेतूच्या पूर्तीसाठीं तुम्हीं मला साहाय्य केलें पाहिजे. खेडोपाडीं हिंडून लोकांना तुम्ही जागे करा. साऱ्या देशभर फिरून निर्भयपणाचा उपदेश ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत सर्वांना

करा. सर्वांच्या ठिकाणीं सर्वशक्तिमत्त्व आहे असें त्यांना सांगा. ते पूर्णानंद-रूपाचे अंशभागी आहेत ही गोष्ट त्यांना पटवून द्या. त्यांना कर्मप्रवणतेचा उपदेश करून त्यांच्या ठिकाणीं रजोगुण जागृत करा. असें झालें तरच आमचा देश सांप्रतच्या मन्वंतरांत टिकाव धरील. आधीं जगा, मग मुक्तीची गोष्ट साव-काश बोलतां येईल. स्वावलंबनाचा उपदेश तुम्ही लोकांना करा. चांगलें भरपूर अन्न, कपडेलत्ते, आणि चैनीच्या वस्तूसुद्धां त्यांनीं स्वबलानें मिळविल्या पाहि-जेत. जीव खाऊन पिऊन सुखी झाल्यानंतर मुक्तीचा उपदेश त्याला रुचतो. आळस आणि दंभ यांनीं आपला सारा देश आपल्या जाळ्यांत बांधून टाकला आहे. इतकी दुर्दशा प्रत्यक्ष पाहिल्यानंतर कोणता सुबुद्ध मनुष्य हात जोडून स्वस्थ बसेल ? इतकें दैन्य पाहूनसुद्धां तुझ्या डोळ्यांना आंसवें फुटत नाहींत काय ? मद्रास, मुंबई, पंजाब, बंगाल कोठेंही पहा, जिवंतपणाचें चिन्हसुद्धां आढळावयाचें नाहीं. तुम्ही स्वतःला मोठे सुशिक्षित म्हणवितां, पण तुम्ही मूर्ख-पणा किती शिकलांत हें तुम्हांला ठाऊक आहे ? परक्या भाषेंतले परक्या लोकांचे परके विचार तोंडपाठ करावे आणि असल्या विचारांनीं मेंदू तुडुंब भरून घेऊन परीक्षा पास व्हावें. एखाद्या विश्वविद्यालयानें एकदोन अक्षरें तुम्हांला बहाल केलीं, कीं बनलां तुम्ही सुशिक्षित ! धिक्कार असो तुम्हांला ! अरे, याला काय शिक्षण म्हणतात ? तुमच्या एवढया मोठ्या शिक्षणाचें अखे-रचें फळ तरी काय ? खर्डेघांशी किंवा त्याहून अधिक लफंगेगिरीची वकीली किंवा याहूनही मोठी उडी पडली तर डेप्युटी म्याजिस्ट्रेट या नांवाची दुसऱ्या प्रकारची खर्डेघांशी. तुमच्या साऱ्या विद्येचें फळ इतकेंच कीं नाहीं ? असल्या शिक्षणानें तुमचें अथवा तुमच्या देशाचें कोणतें कल्याण होणार आहे ? जरा डोळे उघडून पहा म्हणजे भरताच्या विख्यात सुवर्णभूमींतले लोक अन्नासाठीं टाहो फोडीत आहेत असें तुम्हांस दिसेल. त्यांचे करुणालाप कानांनीं ऐकवत-सुद्धां नाहींत. या बुभुक्षितांसाठीं गोळाभर अन्न निर्माण करण्याचें सामर्थ्य तुमच्या शिक्षणांत आहे काय ? छेः, हा प्रश्नच विचारावयास नको. आतां भौतिक शास्त्रांचा अधिक अभ्यास करून पृथ्वींतून अन्न बाहेर काढण्यास तुम्हीं शिकलें पाहिजे. तुम्हीं स्वतः हातीं नांगर धरिला पाहिजे. दुसऱ्यांची गुलाम-गिरी करून पोट भरणें आतां पुरे झालें. धनोत्पादनाचे नवे नवे मार्ग तुम्हीं शोधले पाहिजेत. अर्वाचीन शास्त्रांच्या मदतीनें या कामाला तुम्हीं स्वतःच हात

घातला पाहिजे. यासाठींच कर्मप्रवण व्हा, असा उपदेश मी करितों. स्वतःपुरती अन्नवस्त्राची तरतूद तरी तुम्हीं स्वतःच केली पाहिजे. आज अन्नवस्त्राचाही अभाव झाला आहे. उद्यांचें कसें, या काळजीखालीं देश चूर झाला आहे. यामुळेंच आज सारा देश विनाशाच्या मार्गाला लागला आहे. ही आपत्ति टाळण्यासाठीं तुम्ही काय करीत आहां ? तुमच्या त्या साऱ्या श्रुतिस्मृति आधीं गंगेंत नेऊन बुडवा. लोकांना पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र मिळेल अशी तजवीज प्रथम झाली पाहिजे. ही तजवीज झाल्यानंतर श्रुतिस्मृतींचीं पुराणें वाचण्यास तुम्हांला भरपूर वेळ शिल्लक राहील. देहच जेथें सुस्थितींत नाहीं, तेथें तुमचा ज्ञानोपदेश कोण ऐकणार ? यासाठीं सर्वांच्या ठिकाणीं आत्मश्रद्धा आधीं जागृत करा. हवें तें करण्याची शक्ति आपल्या ठिकाणीं आहे, ही जाणीव लोकांत आली म्हणजे स्वतःचें अन्नवस्त्र स्वतःच मिळविण्याची खटपट ते करतील. पोट भरल्याशिवाय तुमचा उपदेश कोणीही ऐकणार नाहीं. आतां आळसांत लोळण्याची वेळ उरली नाही. मृत्यूचा घाला केव्हां पडेल हें कोणीं सांगावें ?

हे शब्द उच्चारीत असतां स्वामीजींच्या चेहऱ्यावर अनेक विकारांच्या छायांचें संमेलन झालें होतें. दुःख, करुणा, आत्मप्रत्यय, असे अनेक विकार बाहेर येण्यासाठीं जणूं काय धडपडत होते. त्यांची ती भव्य मुद्रा पाहून शिष्य स्तब्ध राहिला. कांही शब्द उच्चारण्याची छातीच त्याला झाली नाहीं. थोड्या वेळानें स्वामीजी म्हणाले, 'कर्मप्रवणता आणि आत्मश्रद्धा यांचा उदय या देशांत यथाकालीं होणार आहे हें मला ठाऊक आहे. ही गोष्ट घडल्या-वांचून गत्यंतरच नाहीं. बुद्धिमान् पुरुषाला पुढें येणाऱ्या तीन युगांचें भविष्य आधींच स्पष्ट दिसत असतें. श्रीरामकृष्ण क्षितिजावर आले तेव्हांच पूर्वाचला-वर अरुणाची आरक्त प्रभा फांकली. आतां योग्य काळीं सूर्योदय निश्चयानें होईल, तो माथ्यावर येईल आणि त्याच्या प्रखर प्रभेनें सारा देश दीप्ति-मान् होईल.'

*
* *

[ २५ ]

[ स्थळः—बेलूर मठ, १८९९ ]

हल्लींचा मठ ज्या इमारतींत आहे, ती इमारत या वेळीं बहुतेक पुरी होत आली होती. स्वामीजींची प्रकृति या वेळीं चांगलीशी नसल्यामुळें गंगेत सकाळ संध्याकाळ नौकाविहार करावा, असा सल्ला डॉक्टरांनीं दिला होता.

आज रविवारचा दिवस. स्वामीजींच्या खोलींत त्यांजबरोबर संवाद करीत शिष्य बसला होता. मठस्थ संन्याशी आणि ब्रह्मचारी यांजकरितां कांहीं नियमावली स्वामीजी याच वेळीं तयार करीत होते ! मठस्थ रहिवाशांनीं संसारी लोकांत उठल्या सुटल्या मिसळूं नये येवढाच या नियमांचा उद्देश होता. आमच्या भाषणाचा ओघही याच विषयाकडे वळला.

**स्वामीजीः**—वस्त्रप्रावरण आणि सामान्य वागणूक या बाबतींत संसारी लोक हल्लीं बरेच ढिले झाले आहेत. त्यांना आत्मसंयमन नाहीं, अशी शंका मला येऊं लागली आहे. यासाठींच मठांत येणाऱ्या संसाऱ्यांनी साधूंच्या बैठकीवर बसूं नये अथवा लोळूं नये असा नियम मला करावा लागला. संसाऱ्यांच्या कपड्यांनासुद्धां कांहीं वेगळाच वास येतो. हा वास ओळखतां येण्याइतका स्पष्ट असतो असें पूर्वीं मीं ग्रंथांतरीं वाचलें होतें. पण आतां या गोष्टीचा प्रत्यय मला प्रत्यक्षच आला. संसाऱ्यांचा वास संन्याशांना कां खपत नाहीं हें मला आतां अनुभवानें समजलें. मीं घालून दिलेले नियम ब्रह्मचाऱ्यांनीं अक्षरशः पाळले तर यथाकालीं संन्यासाश्रम स्वीकारण्यास ते खरोखर योग्य होतील. संन्यासधर्माचें ध्येय चित्तांत एक वेळ पक्के मुरलें, कीं मग संसारी लोकांत मिसळण्यास हरकत नाहीं. पण योग्य मर्यादा आज त्यांनीं न पाळली तर ते भलत्याच मार्गाला लागतील असा संभव आहे. ब्रह्मचर्याची एकनिष्ठ वृत्ति बाणण्यासाठीं कडक नियम पाळणें अवश्य आहे. स्त्रियांच्या दूरच्या संसर्गापासूनही ब्रह्मचाऱ्यांनीं अलिप्त राहावें, इतकेंच नव्हे तर विवाहित पुरुषांचीही संगति त्यांनीं धरूं नये.

शिष्य स्वतःच संसारी असल्यामुळें स्वामीजींच्या या शब्दांचें भय त्याला वाटलें. मठस्थांच्या संगतींत आतां हवें तसें वावरतां येणार नाहीं या भीतीनें त्याच्या मनाला मोठा विषाद वाटला. तो म्हणाला, ‘ महाराज, हा मठ आणि

त्यांतील रहिवाशी यांजबद्दल मला जितका आपलेपणा वाटतो तितका स्वतःच्या कुटुंबाबद्दलही वाटत नाहीं. येथील मंडळीची ओळख जणूं काय जन्मापासूनच झाली आहे असें मला वाटतें. या मठांत जितकी निरंकुश स्वतंत्रता मला वाटते तितकी जगांत दुसऱ्या कोठेंही ती आढळत नाहीं.

**स्वामीजीः**—ज्यांचीं मनें शुद्ध आहेत त्यांना तुझ्यासारखाच अनुभव येईल. ज्यांना येथें स्वातंत्र्य अनुभवास येणार नाहीं, ते मठांत रहाण्यास योग्य नाहींत आणि मठाचें कार्य त्यांना पसंत नाहीं असेंच आपण घेऊन चाललें पाहिजे. पुष्कळ लोक येथें उगीच मौजेखातर येतात. पण त्यांतलें नाविन्य नाहींसें झाल्याबरोबर ते पळून जातात. आत्मसंयमनाचा गंधही ज्यांना नाहीं आणि जे अहोरात्र कनककामिनीच्या मागें लागलेले त्यांना या मठाचें कार्य कालत्रयींही पटावयाचें नाहीं. या कार्याचें रहस्यच त्यांना समजावयाचें नाहीं. तेव्हां मठस्थांबद्दल त्यांना आपलेपणा कसा वाटणार ? या मठांतले संन्याशी जुन्या बैराग्यांप्रमाणें नव्हत. अंगाला राख फांसावी, केसांच्या जटा वळाव्या आणि हातांत चिमटा चिलीम घेऊन गांवभर हिंडावें, असला धंदा ते करणार नाहींत. कांहीं झाडपाल्यांचीं औषधेंसुद्धां ते लोकांस देणार नाहींत. लोकांना तर असलेच बैरागी पाहाण्याची नेहमींची संवय. तेव्हां यांच्याशीं कांहींच साम्य नसलेले आमचे बैरागी त्यांना कसे पटणार ? आमच्या सद्गुरूंचा साराच मार्ग वेगळा; त्यांचीं ध्येयें वेगळीं, मनःप्रवृत्ति वेगळी आणि आत्मविकासाचे मार्गही वेगळे. यांपैकीं एकही जुन्या चालीचें नव्हतें. ब्रह्मदेवानें त्यांची मूसच नवी घडविली होती; आणि त्यांचेच आम्ही. मग आम्ही तरी जुन्या वळणावर कसे जाणार ? आमचा ठसासुद्धां नवा. आम्ही कधीं थाटामाटाचा सभ्य गृहस्थासारखा पोषाख करूं तर कधीं दिगंबर बनून ' हर हर ओम् ' या ध्वनीनेंच आकाश भरून टाकूं; कधीं व्यासपीठावर उभें राहून व्याख्यानें देत फिरूं, तर कधीं गिरिगव्हरांत अथवा निबिड अरण्यांत ध्यानस्थ होऊन राहूं. आज रेशमी कपडे, तर उद्यां नुसती राख.

जुन्या श्रुति ग्रंथांतलीं वचनें नुसतीं तोंडपाठ म्हणून आतां कांहीं कार्यभाग साधावयाचा नाहीं. पाश्चात्य सुधारणेची प्रचंड लाट उसळून ती आतां आसेतुहिमाचल पसरूं पहात आहे. अशा वेळीं गिरिशिखरावर ध्यानस्थ राहून कांहीं उपयोग नाहीं. ध्यानाचा अंतिम हेतु विसरून आतां चालावयाचें नाहीं.

आतां गीताप्रणीत निष्काम कर्मयोगाचा आचार आणि उपदेश हाच मार्ग आवश्यक आहे. अकुंठ धैर्य आणि अलोट सामर्थ्य यांचीच कांस आतां धरली पाहिजे. कोणत्याही कारणानें अंतःकरणाला लवमात्र कप सुटूं नये इतकें तें दृढ बनलें पाहिजे. आपण असे झालों तरच आपल्या सामान्य बांधवांत आपण जागृति आणूं शकूं; नाहीं तर 'अंधेनैव नीयमाना यथांधाः' अशी गोष्ट होईल.

दिवस अगदीं बुडावयास आला. स्वामीजी कपडे करून खालीं आले. डॉक्टरांच्या सांगीप्रमाणें नौकाविहारासाठीं ते गंगेकडे जावयास निघाले. स्वामीजीसुद्धां आम्ही चौघेजण नौकेंत होतों. हळूहळू दक्षिणेश्वराचें देवालय मागें टाकून बाबू गोविंद कुमार चौधरी यांच्या बगीचाबाहेरच्या घाटाजवळ आमची नौका उभी राहिली. मठासाठीं हेंच घर भाड्यानें घेण्याचा पूर्वी एकदां विचार निघाला होता. आम्ही बोटींतून खालीं उतरलों आणि बगीचांत इकडे तिकडे हिंडूं लागलों. फिरतां फिरतां स्वामीजी म्हणाले, 'बगीचा फार चांगला आहे, पण कलकत्त्यापासून फारच लांब. इतक्या लांब अंतरावर चालत यावें लागणें म्हणजे श्रीरामकृष्णभक्तांना केवढा त्रास! आपण येथें मठ केला नाहीं हें खरोखर चांगलें झालें.' हळूहळू अंधार पडूं लागला, तेव्हां बोटींत बसून आम्ही मठाकडे परतलों.

***

## [ २६ ]

**[ स्थळः—बेलूर मठ, १८९९ ]**

नागमहाशयांसमवेत शिष्य आज मठांत आला होता. नागमहाशयांस पाहातांच त्यांना वंदन करून स्वामीजी म्हणाले, 'प्रकृति ठीक आहे ना?'

**नागम०:**—तुमच्याच दर्शनासाठीं आज आलों आहें. 'नमः शिवाय, नमः शिवाय!' शिवदर्शनानें मी आज पावन झालों.

इतकें बोलून हात जोडून ते स्वामीजींपुढें उभे राहिले.

**स्वामीजीः**—प्रकृति ठीक आहे ना?

**नागम०:**—या तुच्छ देहाची एवढी चौकशी कशाला? बोलूनचालून हा हाडामांसाचा पिंजरा. आपल्या दर्शनानें मी खरोखरच पावन झालों.

नागमहाशयांनीं साष्टांग नमस्कार घातला. त्यांना वर उठवून स्वामीजी म्हणाले, 'आपण मला साष्टांग नमन करावें हें काय ?'

**नागम०**—शिवाच्या प्रत्यक्ष दर्शनानें मी पावन झालों हें मला अंतर्दृष्टीनें प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें मी शिवाला नमन करूं नको का ? 'नमः श्रीराम-कृष्णाय.'

स्वामीजी शिष्याकडे वळून म्हणाले, 'पाहिलेंस, खरी भक्ति बाणल्यावर मनुष्याची सारी प्रकृति कशी पालटून जाते याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. नागमहाशयांना देहाची शुद्धि नाहीं, ते पूर्णानंद स्थितींत मग्न झालेले असतात. ( स्वामी परमानंद यांजकडे वळून ) महाशयांसाठीं थोडा प्रसाद आणा बरें !

**नागम०**—प्रसाद ? तो कशाला ? स्वामीजींच्या दर्शनानें माझी तहान-भूक हरून गेली.

स्वामीजींच्या आजूबाजूला मठस्थ ब्रह्मचारी आणि संन्यासी उपनिषदांचा पाठ घेत होते. त्यांना स्वामीजी म्हणाले, " '**शिष्टागमनेऽनाध्यायः**' आज महाशयांच्या दर्शनाचा लाभ मठाला झाला."

सर्वांनीं पुस्तकें मिटलीं आणि महाशयांभोंवतीं ते गोळा झाले. स्वामीजीही त्यांच्या समोर बसले. मठस्थांस उद्देशून स्वामीजी म्हणाले, 'हे नागमहाशय पहा. ते बोलूनचालून संसारी. तथापि संसाराची शुद्धि त्यांना नाहीं. फार काय, पण इंद्रियगत अस्तित्वाची जाणीवही त्यांना नाहीं. सदोदित ते आनंद-मग्न. ( नागमहाशयांस ) या ब्रह्मचाऱ्यांना कांहीं श्रीरामकृष्णलीला सांगा बरें.

**नागम०**—काय म्हणतां महाराज ? आपल्यासमोर मी काय बोलावें ? श्रीरामकृष्णांच्या शिवावताराच्या दर्शनासाठीं मी आलों. रामकृष्णांची लीला ज्यानें जगासमोर मांडली त्या वीरभद्राच्या दर्शनासाठीं मी आलों. श्रीराम-कृष्णलीला त्याच्याच मुखानें प्रकट झाली तर लोक ऐकतील. नमः श्रीराम-कृष्णाय.

**स्वामीजीः**—महाशय, खरें पाहतां श्रीरामकृष्णांचें रहस्य आपणांला जितकें समजलें, तितकें दुसऱ्या कोणालाही तें समजलेलें नाहीं. आपला वास त्यांच्या अंतरंगांत होता, आणि आम्ही आजूबाजूला भटकत होतों. या भट-कण्यांत आमची सारी ग्राहक शक्ति उगीच फुकट गेली.

**नागम०**—महाशय, हें भलतेंच काय बोलतां? आपण प्रति-श्रीरामकृष्ण. एकाच नाण्याची एक बाजू श्रीरामकृष्ण आणि दुसरी बाजू विवेकानंद. ज्यांना डोळे असतील त्यांना हें स्पष्ट दिसेल.

**स्वामीजीः**—हा मठ आणि हा आश्रम आम्हीं सुरू केला आहे. हा आमचा मार्ग योग्य आहे ना?

**नागम०**—मी एक क्षुद्र जिवडा. मला काय समजतें? मला एवढें ठाऊक आहे कीं तुम्ही कराल तें योग्यच असावयाचें. त्यापासून जगाचें कल्याणच होणार.

मठस्थांनीं नागमहाशयांस वंदन केलें, आणि त्यांची पादधूलि मस्तकीं लावली. हें पाहातांच महाशय अगदीं घाबरून गेल्यासारखे दिसले. तेव्हां स्वामीजी शिष्यमंडळीस म्हणाले, 'महाशयांना त्रास होईल असें कांहीं करूं नका. तुमच्या पायां पडण्यानेंसुद्धां त्यांना कसेंसेंच होतें. (नागमहाशयांस) आपण कांहीं दिवस तरी मठांत येऊन राहावें. आपलें दर्शन म्हणजे ब्रह्मनिष्ठेचा चालताबोलता नमुनाच आहे. ही मंडळी आपल्यापासून कांहीं तरी शिकतील.

**नागम०**—संसार सोडावा असें माझ्या मनांत वारंवार येई. एकदां श्रीरामकृष्णाची अनुज्ञा मीं मागितली तेव्हां ते म्हणाले, 'आहेस तसा संसारी रहा.' यामुळेंच मी संसारांत राहिलों आहें. तुमच्यासारख्या पवित्र लोकांचें कधींमधीं दर्शन घेऊन मी पावन होतों.

**स्वामीजीः**—आपल्या घरीं मी एकदां येणार आहें.

नागमहाशयांचा आनंद गगनांत मावेना. ते म्हणाले, 'असा सोन्याचा दिवस खरोखरच उगवेल काय? आपले पाय माझ्या घराला लागले तर तें स्थळ दुसरी काशीच होऊन जाईल. माझें भाग्य इतकें मोठें आहे कीं नाहीं कोण जाणे?

**स्वामीजीः**—माझी तशी इच्छा तरी खास आहे. मग जगज्जननी काय घडवील तें खरें.

**नागम०**—स्वामीजी, तुमचें खरें स्वरूप कोणीं जाणावें? अंतर्दृष्टि उघडल्याशिवाय तुम्हांला कोणीही जाणूं शकणार नाहीं. तुमचें खरें स्वरूप श्रीराम-

कृष्णांना मात्र समजलें. बाकीच्यांना शब्दज्ञान मात्र झालें. पण तुम्हांला जाणलें असा कोणीही नाहीं.

**स्वामीजीः**—आपल्या या देशाला जागृति आणावी, ही एकच इच्छा मला आतां राहिली आहे. आपल्याला कांहीं सामर्थ्यच उरलें नाहीं असा भ्रम या राक्षसाला झाला आहे. यामुळें कोणाच्या हांकेला तो प्रत्युत्तरही देत नाहीं. या गाढ झोंपेंतून त्याला जागें करून सनातन धर्म मीं त्याच्या चित्ताला पटवूं शकलों, तर श्रीरामकृष्णांचें अवतारकार्य फलद्रूप झालें आणि आमचाही जन्म सफल झाला असें मी समजेन. माझ्या अंतःकरणांत ही एकच इच्छा आतां बाकी राहिली आहे. मुक्तिसुद्धां आतां मला फारशी महत्त्वाची वाटत नाहीं. महाशय, माझा हेतु सफल होईल असा मला आशीर्वाद द्या.

**नागम०**—आशीर्वाद देण्याचा अधिकार श्रीरामकृष्णांचाच. पण तुमच्या इच्छेचा ओघ फिरवील, इतकें सामर्थ्य कोणाला आहे ? तुमची इच्छा कोणतीही असो, ती फळापर्यंत पोंचणारच.

**स्वामीजीः**—पण श्रीरामकृष्णांचा आशीर्वाद तिच्या पाठीमागें असल्याशिवाय ती शून्यप्रायच आहे.

**नागम०**—अहो, तुमची इच्छा आणि त्यांची इच्छा वस्तुतः एकच. तुमची इच्छा म्हणजे ती त्यांचीच. ‘ नमः श्रीरामकृष्णाय ।’

**स्वामीजीः**—कोणतेंही काम करावयाचें म्हटलें म्हणजे आधीं शरीर सुदृढ पाहिजे. या देशांत आल्यापासून माझी प्रकृति असावी तशी नाहीं. मी परदेशीं होतों तेव्हां शरीर फारच सुस्थितींत होतें.

**नागम०**—‘ देहाच्या घरांत आपण राहावयास आलों म्हणजे घरभाडें दिलेंच पाहिजे’ असें श्रीरामकृष्ण म्हणत. रोग आणि दुःख हेंच तें घरभाडें. पण तुमचा देह म्हणजे मोहरांची तिजोरी. यासाठीं त्याची फार काळजी घेतली पाहिजे. पण हें तरी कोण करणार ? हें करण्याइतकें ज्ञान कोणाला असणार ? सर्वज्ञ असे एक श्रीरामकृष्णच. ‘ नमः श्रीरामकृष्णाय । ’

**स्वामीजीः**—मठांतील सर्व मंडळी माझी फार काळजी वाहातात.

**नागम०**—तसें करण्यांत त्यांचेंच कल्याण आहे. मग त्यांना तें समजो अगर न समजो. तुमच्या देहाची योग्य काळजी न घेतली तर एखादे वेळीं तो चटकन् पडून जाईल.

**स्वामीजीः**—नागमहाशय, मीं स्वीकारला आहे हा मार्ग बरोबर आहे कीं नाहीं हें मला पक्कें समजत नाहीं. लहर आली कीं एखाद्या कार्यामागें मी हात धुऊन लागतों; पण अशा कृतीचा परिणाम बरा होणार कीं वाईट होणार हें मला कांहींच समजत नाहीं.

**नागम०**—श्रीरामकृष्णांनीं तिजोरीला कुलूप लाविलें आहे, यामुळें तिच्यांतला सारा ऐवज तुम्हांला दिसत नाहीं; आणि तसें असणें हें सध्यां योग्यच आहे. कारण, ज्या क्षणीं सारें डबोलें तुमच्या हातीं येईल, त्याच क्षणीं या मानवदेहाचें कार्य समाप्त होईल.

स्वामीजी कांहीं गूढ विचारांत निमग्न होऊन बसले; इतके कीं, त्यांची पापणीही हालेना. स्वामी प्रेमानन्द यांनीं नागमहाशयांकरितां कांहीं प्रसाद आणिला, तो हातीं घेऊन नागमहाशय आनंदानें नाचूं उडूं लागले. थोड्या वेळानें सर्व मंडळी उठून बाहेर गेली. स्वामीजी आधींच बाहेर गेले होते. नागमहाशय त्यांना शोधूं लागले, तों बागेंतल्या एका बाजूकडे स्वामीजी खोऱ्यानें माती ओढीत असलेले दिसले. त्यांचा हात धरून नागमहाशय म्हणाले, 'आम्ही आलों आहों. सध्यां हें काम नको.' हातांतलें पावडें टाकून देऊन स्वामीजी मंडळीसमवेत बागेंत हिंडूं लागले. फिरतां फिरतां ते म्हणाले, "श्रीरामकृष्ण समाधिस्थ झाल्यानंतर नागमहाशय आपल्या चंद्रमौळी घरांत उपास करून स्वस्थ पडले आहेत अशी बातमी एके दिवशीं आमच्या कानीं आली. स्वामी तूर्यानंद, मी स्वतः व आणखी एक गृहस्थ असे आम्ही तिघे महाशयांच्या झोंपड्यांत गेलों आणि ' भिक्षां देहि ' अशी गर्जना केली. आमचा शब्द ऐकतांच महाशय ताडकन् उभे राहिले. पळत पळत बाजारांत जाऊन थोडेसे तांदूळ आणि जळाऊ लांकडें ते घेऊन आले. आम्ही जेवलों म्हणजे महाशयही जेवतील असा आमचा समज होता. भात शिजवून तयार झाल्यावर तें सबंध भांडेंच त्यांनीं आमच्या पुढें आणून ठेवलें. महाशयांसाठीं थोडा भात बाजूला काढून ठेवून आम्हीं भोजन केलें. आमचें जेवण झाल्यावर महाशयांना जेवण्याचा आग्रह आम्ही करूं लागलों. तेव्हां ती भाताची हांडी ताडकन् फोडून महाशय म्हणाले, 'ज्या घटांत परमात्मरूप प्रकट होत नाहीं त्याला पोसावयाचें कशाला ?' असें म्हणून त्यांनीं आपलें डोकें आपटून घेतलें. हा प्रकार पाहून दुःखानें आणि आश्चर्यानें आम्ही स्तंभित होऊन गेलों. अखेरीस आम्ही फारच

हट्ट धरला तेव्हां एक दोन घांस त्यांनीं खाल्ले. ( महाशयांकडे वळून ) महाशय, आजची रात्र आमच्या मठांत वस्ती होईल काय ?" एका शिष्यानें उत्तर दिलें, 'लवकर परत गेले पाहिजे' असें ते म्हणत होते.

**स्वामीजीः**—तर मग लवकरच एखादी बोट बघितली पाहिजे. आतां अंधार पडूं लागला.

बोट आल्यानंतर नागमहाशयांनीं स्वामीजींना वंदन केलें आणि बोटींत बसून ते कलकत्त्यास रवाना झाले.

***

[ २७ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ १८९९ ]

स्वामीजींची प्रकृति या वेळीं फार चांगली होती. आज सकाळींच शिष्य मठांत आला होता. स्वामीजींचें दर्शन करून तो खालीं आला आणि स्वामी निर्मलानंद यांजबरोबर कांहीं वेदांतविषयक गप्पा गोष्टी करूं लागला. इतक्यांत स्वामीजीही खालीं आले आणि शिष्याला म्हणाले, 'निर्मलानंदाबरोबर कसला वाद चालला आहे ?'

**शिष्यः**—वेदान्तांतलें ब्रह्म फक्त तुला आणि तुझ्या स्वामीला ठाऊक. आम्ही 'कृष्णस्तु भगवान् स्वयम् ।' असें म्हणणारे आहों, असे निर्मलानंद म्हणाले.

**स्वामीजीः**—मग तूं काय उत्तर दिलेंस ?

**शिष्यः**—मी म्हटलें, आत्मा हें एकच सद्रूप आणि त्याचा अनुभव घेणारा कृष्ण हा एक पुरुष होता. स्वामी निर्मलानंद मनांतून अद्वैतवादीच आहेत; पण बाह्यतः ते द्वैताची बाजू घेतात. आरंभीं द्वैत मानून हळूहळू वेदांतमताचा पाया मजबूत करावा आणि बुद्धि दाखवील त्या मार्गानें पुढें जावें, अशी त्यांची कल्पना दिसते. पण त्यांनीं मला एकदम वैष्णव म्हटलें म्हणून मी चिडलों आणि त्यांच्या भाषणांतील रहस्य विसरून त्यांच्याशीं मी वादविवाद करूं लागलों.

**स्वामीजीः**—तुझ्यावर त्याचें प्रेम आहे, म्हणून तुला चिडवून तुझी मजा तो पाहातो. पण तूं इतका कां चिडतोस ? तूंही त्याला वाटेल तर निरीश्वरवादी म्हण.

**शिष्यः**—महाराज, ईश्वर म्हणून कोणी सर्वशक्तिमान् व्यक्ति आहे, असा उल्लेख उपनिषदांत कोठें आढळतो काय ?

**स्वामीजीः**—आद्य तत्त्व अथवा सर्वारंभ ही कोणी व्यक्ति असूं शकणार नाहीं. जीवाच्या ठिकाणीं अविद्या प्रामुख्यानें राहते. पण अविद्या आणि विद्या यांचें मिश्ररूप जी माया तिचें अधिष्ठान करून ईश्वर स्वतःतूनच चराचर सृष्टि निर्माण करतो. पण ब्रह्म हें जीव आणि ईश्वर या दोहोंच्याही पलीकडचें आहे. जीव हा व्यक्तिरूप म्हणजे व्यष्टि असून ईश्वर समष्टि आहे. पण ब्रह्म दोहों-च्याही पलीकडचें आहे. ब्रह्म कशाचाही भाग नाहीं. ब्रह्माचें रूप बुद्धीला आकलन करतां यावें म्हणून त्याच्या ठिकाणीं जीवशिवादि भाव कल्पिले आहेत. ज्या भावावर उत्पत्ति, स्थिति आणि लय यांची कल्पना आपण करितों तेवढयाला ईश्वर अशी सञ्ज्ञा श्रुतींनी लाविली आहे, आणि जेथें कोणत्याही कल्पनेचा प्रवेश होऊं शकत नाहीं, त्याला श्रुतींनीं ब्रह्म म्हटलें आहे. जीव, शिव, ब्रह्म अशीं वेगवेगळीं नांवें श्रुतींनीं दिलीं म्हणून या तीन वेगवेगळया स्वतंत्र वस्तु आहेत असें मात्र समजूं नको. जीव आणि चराचर विश्व हेंही ब्रह्मच आहे असें विशिष्टाद्वैतवादी म्हणतात. ब्रह्माचें हें रूपांतर आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. उलटपक्षीं हें खरें रूपांतर नसून विश्व केवळ आभासरूप आहे असें अद्वैतमत आहे. ब्रह्माचें रूपांतर केव्हांच होत नाहीं, असें ते म्हण-तात. नाम आणि रूप यांच्या भ्रमामुळें विश्व भासतें, असें अद्वैतवाद्यांचें म्हणणें आहे. नाम आणि रूप यांचें अस्तित्व असेपर्यंतच विश्वाचें अस्तित्व भासतें आणि नामरूपाच्या लयाबरोबर विश्व दिसेनासें होतें. ध्यानाच्या अभ्या-सानें नामरूप विरून गेलें म्हणजे स्वयंभू ब्रह्म मात्र प्रत्ययास येतें. त्या ठिकाणीं जीव, ईश्वर, विश्व इत्यादि सारीं रूपें नाहींशीं होतात. मी स्वतःच ब्रह्मरूप आहें असा अनुभव तेथें येतो. जीव वस्तुतः ब्रह्मच आहे. नाम आणि रूप यांची कल्पना गेली कीं, जीवाचें खरें रूप प्रत्ययास येतें. अद्वैतमताचा हा सारांश आहे. अनेक मार्गांनीं आणि अनेक रूपकें देऊन याच साराचा विस्तार श्रुति-वेदान्त ग्रंथांनीं केला आहे.

**शिष्यः**—तर मग ईश्वर ही सर्वसत्ताधारी आणि सर्वशक्तिमान् व्यक्ति हें कसें ?

**स्वामीजीः**—मनुष्याचें सामर्थ्य मनानें बद्ध झालें आहे तोंपर्यंत मनुष्य हा मनुष्यच राहाणार. त्याचें सामर्थ्यही मर्यादितच असणार. मनाच्या द्वारेंच त्याला ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें आहे. त्याशिवाय दुसरें साधनच त्याला नाहीं. यासाठीं त्याचें ज्ञान मनाच्या मर्यादेनें मर्यादित झालेलें असणार हें उघड आहे. यामुळेंच परमेश्वराचें स्वरूपही आपल्या मनानेंच तो ठरवीत असतो. त्याचा परमेश्वर त्याच्या स्वतःशींच साम्य पावलेला असतो. मी तसाच परमेश्वर असें ठरविण्याकडे त्याचा कल स्वाभाविकपणेंच असतो. जगांतील दुःखें, दारिद्र्य, रोग इत्यादिकांनीं तो पीडला म्हणजे हताश होत्साता कोठें तरी सुरक्षित आसरा तो शोधू लागतो. या कष्टांचें पर्यवसान जेथें होईल असें ठिकाण त्याला हवें असतें; आणि केवळ मनाच्या साह्यानेंच तें त्याला शोधावयाचें असतें. हें सुरक्षित ठिकाण म्हणजे आपणा स्वतःसारखीच व्यक्ति असें मानण्यापलीकडे त्याला गत्यतर नसतें. वास्तविक पाहतां असें सुरक्षित आश्रयस्थान सर्वव्यापी आत्मा हेंच होय. पण ही गोष्ट त्याच्या ध्यानांत आरंभीं येत नाहीं. अखेरीस विचार करतां करतां आणि ध्यानादिकांच्या अभ्यासानें हें त्याच्या ध्यानांत येतें. मनुष्य कोणत्याही मार्गानें जात असला तरी स्वतःच्या ब्रह्मभावाला जागृति आणण्याचें कामच तो करीत असतो. पण मतिभिन्नतेमुळें हे मार्ग भिन्न भिन्न होणार हें उघडच आहे. परमेश्वर ही एक व्यक्तिविषयक वस्तु आहे, अशी ज्याची मनःपूर्वक भावना असेल त्यानें त्या भावनेला अनुरूप असा मार्ग आंखणें अवश्य आहे. त्याची ही भावना खरोखर अंतःकरणापासूनची असेल, तर ती त्याला अंतिम फल दिल्यावांचून राहणार नाहीं. त्याचा ब्रह्मभाव त्या भावनेनेंही जागृत होईल. ब्रह्मरूप होणें हेंच जीवमात्राचें साध्य आहे; आणि तद्विषयक निरनिराळ्या कल्पना हे निरनिराळे मार्ग होत. जीव वस्तुतः ब्रह्मरूप असतां तो मनानें मर्यादित झाला असल्यामुळें सुख, दुःख, शंका इत्यादि विकारांनीं त्रस्त होत असतो. तथापि त्याची सारी धडपड अखेरीस ब्रह्मरूप होण्यासाठींच असते. आब्रह्मस्तंबपर्यंत सारी चळवळ या एकाच इच्छेनें चालू आहे. मी ब्रह्मरूप आहें हा अनुभव येईपर्यंत कोणाचेही जन्ममरणाचे फेरे चुकावयाचे नाहींत. मनुष्यजन्म प्राप्त

होऊन मुक्तीची इच्छा अनावर झाली पाहिजे. तीबरोबरच सद्गुरूची कृपाही हवी. इतक्या गोष्टी जुळल्या म्हणजे तो मनुष्य आत्मानुभवाच्या मार्गाला लागतो. तसें न झालें तर मनुष्याचें मन साहजिकपणेंच कनककामिनीच्या मार्गे लागतें. तिकडे तें एकदां रमलें म्हणजे आत्मानुभवाच्या बाजूला तें सहसा वळत नाहीं. कुटुंबसौख्य, संपत्ति, कीर्ति इत्यादिकांची हांव ज्याच्या चित्तांत आहे त्याचें मन ब्रह्मज्ञानाकडे कसें वळणार ? संसारांतच ज्याला सुख वाटतें त्याला त्याच्या शोधाची इच्छा कशी होणार ? सर्वस्वावर पाणी सोडण्यास जो तयार असेल, सुखदुःखादिकांच्या द्वंद्वांच्या जोरदार प्रवाहापलीकडे जाण्याची धडपड जो करीत असेल आणि अशा कष्टमय स्थितींतही ज्याचें चित्त प्रसन्न आणि समतोल राहूं शकेल, तोच ब्रह्मज्ञानाचा अधिकारी होऊं शकतो. स्वतःच्या बळानें तोच जगाचे पाश तोडूं शकतो. मायेच्या तटाचा भेद तोच करूं शकतो. ‘ **निर्गच्छति जगज्जालात्पंजरादिव केसरी ।**’

**शिष्यः**—ठीक; पण संन्यासावांचून ब्रह्मज्ञानाची प्राप्ति नाहीं हें खरें काय ?

**स्वामीजीः**—निःसंशय खरें; हजार वेळ खरें. पण संन्यास बाह्यवस्तूंचा आणि त्याचप्रमाणें अंतर्गत इच्छांचाही पाहिजे. बाहेरचा देखावा त्या आश्रमाला जसा युक्त असावा, त्याचप्रमाणें आंतूनही वृत्ति तशीच अनुकूल असली पाहिजे. एका उपनिषत्सूक्ताचें भाष्य करतांना श्रीमदाचार्य म्हणतात, ‘ भगवें वस्त्र आणि दंडकमंडलू इत्यादिकांच्या साह्यावांचून नुसतें तप अथवा दुसरें साधन फलद्रूपतेला पोहोंचत नाहीं. लौकिकाचा छद सुटल्याशिवाय, त्यागबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय आणि सुखोपभोगाची इच्छा पूर्ण नाहीशी झाल्याशिवाय एक पाऊलही पुढें पडावयाचें नाहीं. ब्रह्मानुभव म्हणजे लहान मुलांच्या हातांतला खाऊ नव्हे कीं, तो थापबाजीनें उडवितां येईल.

**शिष्यः**—पण, अभ्यासाला सुरवात झाली म्हणजे कालेंकरून त्यागबुद्धीचा उदय हळू हळू होणार नाहीं काय ?

**स्वामीजीः**—कालेंकरून कांहीं तरी होईल अशी आशा बाळगून ज्यांना स्वस्थ बसवत असेल त्यांनीं तसें खुशाल बसावें. पण तुझ्यासारख्यानें अशी वाट कां पाहावी ? अनंत सरोवराचें पाणी आपल्या जीविताला आणून मिळविण्याकरितां पाट खणण्याची सुरवात तूं एकदम कां करूं नयेस ? मुक्तीच्या मार्गांत अशी चालढकल श्रीरामकृष्णांना खपत नसे. त्यांत काय आहे,

इतकी घाई कशाला, असली भाषा त्यांना कधींच आवडली नाहीं. जबर तहान लागली म्हणजे पिऊं पाणी केव्हां तरी, असें म्हणून कोणी स्वस्थ बसेल काय ? खरा तहानेलेला पाण्यासाठीं धांवत सुटतो. तुला इतकी दिरंगाई खपते याचें कारण हेंच, कीं तुला मुक्तीची तृषा लागलेली नाहीं. तुझी आत्मज्ञानाची इच्छा अद्यापि मिळमिळीत असल्यामुळें कौटुंबिक सुखानें तुझे समाधान होतें.

**शिष्यः**—सर्वसंन्यास करावा, अशी इच्छा मला अद्यापि कां होत नाहीं हें मलासुद्धां मोठें कोडें पडलें आहे. तशी इच्छा व्हावी म्हणून कांहीं मार्ग तरी सुचवा.

**स्वामीजीः**—साध्य आणि साधन हीं दोन्ही तुझ्याच हातचीं आहेत. फार झालें तर तुझ्या चित्ताला थोडीबहुत जागृति मी आणू शकेन. तूं किती तरी ग्रंथ पढला आहेस. ब्रह्मज्ञानी साधूंची संगत आणि सेवा तुझ्या हातून घडली आहे. येवढयानेंसुद्धां तुला संन्यासग्रहणाची इच्छा होत नाही तेव्हां तुझा जन्म फुकट म्हटला पाहिजे. पण ही सारी सेवा फुकट जाणार नाहीं हें खचित. योग्य कालीं कोणत्या ना कोणत्या मार्गानें तिचें फळ मिळेलच मिळेल.

स्वामीजींचे हे शब्द ऐकून शिष्याला मोठा विषाद वाटला. थोड्या वेळानें तो म्हणाला, ‘ महाराज, मी आतां आपल्या आश्रयाला आलों आहें. मुक्तीचें द्वार आपणच मला उघडून दिलें पाहिजे. याच जन्मांत याच देहांत मुक्तिलाभ कसा होईल हें आपण मला दाखवा.’

**स्वामीजीः**—इतकें भिण्याचें काय कारण ? नित्यानित्यविवेक हा राजमार्ग तुला मोकळा आहे. तुझ्या आजूबाजूला दिसणारें सारें वस्तुजात स्वप्नवत् आहे, हें आपल्या मनाला नित्य शिकवीत जा. आपला देह हा शुद्ध मातीचा गोळा आहे हा विचार क्षणोक्षणीं जागृत ठेव. मी स्वयंभू पुरुषमात्र आहें, असें चिंतन सदोदित करीत जा. मन हें या पुरुषावरील सूक्ष्म आवरण असून जड शरीर हें स्थूल आवरण आहे या गोष्टीचा विसर केव्हांही पडूं देऊं नको. या दोन आवरणांखालीं स्वयंप्रकाश अभेद्य पुरुष झांकून गेला आहे. यामुळें त्याच्या स्वरूपाचा वास्तविक प्रत्यय तुला येत नाहीं. तुझें मन आज बाह्य विषयांत भटकत आहे, त्याला अंतर्मुख केलें पाहिजे. मनाचें मनपण मेलें पाहिजे. देह पंचतत्त्वांचा गोळा; तो त्यांशीं आपोआपच मिळून जाईल. पण मनावरील सूक्ष्म

संस्कार असे सहजासहजीं नाहींसे होत नाहींत. मन म्हणजे अनेक संस्कारांचें गांठोडें. देह पंचत्व पावला तरी हें गांठोडें बीजरूपानें तसेंच राहातें आणि कालेंकरून त्यांचें झाड बनतें. तें दुसऱ्या देहाचा आश्रय करितें. अशा रीतीनें हें जन्ममरणचक्र अखंड फिरत राहातें. आत्मज्ञान होईपर्यंत हें असच चाला-वयाचें. यासाठींच मी म्हणतों कीं, ध्यान, धारणा, नित्यानित्यविवेक इत्यादि साधनांनीं सच्चिदानंद महासागरांत तें बुडेल असें कर. मन मेलें कीं, मर्यादेचे पाश तुटले; आणि तूं ब्रह्माशीं समरस झालास.

**शिष्यः**--मन ब्रह्माभिमुख करावें ही गोष्ट किती कठीण म्हणून सांगावी?

**स्वामीजीः**—अरे, शूराला कठीण असें काय आहे? दुबळ्यांनाच ही भाषा शोभते. '**वीराणामेव करतलगता मुक्तिः । न पुनः कापुरुषाणाम् ।**' मन आवरणें कठीण आहे हें खरें, पण त्याला अभ्यास आणि वैराग्य यांनीं वश करितां येतें हें गीतावचन तुला ठाऊक आहेच. चित्त हें एखाद्या सरोवरासारखें असून विषयांच्या आघातानें त्यावर उठलेल्या लाटा हेंच मन. मन म्हणजे विचारलहरींची परंपरा. या विचारलहरींतून इच्छा उद्भवते. या इच्छेतून कर्मप्रवृत्ति निर्माण होते आणि ती प्रवृत्ति जडदेहाच्या द्वारें स्पष्टत्वास येते. मग अखंड कर्मपरंपरेस सुरवात होते. कर्म जसें अखंड तसें त्यांचें फळही अखंडच. यामुळेंच या कर्म-फळाला अनुसरून चित्तावर असंख्य लाटा उठतात. या साऱ्या वृत्तींचें आकलन झालें पाहिजे. चित्तवृत्तींचा पूर्ण निरोध होऊन चित्त निष्कंप झालें पाहिजे. पृष्ठभागावरील या लाटा त्यांत विरून गेल्या पाहिजेत. चित्त प्रशांत झालें म्हणजे तेथें ब्रह्म प्रकाशमान होईल. '**भिद्यते हृदयग्रंथिच्छिद्यंते सर्वसंशयाः**' असें या स्थितींचें वर्णन श्रुतीनें केलें आहे. तुझ्या ध्यानांत आलें ना?

**शिष्यः**—होय, महाराज. पण ध्यानाला तरी काहीं ध्येय वस्तु हवी ना?

**स्वामीजीः**—अरे, तूंच ध्याता आणि तूच ध्येय. '**सोऽहम्**' मी सर्व-गामी आत्मा आहें या विचाराचें ध्यान कर. मी देह नव्हें, मन नव्हें, बुद्धि नव्हें, अथवा सूक्ष्म शरीरही नव्हें, या नकारात्मक विचारानें तूं आपलें मन ज्ञानांत बुडवून टाक. शुद्ध ज्ञानरूप तेंच तुझें खरें आत्मरूप आहे. '**नेति नेति**' या विवेकानें या आत्मरूपांत तूं निमग्न हो. याच विचारांत मन वारंवार बुडवून त्याला नाहींसें करून टाक. असें झालें तरच तू आत्मनिष्ठ होऊ शक-शील. अशा स्थितींत ज्ञाता आणि ज्ञेय, ध्याता आणि ध्येय इत्यादि सारीं द्वंद्वें

एकरूप होतील आणि त्याच वेळीं हा जगद्भ्रमही नाहींसा होईल. याला त्रिपुटि-भेद अशी संज्ञा शास्त्रानें सांगितली आहे. अशा स्थितींत सापेक्ष ज्ञान नाहीं. आत्मा हा स्वतःच ज्ञाता असल्यामुळें दुसऱ्या कोणत्याही साधनानें तो जाणला जाणार नाहीं. आत्मा ही एकच सच्चिदानंद वस्तु आहे. वस्तुतः जीव आत्मरूप असतांही मायेच्या आवरणामुळें तो सापेक्ष ज्ञानाच्या स्थितींत येऊन पडतो. मायेची शक्ति दुर्ज्ञेय आहे. अस्तित्व अथवा नास्तित्व यांतली कोणतीही संज्ञा तिला निश्चयानें लावतां येत नाहीं. या मायेनें युक्त झालेला जीव सापेक्ष जाणिवेंत येऊन पडतो. या जीवस्थितीला आपण जाणिवेची स्थिति असें म्हणतों; आणि ज्या ठिकाणीं सापेक्ष अस्तित्वाची जाणीव नाहींशी होते तेथें समाधि अशी संज्ञा शास्त्रें लावतात. '**स्तिमितसलिलराशीप्रख्यमाख्याविहीनं**' असें या स्थितीचें वर्णन शास्त्रें करतात.

सर्व शास्त्रें आणि तत्वज्ञान यांचा उगम ज्ञाता, ज्ञेय इत्यादि द्वंद्वांच्या अवस्थेंतूनच झाला आहे. वास्तविक पाहातां मानवी विचार अथवा मानवी भाषा सत्यरूपाचें वर्णन करूं शकत नाहीं. कारण हें रूप या दोहोंच्याही पलीकडचें आहे. आपलें विचारसामर्थ्य तेथपर्यंत पोहोंचूंही शकत नाहीं. मग त्या स्थितीचें वर्णन आपण कोणत्या शब्दांनी करावें ? यासाठीं शास्त्र आणि तत्त्वज्ञान यांनीं दर्शविलेलें सत्यरूप अंशतः मात्र खरें आहे. या द्वारानें निरपेक्ष सत्याशीं आपली भेट कधींही होणार नाहीं. यामुळेंच निरपेक्ष सत्याच्या भूमिकेवरून सर्व वस्तुजात असत्य दिसूं लागतें. त्या ठिकाणीं मी, तूं आणि इतर वस्तु असा भेदच प्रतीत होत नाहीं. मी सत्य वस्तु आहें इतकी एकच जाणीव तेथें राहात असल्यामुळें तिच्या तुलनेनें बाकीचें सारें आपोआपच असत्य ठरतें. मीच सर्वत्र भरून उरलों आहें हें एकच ज्ञान तेथें शिल्लक राहातें. '**नित्यमस्मत्प्रसिद्धं**' असे श्रुति माझ्यासंबधीं म्हणूं लागतात. ही स्थिति मी स्वतः अनुभविली आहे. तिचा अनुभव तूंही घे; आणि सर्वांना हाच उपदेश कर. या स्थितीपर्यंत तूं पोंहोंचलास तरच चिरशांतीचा लाभ तुला होईल.

हे शब्द बोलत असतां स्वामीजींची मुद्रा गंभीर दिसूं लागली आणि कांहीं वेळ विचारांत ते निमग्न होऊन राहिले. थोड्या वेळानें ते पुढें म्हणाले, 'ही स्थिति याच जीवितांत तूं प्राप्त करून घे. तसें झालें म्हणजे सर्व शंका आपोआप विराम पावतील. साऱ्या उपपत्ती आणि सारें तत्त्वज्ञान या एका स्थितीच्या

पोटांत सामावलेलें आहे. अशी स्थिति प्राप्त करून घेण्यांत तुझें कल्याण तर आहेच, पण इतरांना मार्गदर्शक होऊन त्यांचेंही कल्याण तूं साधशील. सर्व ज्ञानाचा निष्कर्ष आज मीं तुला सांगितला. याहून उच्च असें आणखी कांहीं नाहीं.

**शिष्यः**—महाराज, आज शुद्ध ज्ञानमार्गाची ओळख मला करून देऊन त्याचें महत्त्वही आपण मला सांगितलें. पण भक्ति श्रेष्ठ असें पूर्वी एकदां आपण म्हणत होतां. तसेंच केव्हां कर्माचें तर केव्हां योगाचें महत्त्वही अतिशयत्वानें आपण वर्णिलें आहे. अशा स्थितींत माझी बुद्धि अधिक गोंधळांत मात्र पडते.

**स्वामीजीः**—ब्रह्मज्ञान हें अंतिम साध्य आहे. मनुष्याचा तो अत्युच्च जन्महेतु आहे. पण देहधारी असेपर्यंत मनुष्याला सदोदित ब्रह्मभावांत निमग्न राहणें शक्य नाहीं. या स्थितींतून तो बाहेर आला म्हणजे आपलें मन कोठेंतरी गुंतविणें त्याला भाग असतें. अशा वेळीं दुसऱ्यांच्या कल्याणाला साधक असें कांहीं तरी कर्म त्यानें करावें हें युक्त आहे. म्हणूनच '**आत्मवत् सर्वभूतानि**' या भावनेनें जीवांची निरपेक्ष सेवा तूं कर असा उपदेश मी तुला करितों. माझ्या मुला, कर्माची गति अशी गहन आहे कीं, मोठमोठे सत्पुरुषही त्याच्या जाळ्यांत गुरफटून अडकून पडतात. कर्म करतां करतां आशा केव्हां येऊन चिकटली, हेंही त्यांना समजत नाहीं. यासाठींच निष्कामबुद्धि सदोदित जागृत ठेवून कर्म केलें पाहिजे. गीतादर्शित कर्मयोग हाच. पण ब्रह्माच्या ठिकाणीं या कर्माचा संपर्कही नाहीं हें विसरूं नको. नुसत्या कर्मानें ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावयाचें नाहीं. त्याच्याशीं त्याचा कोणताही सरळ संबंध नाही. फारच झालें तर कर्मानें चित्त-शुद्धि होईल. निष्काम कर्माचा अतिम परिपाक इतकाच. यासाठींच कर्म आणि ज्ञान यांसंबंधीं श्रीमच्छंकराचार्यांनीं इतकी कडक टीका केली आहे. निरपेक्ष कर्मामुळें ब्रह्मज्ञान परंपरेनें प्राप्त होतें. यासाठीं तोही एक मार्ग होऊं शकेल. पण ब्रह्मज्ञान हेंच आपलें अंतिम साध्य आहे; कर्म करीत राहाणें हें नव्हे. मार्ग कितीही झाले तरी अंतिम साध्य ब्रह्मज्ञान हें एकच.

**शिष्यः**—महाराज, राजयोग आणि भक्तियोग यांची उपयुक्त माहिती कृपा करून सांगावी.

**स्वामीजीः**—या मार्गांनीं जाणारेही ब्रह्मनिष्ठ होऊं शकतात. भक्ती हा पिपीलिकामार्ग आहे. क्रमाक्रमानें उन्नति साधून अखेरचें साध्य यांत हळूहळू

सिद्ध होतें. तथापि हा मार्ग आचरावयास सोपा आहे. योगमार्ग फार कठीण; त्यांत जागोजाग अडथळे. मन आधीं भलतीकडेच भरकटतें. त्याला आवरून योगमार्गाभिमुख करणें हें काम फार कठीण. हें सिद्ध झालें तर पुढें वाटेंत सिद्धीची धोंड उभी राहाते. यांच्या जाळ्यांत मन एकवार अडकलें, कीं मूळ हेतूचा विसर त्याला पडतो. ज्ञानमार्ग हा सर्वांत सद्यःफलदायी आहे. इतर मार्गाचें स्वरूप बुद्धिपूर्वक समजण्यास ज्ञान अवश्य आहे. यामुळेंच सर्व देशांत आणि सर्व काळी ज्ञानाला सारखाच मान मिळत असतो. तथापि या नित्यानित्यविवेकाच्या मार्गातही मोठ्या अडचणी नाहींत असे नाहीं. पुष्कळ वेळां भलत्याच कल्पनांमागे लागून खऱ्याखोट्याचा उमज मनाला पडेनासा होतो. फुकटचे तर्कवितर्क तें करूं लागतें; आणि मग या तर्कांना शेवट केव्हांही येत नाहीं. यासाठीच नित्यानित्यविवेकाबरोबर ध्यानाचा अभ्यास अवश्य आहे. या जोडगोळीनेंच मोक्ष जिंकणे शक्य आहे. या जोडमार्गानें जो निश्चयानें जाईल तो हटकून यशस्वी होईल. सद्यःफलप्राप्तीसाठीं माझ्या मतें हाच मार्ग सोपा आहे.

**शिष्यः**—महाराज, आपण ज्यांना अवतारी पुरुष म्हणतों त्यांजविषयीं कांहीं माहिती कृपा करून सांगावी.

**स्वामीजीः**—वा! तूं तर एका आचमनांत समुद्र आटवूं पाहतोस.

**शिष्यः**—महाराज, असल्या नानाप्रकारच्या शंका आणि अडचणी यांचें निवारण एकवार झाले म्हणजे आपणांस वारंवार त्रास देण्याचें कारण मला राहाणार नाहीं.

**स्वामीजीः**—ज्यांच्या वरदहस्ताच्या स्पर्शानें क्षणार्धात ब्रह्मभाव प्राप्त होतो, त्यांना अवतारी पुरुष म्हणतात. तीं चालतींबोलतीं जिवंत तीर्थेंच होत. ज्या आत्म्याच्या शोधांत भटकतां भटकतां श्रुति थकून बसली, त्याचा प्रत्यक्ष अनुभव हे पुरुष क्षणार्धांत घेतात. जन्मतःच ते ब्रह्मनिष्ठ असतात. ते जसे ब्रह्मविद् तसेच ब्रह्मरूपही असतात.[1] "**ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति**' ब्रह्मज्ञ आणि ब्रह्म यांत फरक नाहीं, असें श्रुतिवचन आहे. आत्मरूप मनानें जाणलें जाणें शक्य नाहीं. कारण आत्मा हा एकटाच ज्ञाता आहे. यासाठीं मानवी मनाची कमाल उडी अवतारी पुरुषांपर्यंतच पोहोंचूं शकते. मानवी मनाला आकलन होण्यासारखें जें ईश्वराचें अत्युच्च स्वरूप तेंच अवतार. या स्वरूपापलीकडे सापेक्षज्ञानाचा वास नाहीं. सापेक्षज्ञानाची उच्चतमावस्था म्हणजे अवतारी

पुरुष अथवा परमेश्वर. असे अवतारी पुरुष जगांत क्वचितच येतात; आणि त्यांना यथार्थपणें जाणणारेही तितकेच दुर्मिळ असतात. श्रुतींचे सिद्धांत खरे कीं खोटे याची कसोटी हे पुरुष दाखवितात. या संसारमहासागरांत निवाऱ्याचीं बंदरें कोठें आहेत हें दाखविणारे दीपस्तंभ हेच. अशा महापुरुषांचा संगतिलाभ घडल्यानें त्यांच्या कृपेनें मनावरील तिमिरपटल क्षणार्धांत दूर होतें, आणि अंतःकरण प्रकाशमय होतें. ही गोष्ट कशी घडते हें जाणण्याचें साधन आपल्या-जवळ नाहीं. पण ती घडते हें मात्र नितांत सत्य आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत स्वतःचा उल्लेख जेथे जेथं केला आहे, तेथें तेथें या आत्मस्थितींतूनच ते बोलत आहेत असे समज. जेथें 'मी' असे ते स्वतःबद्दल म्हणतात तेथे आत्मरूप बोलत आहे, हें लक्षांत ठेव. '**मामेकं शरणं व्रज।**' इत्यादि वचनांचा अर्थ याच अनुरोधानें लावला पाहिजे. आत्मज्ञान हेंच गीतेचें अखेरचें साध्य आहे. कर्म, योग इत्यादिकांचा विचार गीतेनें केला तो केवळ आगंतुकपणें केला आहे. तेही आत्मज्ञानाचे मार्ग, इतकाच त्यांचा आशय आहे. ज्यांना आत्मज्ञान नाहीं ते आत्मघातकच होत. असत्य वस्तूमागें लागून ते आत्मवध करितात. इंद्रियजन्य सुखाच्या फांसांत आपली मान ते अडकवतात. तुम्ही माणसें असून अशी भलतीच गोष्ट कां करावी? लौकिक सुखांचा हा उकिरडा तुम्हांला कां सोडवत नाहीं? हीं सुखें चिरस्थायीसुद्धां नव्हत. हा केवळ औट घटकेचा बाजार. जन्मावें आणि मरावें व मधल्या वेळेंत अज्ञानपंकांत लोळावें, असल्या पामरांच्या पंक्तींतच तुझ्यासारख्यानें बसावें काय? हा क्षणैकसुखाचा मार्ग सोडून तूं चिरंतन कल्याणाचा मार्ग धर. आत्मचर्चेशिवाय दुसरा शब्द बोलूं नको. कोणा टोणप्याशीं बोलतांनाही आत्मलाभाच्याच गोष्टी कर. अरे, असल्या गोष्टी नुसत्या बोलत राहिल्यानेंही बुद्धीवरील पटल दूर होतें. '**तत्त्वमसि,**' '**सोऽहमस्मि,**' '**सर्वं खल्विदं ब्रह्म**' इत्यादि मंत्रांचा अखंड जप कर. अंतःकर-णांत सिंहाचें धैर्य असूं द्या. येथें भिण्यासारखें काय आहे? भीति हाच मृत्यु, भीति हेंच महापाप. अर्जुन भीतीनें ग्रस्त झाला तेव्हां त्याचा हा मृत्यु टाळण्या-करितां भगवताला गीता सांगावी लागली. आरंभीं अर्जुनाची समजूत पटेना, तो धैर्य धरीना. अखेरीस भगवंताचें विश्वरूप त्यानें पाहिलें, हळूहळू तो आत्मनिष्ठ झाला, आणि ब्रह्माग्नीनें त्याचें कर्मजाल निःशेष जाळून टाकलें, तेव्हांच तो युद्धास सज्ज झाला.

**शिष्यः**—महाराज, ब्रह्मानुभवानंतर कर्म करणें शक्य आहे काय ?

**स्वामीजीः**—ब्रह्मानुभवानंतर सामान्य रीतीप्रमाणें कर्मप्रवणता नसते. तथापि कर्म घडत असतें, पण त्याची पद्धत सर्वथा बदलते. जें कर्म ज्ञानी करितो त्याच्या योगें जगाच्या कल्याणाचे मार्ग मोकळे होत असतात. तो जी कृति करितो, अथवा तोंडानें बोलतो त्यामुळें सर्वांचेंच कल्याण होतें. '**देहस्थोऽपि न** देहस्थः' अशी त्याची स्थिति असते. श्रीरामकृष्णांची अशी स्थिति आम्हीं प्रत्यक्ष पाहिली आहे. असे पुरुष इतरांसारखींच कर्मे करीत असतात. तथापि नुसती लीला अथवा खेळ यापलीकडे त्यांना स्वरूप नसतें. '**लोकवत्तु लीलाकैवल्यम्।**'

***

[ २८ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, १९०१ ]

शिष्य आज सकाळींच मठांत आला होता. कलकत्ता येथील ज्युबिली आर्ट ॲकॅडेमींतील गुरु श्रीयुत दासगुप्तही त्यांजबरोबर होते. बाबू महाशय उत्तम प्रतीचे चित्रकार आणि विद्वान असून स्वामीजींचे चहातेही होते.

**स्वामीजीः**—उत्कृष्ट चित्रांचे आणि शिल्पकलेचे नमुने जगांतील सर्व देशांत मीं पाहिले. तथापि आपल्या देशांत बौद्धकालीं या कलेची जी विलक्षण वाढ झाली, तिची तोड इतर कोठेंही मला आढळली नाहीं. मोंगल घराण्याच्या बादशाहींतही कलेची वाढ पुष्कळ झाली. ताजमहाल, जुम्मामशीद हीं त्यांच्या कालच्या शिल्पकलेचीं चिरस्थायी स्मारकें आहेत.

मनुष्याच्या मनांतील कल्पनांचें मूर्तरूप म्हणजे कला. जेथें मूळ कल्पना उत्कटतेनें व्यक्त होत नाहीं, अशा चित्राला अथवा शिल्पाला कला ही संज्ञा लावतां येणार नाहीं. मग ती कितीही नानाविध रंगांनीं नटविलेली असो. फार काय, पण रोजच्या संसारांत लागणाऱ्या पेले-बशासुद्धां कलेच्या दृष्टीनें बनविलेल्या असाव्यात. त्यांतही एखाद्या कल्पनेचें व्यक्तरूप पाहावयास सांपडावें. पारिसच्या प्रदर्शनांत एक संगमरवरी पुतळा मीं पाहिला. त्याच्याखालीं 'कला सृष्टीचा पडदा उघडीत आहे' असे शब्द होते. सृष्टीच्या बाह्य स्वरूपामागें

काय आहे याचा शोध कला करीत आहे, असें त्या पुतळ्यांत दाखविलें होतें. सृष्टीच्या अंतरंगाचा शोध अद्यापि पुरासा लागलेला नाहीं, ही कल्पना तो पुतळा व्यक्त करीत होता. ही अमोलिक कल्पना व्यक्त करण्याचा यत्न ज्या कारागिरानें केला त्याची किती स्तुति करावी ? महाशय, आपणही असेंच कांहीं तरी काम करावें.

**बाबूः**—होय, असें कांहीं काम करावें असें मलाही पुष्कळ वेळां वाटतें. पण आपल्या देशांत कलांना उत्तेजन कोठें आहे ? एक तर आपला देश फार दरिद्री आणि दुसरें असें कीं, असल्या गोष्टींची रुचीही फारशी कोणाला नाहीं.

**स्वामीजीः**—खऱ्या कलेचें उद्घाटन ज्यांत झालें आहे असें एखादें चित्र तुम्हीं तयार केलें, तर त्याची चहा अवश्य आहे. त्याचा कोणी तरी भोक्ता आज ना उद्यां भेटेल. खऱ्या नाण्याला या जगांत भोक्ता मिळत नाहीं असें कधींच घडत नाहीं. आतां कित्येक वेळां असा भोक्ता सांपडण्यास प्रसंगीं हजारों वर्षेंसुद्धां लोटतात, हें मात्र खरें. '**कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ।**' या भावनेनें अशीं कामें आपण केलीं पाहिजेत.

**बाबूः**—खरें आहे महाराज. पण आम्ही लोक इतके कुचकामी बनलों आहों कीं, निष्काम कर्म करण्यांत एक क्षणही आमच्यानें खर्च करवत नाहीं. तसें करण्यास लागणारें धैर्यच आम्हांजवळ नाहीं. आज पांच वर्षें रखडतां रखडतां या कलेचें अल्पस्वल्प ज्ञान मीं मिळविलें आहे. माझे श्रम अगदींच वायां जाऊं नयेत इतका आशीर्वाद आपण मला द्या.

**स्वामीजीः**—तुम्ही मनापासून उद्योग करीत असलां म्हणजे यश मिळालेंच पाहिजे. कोणतेंही काम आपला सारा जीवभाव खर्चून जो करितो त्याला लौकिक यश तर मिळतेंच, पण अशा उद्योगानें तो ब्रह्मभावापर्यंतही पोहोंचूं शकतो. कोणीही मनुष्य मनोभावें कोणतेंही काम करीत असला, तर परमेश्वर त्याचा अवश्य पाठीराखा होतो.

**बाबूः**—आपल्या इकडील आणि पाश्चात्य देशांतील कलांत आपणांस काय फरक आढळला ?

**स्वामीजीः**—सामान्यपणें असा फरक फारसा असूं शकत नाहीं. कोठेंही झालें तरी स्वयंभू कल्पना विरळाच आढळावयाची. निरनिराळ्या वस्तूंचे फोटो

काढून त्यांच्या मदतीनें चित्रें तयार करावयाचीं अशी तिकडची रीत आहे. पण यंत्रांचा प्रवेश जेथें झाला, तेथून स्वयंभूपणा पळून जातो. मग कल्पनेचें स्वातंत्र्य त्या चित्रांत आढळावयाचें नाहीं. प्राचीन काळचे चित्रकार स्वतंत्र कल्पक होते. कल्पनेचा उद्भव त्यांच्याच डोक्यांत होत होता आणि मग ती कल्पना व्यक्तदशेला आणण्याचा यत्न ते करीत. आतांचीं चित्रें म्हणजे छाया-चित्रांच्या प्रतिकृति. मग त्यांत कल्पनेचें स्वातंत्र्य कोठून आढळणार ? इतकेंच नव्हे तर अशा कल्पना निर्माण करण्याचा यत्नही कोणी करीत नाहीं. यामुळें खरीं चित्रें सर्वत्रच दुर्मिळ होत चाललीं आहेत. तथापि या बाबींत प्रत्येक देशाचें कांहीं वैशिष्टय म्हणून असतेंच. पाश्चात्य देशांत गायन आणि नृत्य या कला उत्कट भाव दर्शविण्याइतक्या प्रतीला पोंचल्या आहेत. वादनकलेंत वाद्याचा आवाज कानांत जाऊन भरतोसा वाटतो; जणूं काय हे सूर आपल्या कानांत कोणी ठांसून भरीत आहे असें वाटतें. गायनाचाही हाच प्रकार. नर्तक आपले सारे अवयव पिळवटल्यासारखे करतोसा दिसतो. एकंदरीनें भावाचा उत्कटपणा दाखविण्याचा यत्न हे लोक करितात. चित्रकलाही तिकडे असेंच विशिष्टत्व पावली आहे. पक्कीं जडवादी राष्ट्रें सृष्टीचे नमुने पुढें ठेवून आपलीं चित्रें बनवीत असतात. उलटपक्षीं, सृष्टीच्या पलीकडील सत्यवस्तूकडे ज्यांची नजर जाऊं लागली आहे अशीं राष्ट्रें भावनात्मक चित्रें बनवितात. सृष्टीचे देखावे हें पहिल्याचें साध्य, तर कांहीं तरी उच्च भावदर्शन हें दुसऱ्याचें साध्य. दोन्ही कल्पना वेगवेगळ्या आहेत. तथापि दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांनीं आपापल्या विशिष्ट कलेची वाढ चांगल्या प्रकारें चालविली आहे. आपल्या देशांत प्राचीन काळीं शिल्पकला पुष्कळच उच्च दशेला पोहोंचली होती. त्या काळचे दगडी पुतळे तुम्हीं पाहिले तर ही गोष्ट तुमच्या लक्षांत येईल. त्यांतील कांहीं तर असे आहेत कीं, त्यांजकडे पाहतां पाहतां जड जगाचा विसर पडतो आणि आपलें मन त्यापलीकडील उच्च कल्पनेकडे ओढ घेऊं लागतें. पाश्चात्य राष्ट्रांत प्राचीन चित्रकारांची पद्धत आतां मागें पडली आहे. त्याचप्रमाणें आमच्या देशांत स्वतंत्र कल्पनांचीं चित्रें रंगविण्याचा उद्योग कोणी करीत नाहीं. तुमच्याच शाळेंतलीं चित्रें पाहिलीं तर त्यांत भावनेचा पूर्ण अभाव आढळेल. ध्यानस्थ हिंदूचें एखादें चित्र काढून त्याच्या चेहऱ्यावर गतकालीन भावना दाखविण्याचा यत्न तुम्हीं कां करूं नये ?

**बाबूः**—आपल्या या भाषणानें अशीं कामें करण्यास हुरूप वाटते. आपल्या कल्पना अमलांत आणण्याचा यत्न मी करीन.

**स्वामीजीः**—उदाहरणार्थ, कालीमातेचें स्वरूप घ्या. यांत मंगलमय आणि भयानक अशा दोन भावनांचें मिश्रण आहे. पण हे दोन भाव ज्यांत स्पष्ट दिसतात असें एकही चित्र माझ्या पाहाण्यांत आलें नाहीं. इतकें कशाला, पण या दोहोंतला एकही भाव उत्कटतेनें दाखविलेला माझ्या पाहाण्यांत कोठें नाहीं. **'कालीमाता'** या माझ्या इंग्रजी काव्यांत मातेचें भयानक स्वरूप रंगविण्याचा यत्न मीं केला आहे. त्या माझ्या कल्पनांबरहुकूम एखादें चित्र तुम्ही कराल काय ?

**बाबूः**—आपल्या कल्पना तर अगोदर कळूं द्यात.

स्वामीजींनीं ग्रंथालयांतून एक चोपडी आणवून वाचण्यास सुरवात केली. कवितेंतील वर्णन आपल्या चित्तांत ठसवून घेण्याचा प्रयत्न बाबू महाशय करीत होतेसें दिसलें. थोड्या वेळानें वर्णिलेली मूर्ति त्यांच्या मनश्चक्षूं पुढें गोचर झालीसें दिसलें. स्वामीजींकडे ते भयभीत मुद्रेनें पाहूं लागले.

**स्वामीजीः**—ही कल्पना तुम्ही चित्रांत रंगवाल ?

**बाबूः**—मी यत्न करून पाहीन. पण ही कल्पना चित्तांत येतांच डोकें भ्रमूं लागतें. या भयंकर स्वरूपाची नुसती कल्पनाही करवत नाहीं.

**स्वामीजीः**—चित्र तयार झाल्यावर तें मला दाखवा, म्हणजे त्यांत कांहीं अधिक उणें करण्यासारखे दिसेल तें मी तुम्हांस सांगेन.

रामकृष्ण मिशनसाठीं एक मुद्रा बनवावयाची होती. या मुद्रेचें चित्र स्वामीजींनीं आपल्या कल्पनेनें तयार केलें होतें. तें आणून त्यांनीं बाबू महाशयांस दाखविलें. सरोवरांत विकसलेलीं कमळें आणि एक हंस असून या सर्वांच्या भोंवतीं नागिणीचें वेटोळें त्यांत काढलेलें होतें. या चित्रांतील कल्पनेचें रहस्य बाबूमहाशयांस समजलें नाहीं. तेव्हां तें सांगण्याची प्रार्थना त्यांनीं स्वामीजींस केली. स्वामीजी म्हणाले, 'हें तरंगमय सरोवर कर्माचें निदर्शक आहे; आणि कमळ हें भक्तीचें आणि उदयाचलावरील सूर्य हें ज्ञानोदयाचें चिन्ह आहे. भोंवतालची नागीण ही योगमार्ग दाखवीत आहे. ती जागृत झालेली कुंडलिनी आहे. तसेंच या चित्रांतील हंस परमात्मपद दाखवितो. कर्म, ज्ञान, भक्ति आणि योग यांच्या संयुक्त अभ्यासानें परमात्मप्राप्ति होते, असा या

चित्राचा अर्थ आहे.' हें स्पष्टीकरण ऐकून संतुष्ट होत्साते बाबूमहाशय कांहीं काळ स्तब्ध राहिले. थोड्या वेळानें ते म्हणाले, 'महाराज, कांहीं काळ आपल्यापाशीं अभ्यास करण्याची सवड मला असती तर फार बरें होतें.'

श्रीरामकृष्णांचें देवालय आणि मठ यांचा नकाशा स्वामीजींनीं बाबूमहाशयांस दाखविला आणि ते त्यांस म्हणाले, 'या मठांत पूर्व आणि पश्चिम यांचा संगम व्हावा असा यत्न मी करणार आहें. दोन्ही संस्कृतींतील उत्तम भागांचें मिश्रण येथें पहावयास सांपडावें, अशी माझी इच्छा आहे. त्या देशांत प्रवास करीत असतां या इमारतीचे नकाशे मी आपल्या डोक्यांत कल्पीत असें. त्या माझ्या कल्पना येथें मूर्तावस्थेंत आणण्याचा यत्न मी करणार आहें. पुष्कळशा स्तभांचा आधार असलेला एक भव्य दिवाणखाना प्रार्थनेसाठीं असावा. या प्रार्थनालयाच्या भिंतींत पूर्ण विकसलेलीं कमळें दाखवावीं. हजार माणसांस एका वेळीं प्रार्थनेला बसतां येईल इतका तो मोठा असावा. ही इमारत लांबून पाहिली तर देऊळ आणि प्रार्थनामंदिर हीं दोन्ही मिळून ॐ हें अक्षर बनलें आहे असे दिसावें. देवालयांत श्रीरामकृष्णांची मूर्ति हंसासनारूढ असावी. एकमेकांस चाटणाऱ्या सिंहाचीं आणि कोंकराचीं चित्रें दरवाजाच्या दोन फळ्यांवर असावीं. उच्च सामर्थ्य आणि नम्रता हीं दोन जणूं काय एकमेकांस भेटत आहेत. हें माझ्या कल्पनांचें वर्णन झालें. पुरेसे आयुष्य लाभलें तर त्यांना मी मूर्तरूपांत आणीन. तसें न झालें तर ही कामगिरी भावी पिढ्यांवर सोंपविणें भाग आहे. मग त्यांना फावेल त्याप्रमाणें ती त्यांनीं पूर्णतेस आणावी. श्रीरामकृष्णांचा अवतार एकाच गोष्टीपुरता नव्हता. कला आणि संस्कृति यांच्या सर्व शाखांना जागृति आणावी असा या अवताराचा हेतु होता. यासाठीं कर्म, विद्या, ज्ञान, भक्ति इत्यादिकांचा प्रसार या मध्यवर्ती मठांतून सर्व जगभर झाला पाहिजे. या कार्यात तुमच्यासारख्यांनीं मला मदत केली पाहिजे.'

बाबूमहाशय आणि तेथें असलेले संन्यासी व ब्रह्मचारी तटस्थ होऊन स्वामीजींच्या मुखाकडे टकमकां बघत राहिले. थोड्या वेळानें स्वामीजी पुढें म्हणाले, 'तुमच्याशीं या गोष्टी इतक्या विस्तारानें बोलण्याचें कारण हेंच कीं, या बाबींत तुम्ही कुशल आहां. तुम्हीं चित्रकलेचा अभ्यास पुष्कळसा केला आहे. या कलेच्या अत्युच्च हेतूबद्दल आपली काय कल्पना आहे बरें ?'

**बाबूः**—मी आपणांस नवीन तें काय सांगणार ? खरें म्हणाल तर आपल्यापासूनच पुष्कळ नवीन गोष्टी मीं आज शिकलों. या कलेसंबंधीं इतकें बोधप्रद संभाषण साऱ्या जन्मांत माझ्या कानीं कधीं पडलें नव्हतें. महाराज, आपलें हें दान माझ्या हातीं वायां जाणार नाहीं असा आशीर्वाद आपण मला द्यावा.

स्वामीजी आपल्या जाग्यावरून उठले आणि इकडे तिकडे फिरतां फिरतां शिष्याला म्हणाले, 'हा मोठा बाणेदार तरुण गृहस्थ आहे.'

**शिष्यः**—महाराज, आपलें भाषण ऐकून त्याला फार नवल वाटलें.

शिष्याला कांहीं उत्तर न देतां स्वामीजी आपल्याशींच कांहीं गाणें गुणगुणूं लागले. 'अंतर्मुख मन हा परिस आहे. इच्छित वस्तु तो तुम्हांला देईल.' असा भावार्थ या गाण्यांत होता.

थोडा वेळ इकडे तिकडे फिरल्यानंतर मुखप्रक्षालन करून स्वामीजी आपल्या खोलींत परत आले. जवळच असलेला बृहत्कोश घेऊन कला या विषयावरील निबंध त्यांनीं वाचला. निबंधवाचन झाल्यावर कांहीं सामान्य गप्पागोष्टी झाल्या. बोलतां बोलतां आमच्या पूर्वबंगाल्यांतील विशिष्ट भाषापद्धतीची आणि स्वराच्या ठेवणीची नक्कल करून स्वामीजींनीं सर्वास खूब हंसविलें.

***

## [ २९ ]

### [ **स्थळः**—बेलूर मठ, १९०१ ]

पूर्वबंगाल आणि आसाम या प्रांतांतील आपला प्रवास संपवून स्वामीजी नुकतेच परत आले होते. त्यांची प्रकृति ठीकशी नसून त्यांच्या पायांना सूज आली होती. एके दिवशीं मठांत येऊन शिष्यानें स्वामीजींचें पादवंदन केलें. प्रकृति ठीक नव्हती तरी स्वामीजींच्या हास्यवदनावर तिचा कांहीं परिणाम झालेला दिसत नव्हता.

**शिष्यः**—महाराज, आपली प्रकृति कशी काय आहे ?

**स्वामीजीः**—बेट्या, प्रकृतीचें काय विचारतोस ? दिवसेंदिवस हा देह कामाला नालायक होत चालला आहे. बंगालच्या भूमींत तो जन्मास आला, त्या अर्थी कांहींना कांहीं रोगाचा हल्ला त्याजवर होत राहणारच. या प्रांतांत

सामान्यतःच माणसाची प्रकृति असावी तशी सुदृढ असत नाहीं. जिवापाड मेहनतीचीं कामें येथल्या माणसांना सोसत नाहींत. पण हा देह जो थोडाबहुत काळ राहील तेथपर्यंत तुमची सेवा तो अवश्य करील. काम करतां करतांच माझा देह पडेल.

**शिष्यः**—कांहीं काळ आपण विश्रांति घेतली तर ठीक होईल. तीमुळें आपल्या प्रकृतीला आराम वाटेल. आपला जीव जगाला हवा आहे.

**स्वामीजीः**—बेट्या, माझ्याच्यानें कधीं तरी स्वस्थ बसवेल काय ? श्री-रामकृष्णांच्या समाधिप्रवेशाच्या आधीं दोन तीन दिवस कालीमातेनें या देहांत प्रवेश केला. आतां तीच मला इकडे तिकडे नाचवीत आहे. मला क्षणभरही स्वस्थ बसूं न देतां माझ्याकडून आपलीं कामें ती करवीत आहे. या देहाच्या स्वास्थ्याकडे सुद्धां ती मला पाहूं देत नाहीं.

**शिष्यः**—महाराज, आपलें हें भाषण म्हणजे एक रूपक तर नव्हे ना ?

**स्वामीजीः**—छे, छे ! हें रूपक नव्हे. समाधीच्या आधीं दोन तीन दिवस त्यांनीं मला आपणाजवळ बोलाविलें आणि समोर बसवून मजकडे ते टक लावून पाहूं लागले. पाहतां पाहतां त्यांचा समाधि लागला. इतक्यांत माझ्या शरीरांत कांहीं अननुभूत प्रकार घडत आहे असें मला वाटलें. जणूं काय आंतून विजेचे धक्केच बसत आहेत ! थोड्या वेळानें मलाही बाह्य जग जाणवेनासें झालें आणि मी अगदीं निश्चळ झालों. या स्थितींत मी किती वेळ होतों हें कांहीं मला सांगवत नाहीं. थोड्या वेळानें मी वृत्तीवर आलों, तेव्हां श्रीरामकृष्ण माझ्या समोर असून त्यांच्या नेत्रांतून अश्रुपात होत आहे असें मला दिसलें. 'महाराज, हें काय ? ' असें मी त्यांना म्हटलें, तेव्हां त्यांनीं उत्तर दिलें, 'बाळा ! माझें सर्वस्व तुझ्या स्वाधीन करून मी आज भिकारी झालों आहें. आतां जें सामर्थ्य तुला प्राप्त झालें आहे, त्यानें जगदुद्धाराचें महत्कार्य तुला करावयाचें आहे. तें संपवून मग स्वधामीं तूं परत जाशील. ' त्या वेळीं माझ्या देहांत भरलेली शक्ति अद्यापिही मला कामाला लावीत आहे हें मला स्पष्ट कळतें. हा देह स्वस्थ बसण्यासाठीं नाहीं. आज हें काम तर उद्यां तें, असेंच अखेरपर्यंत चालावयाचें आहे.

स्वामीजींचें हें भाषण ऐकून शिष्य आश्चर्यचकित होऊन स्तब्ध राहिला. स्वामीजींच्या या शब्दांवर सामान्य लोक कितपत विश्वास ठेवतील याची शंका त्याला आली. अखेरीस हा विषय बदलण्याच्या हेतूनें तो म्हणाला, 'महाराज, आमचा पूर्वबंगाल आपल्याला कसा काय वाटला ?'

**स्वामीजीः**—एकंदरीनें तो देश मला फार आवडला. तेथलीं जोमदार शेतें, सुंदर हवापाणी आणि डोंगराळ बाजूंतील झाडझाडोरा यांमुळें तो प्रांत निसर्गसुंदर दिसतो. ब्रह्मपुत्राचें खोरें तर इतकें सुंदर आहे कीं, त्याला कोठें तुलनाच नाहीं. आमच्या इकडील लोकांपेक्षां पूर्वबंगाली लोक अधिक काटक आणि अधिक कष्टाळू आहेत. ते मांसमच्छी अधिक खातात म्हणून कदाचित् तसें असेल. ते लोक मोठ्या चिकाटीचेही दिसतात. खाद्य पदार्थांत तेलातुपाचा उपयोग ते अधिक करतात, पण तें चांगलें नाहीं. ओशट पदार्थ अधिक खाल्ल्यानें शरीरांत चरबी मात्र वाढते.

**शिष्यः**—त्यांच्यांत धर्मबुद्धि कितपत आहे ?

**स्वामीजीः**—त्यांच्यांत कर्मठपणा अधिक आहे असें मला आढळून आलें. या कर्मकांडांतून सुटून जे लोक उदार धर्माकडे म्हणून वळले, ते वेडपे आणि आततायी बनले आहेत. एके दिवशीं एक तरुण विद्यार्थी मजकडे आला आणि एक चित्र दाखवून त्यानें मला विचारलें, 'महाराज, हा अवतार आहे काय ?' 'या बाबीची मला कांहीं माहिती नाहीं' असें उत्तर त्याला मीं दिलें. तीन चार वेळां हें मीं सांगितलें असतांही पुनःपुन्हां तोच प्रश्न तो मला करूं लागला. अखेरीस मीं त्याला म्हटलें, 'मुला, तुझा मेंदू सुकून गेल्यासारखा दिसतो. कांहीं स्निग्ध पदार्थ खात जा, म्हणजे तुझा मेंदू जरा वाढीला लागेल.' माझे हे शब्द ऐकून त्याला बरेंचसें वाईट वाटलें. पण मी तरी त्याला काय करूं ? अशा प्रकारें थोडें झणझणीत अंजन न फिरविलें तर हीं मुलें खरोखरच वेडीं होतील.

**शिष्य**—आमच्या पूर्वबंगाल्यांत अलीकडे अवतारांचें पीक पुष्कळच आलें आहे.

**स्वामीजीः**—आपल्या गुरूला कोणींही अवतारी समजावें. आपल्या गुरू-विषयीं स्वतःला आवडेल ती कल्पना करण्यास काय हरकत आहे? पण परमे-

श्वर परसांतल्या भाजीपाल्याप्रमाणें जिकडे तिकडे आणि हव्या त्या दिवसांत उगवत नसतो. एकट्या डाका शहरांत तीन चार अवतार उगवलेले मीं ऐकले.

**शिष्यः**—त्या बाजूच्या स्त्रियांची स्थिति आपणांस कशी काय दिसली?

**स्वामीजी**:—स्त्रियांच्या बाबींत म्हणशील तर सामान्यपणें जिकडे तिकडे एकच परी. डाका प्रांतांत वैष्णव पंथ बराच प्रबळ दिसतो.

**शिष्यः**—आपण नागमहाशयांच्या घरीं गेलां होतां असें ऐकलें.

**स्वामीजी**:—इतक्या दूरवर जाऊन अशा पुण्य पुरुषाच्या जन्मभूमीचें दर्शन मी घेणार नाहीं असें कसें होईल ? त्यांच्या पत्नीनें आपल्या हातानें नानाविध पक्वान्नें करून मला वाढलीं. महाशयांचें घर म्हणजे मूर्तिमंत शांतीचा निवास. गांवाजवळ एक लहानसें तळें आहे त्यांत मी खूब पोंहलों. स्नानानंतर मला अशी गाढ झोंप लागली कीं, दुपारचे अडीज वाजेपर्यंत मी जागा झालों नाहीं. जागा होऊन मी जेवावयास बसलों तेव्हां नागमहाशयांच्या पत्नीनें आग्रहानें मला खूब खाऊं घातलें. तिनें एक वस्त्रही मला दिलें. तें मीं रुमालासारखें डोक्याला गुडाळलें. नागमहाशयांची तसबीर तेथे असून तिचें पूजन होतें असें मला आढळलें. पण त्यांचें समाधिस्थान मात्र अगदीं कंगाल स्थितींत आहे. ती पवित्र भूमि याहून अधिक सुस्थितींत अवश्य असली पाहिजे.

**शिष्यः**—नागमहाशयांची खरी पारख तिकडील लोकांस मुळींच झाली नाहीं.

**स्वामीजी**:—बरोबरच आहे. लोकोत्तरांची पारख सामान्यांना कशी होणार ? महाशयांच्या सत्संगाचा लाभ ज्यांना घडला ते धन्य होत.

**शिष्यः**—कामाक्ष आपणांस कसा काय आवडला ?

**स्वामीजीः**—वा ! शिलांगच्या टेकड्या अतिशयच सुंदर आहेत. आसामचे चीफ कमिशनर सर हेनरी कॉटन हे मला तेथें भेटले. ते मला म्हणाले, ‘स्वामीजी, युरोप अमेरिकेसारखे देश पाहून आल्यावर या पहाडी मुलखांत तुम्ही काय पाहाणार ?’ हे गृहस्थ खरोखरच उदार अंतःकरणाचे आहेत. अशीं चांगलीं व दयाळू माणसें क्वचितच आढळतात. माझी प्रकृति चांगलीशी नाहीं, असें त्यांना समजतांच सिव्हिल सर्जनला पाठवून ते सकाळ संध्याकाळ

माझी चौकशी करवीत. तेथें माझीं कांहीं व्याख्यानें वगैरे झालीं नाहींत; कारण, माझी प्रकृतीच ठीक नव्हती.

**शिष्यः**—तिकडील प्रांतांतील लोकांच्या धर्मकल्पनांविषयीं आपणांस काय वाटलें ?

**स्वामीजीः**—तो मुलूख तंत्रप्रधान आहे. तेथें हंकारदेव नांवाचा कोणी मनुष्य आहे. त्याला लोक अवतारी पुरुष समजतात त्याच्या पंथाचाही प्रसार तेथें पुष्कळ झाला आहे. 'शंकराचार्य' या शब्दाचेंच रूपांतर 'हंकार' असें झालें कीं काय नकळे. तेथें तांत्रिक संन्यासीही बरेच आढळले.

**शिष्यः**—पूर्वबंगाल्यांतील लोक नागमहाशयांसंबधीं जसे अज्ञानांत राहिले, तसेच आपल्यासंबंधीही झालें आहे.

**स्वामीजीः**—माझ्या कार्याची पारख तिकडे कोणाला होवो कीं न होवो, पण तिकडचे लोक इकडच्यापेक्षां अधिक कष्टाळू आणि अधिक सामर्थ्यवान् आहेत यांत संशय नाहीं. ज्याला आपण गृहस्थी बाण्याचे संस्कार म्हणतों, त्यांचा प्रसार तिकडे अद्यापि तितकासा झालेला नाहीं. तथापि हे नवे संस्कार हळूहळू तिकडे पसरत आहेत. कोठेंही झालें तरी असेंच होतें. सभ्यतेचे प्रकार आधीं शहरांत निर्माण होतात, आणि मग ते खेडोपाडीं पसरतात. शहरांतले शिष्ट खेड्यापाड्यांत गेले म्हणजे हे प्रकार ते आपल्याबरोबर नेतात. पूर्वबंगाल्यांतही हेंच होत आहे. पूर्वबंगाल कितीही मागसलेला असला तरी ज्या भूमीच्या उदरीं नागमहाशयांसारखा महात्मा जन्म घेतो, तिचें भविष्य निराशाजनक असणें शक्य नाहीं. एकट्या नागमहाशयांच्या प्रभेनें पूर्वबगाल उज्ज्वल झाला आहे.

**शिष्यः**—पण महाराज, त्यांचें महत्व तिकडे कोणालाच कळलें नाहीं. दुसरें असें कीं, ते स्वतःही अज्ञानाच्या पांघरुणांत लपून बसत.

**स्वामीजीः**—माझ्या खाण्यापिण्याबद्दल तिकडील लोक पुष्कळ चर्चा करीत. 'अमक्या तमक्याच्या हातून अथवा असलें तसलें अन्न हा कां खातो' असे प्रश्न परस्परांस विचारून त्यांवर मोठीं रणें माजत. मीं त्यांना म्हटलें, 'मी बोलूनचालून संन्याशी, दारोदार भीक मागून मी पोट भरतों. मग अन्न-पाण्याचे निर्बंध इतक्या कडक शिस्तीनें पाळण्याची मला काय जरूर आहे ? **चरेन्माधुकरीं वृत्तिमपि म्लेच्छकुलादपि ।** माधुकरी वृत्ति अवलंबून म्लेच्छां-

पासूनही अन्न घ्यावें, ही तुमच्या धर्मग्रंथांची आज्ञा नाहीं काय ?' तथापि आरंभीं तरी युक्त बाह्याचार अवश्य आहे. सत्यानुभव होण्याला बाह्याचरणाच्या मदतीचीही अपेक्षा असते. तथापि मनुष्याचें अंतर्गत शील स्पष्ट निदर्शनास आणावें हें बाह्याचारांचें कार्य आहे. नाहीं तर ते नुसते जड होऊन उलट बंधनरूप होतात. यंदांच्या सालीं इतका पाऊस पडेल असे भविष्य पंचांगांत असल्याचें श्रीरामकृष्णांना कोणीं सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, 'तें पंचांग पीळ पाहू.' पंचांग पिळून पाण्याचा थेंबही त्यांतून निघणें अर्थातच शक्य नव्हतें. आपल्या ठिकाणी असें जडत्व असूं नये. मनुष्यांतील अंतर्गत चैतन्य जागृत करणें हेंच सर्व धर्मग्रंथांचें साध्य आहे. आपला खरा अधिकार मनुष्य प्राणी विसरला आहे. त्याची त्याला आठवण करून देण्याकरितां अनेक साधनांची योजना धर्मग्रंथांनीं केली आहे. विधिनिषेधबंधनें हीं याच साध्याचीं साधनें आहेत. पण साध्य विसरून नुसत्या साधनांबद्दलच तुम्हीं रणें माजवूं लागलांत तर त्याचा काय उपयोग ? साऱ्या जगांत मला हाच प्रकार आढळला. साध्याचा पत्ता नसतां नुसत्या साधनांविषयीच लोक लढाया करीत रहातात. 'मुख्य तत्व विसरू नका' या तत्वाचा वस्तुपाठ शिकविण्याकरितांच श्रीरामकृष्ण अवतरले.

आत्मानुभव ही एकच मुख्य मुद्याची गोष्ट आहे. हजारों वर्षें गंगास्नानें झालीं आणि हजारों वर्षें युक्तभोजन झालें तरी तेवढ्यामुळेंच मुक्तीच्या मार्गांत एक पाऊलही पुढें पडावयाचें नाहीं. या साधनांनीं आपल्या मार्गावर आपणांस मदत न केली तर तीं सारीं व्यर्थ होत. उलटपक्षीं, कोणत्याही विधिनिषेधाची क्षिति न बाळगतां आत्मज्ञानाची प्राप्ति कोणाला होत असेल, तर विधिनिषेध बाजूला सारणें हेंच त्याच्या दृष्टीनें योग्य ठरेल. तथापि आत्मज्ञानानंतरही लोकसंग्रहाकरितां थोडेबहुत विधिनिषेध ज्ञान्यानें पाळणें योग्य आहे. मुख्य मुद्दा आत्मसंयम करणें हा आहे. मनाच्या साऱ्या शक्ति कोणत्या तरी एका वस्तूच्या ठिकाणीं एकवटण्यास आपण शिकलें पाहिजे. अशा रीतीनें मन एकवटल्यामुळें त्याच्या मनःपूत येरझारा बंद होतात. त्याचा प्रवाह एकाच दिशेनें वाहूं लागतो. इतकी सिद्धी झाल्यानंतर त्याला आत्माभिमुख करणें अवश्य आहे; पण पुष्कळांची फसगत येथेंच होते. मनाच्या एकवटलेल्या सामर्थ्याला योग्य मार्गाला लावण्याऐवजीं बाह्य अवडंबरांतच ते गुरफ-

टून बसतात. मग विधिनिषेधाचा विचार करीत बसण्यांतच आयुष्याचे सारे दिवस फुकट जाऊं लागतात. अशा स्थितींत जीवात्म्यावरील अज्ञानपटल कसें दूर व्हावें? आत्मानुभवाच्या मार्गात एक एक पाऊल पुढें टाकीत असतां विधिनिषेधांतून एक एक पाऊल सोडवीत राहिलें पाहिजे. '**निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः**' हें आचार्यांचें वचन या बाबींत आपणांस मार्गदर्शक आहे. त्रिगुणातीत होणें हा मुख्य मुद्दा आहे. हेंच आपलें अखेरचें साध्य आहे. नाना धर्म आणि पोट धर्म म्हणजे या साध्याची साधनें होत. आपल्या मार्गात आपण पुढें किती सरकलों याचा अदमास त्यागाच्या कसोटीवर लागतो. ज्या प्रमाणानें त्यागबुद्धीची वाढ आपल्या ठिकाणी झाली असेल, त्या प्रमाणानें आपलें पाऊल पुढें पडलें आहे असे समजावें. कनककामिनीचा लोभ जेथे पुष्कळ अंशीं कमी झाला असेल, तेथे अंतर्गत जागृति होत आहे असें निःसंशय समजावें. त्याचा आत्मज्ञानाचा मार्ग मोकळा होऊं लागला आहे. उलटपक्षीं, यच्चयावत् विधिनिषेधांचें पालन कडक रीतीनें होत आहे, पण त्यागाची बुद्धि नाहीं, तेथें सर्व आयुष्याचा घात होत आहे असें समजण्यास हरकत नाहीं. तू आत्मानुभवाच्या मागें लाग. पुष्कळ धर्मग्रंथ तूं पढला आहेस, पण इतक्या पाठांतराचा उपयोग आजवर कितपत झाला सांग बरें? पैशाच्या मागें लागून कांहीं लोक श्रीमंत होऊन बसतात, तसेच पाठांतराच्या मागें लागून तूं पडित होऊन बसला आहेस. दोघेही सारखेच मूर्ख. कारण पैसा आणि विद्या या दोन्हीही शृंखलाच होत. पण तू विद्या आणि अविद्या या दोहोंच्याही पलीकडे जा. कारण, विद्या म्हणजे सापेक्ष ज्ञान आणि अविद्या म्हणजे अज्ञान. म्हणून दोन्हीही सारखींच त्याज्य.

**शिष्यः**—महाराज, आपल्या कृपेनें या सर्व गोष्टी मला समजल्या; पण माझ्या पूर्वार्जित कर्मांमुळें त्या मला उमजत नाहींत. त्या चित्तांत मुरून व्यवहारांत उतरत नाहींत.

**स्वामीजीः**—आतां हें कर्मबिर्म सगळें झुगारून दिलें पाहिजे. तुझ्या पूर्वकर्मानें हा देह तुला प्राप्त झाला आहे हें जर खरें, तर चालू सत्कर्मानें पूर्वकर्मांचे दुष्परिणाम नाहींसे करून याच देहांत तुला जीवन्मुक्त कां होतां येऊ नये? आत्मज्ञान ही आपल्या हातची वस्तु आहे हें आपण विसरूं नये. सद्वस्तूच्या ज्ञानाशीं कर्मांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. जीवन्मुक्त झाल्यानंतर जे कोणी

कर्में करितात, त्यांत परहिताशिवाय दुसरा हेतु नसतो. कर्मफलाची अपेक्षा ते करीत नाहींत. त्यांच्या मनांत आशेच्या बीजाला थारा मिळत नाहीं, आणि खरें पाहतां अशा रीतीनें केवळ जगाच्या हितासाठीं निष्काम कर्म करणें ही गोष्ट संसाऱ्याला जवळ जवळ अशक्यच आहे. सारीं पुराणें धुंडाळून पाहतां असें उदाहरण एकट्या जनकाचेंच मात्र आढळतें. आपणही जनकच बनूं, असें अलीकडे पुष्कळांस वाटतें. पण तुमचा जनकपणा दरवर्षी पाळणा हालविण्यापलीकडे जात नाहीं; आणि त्या बिचाऱ्या प्राचीन जनकाला देहाची शुद्धीही नव्हती.

**शिष्यः**—महाराज, याच आयुष्यांत मला आत्मलाभ व्हावा अशी माझी फार इच्छा आहे. पण हें आपल्या आशीर्वादाशिवाय घडावयाचें नाहीं.

**स्वामीजीः**—तुला इतकी भीति कशाची वाटते ? आत्मलाभाची खरी तळमळ तुला लागली असेल, तर मी तुला निश्चयानें सांगतो की, याच जन्मांत तुला तो घडेल. पण हें घडण्यास निधड्या छातीचा प्रयत्न हा पाहिजेच. कांहीं झालें तरी मी आत्मज्ञानी होईन, कितीही अडथळे आले तरी ते उल्लंघून मी पलीकडे जाईनच जाईन, हा पुरुषार्थ चित्तांत दृढ असला पाहिजे. ज्याच्याजवळ इतका निश्चय असेल त्याला पुरुषकार म्हणावें. घरदार गेलें, आप्तेष्टांनीं सोडलें आणि बायकापोरें मेली तरी मी मागे वळून पाहणार नाहीं, असा बुद्धीचा निश्चय पाहिजे. फार काय, पण देह जाण्याची वेळ आली तरी तेव्हांही आत्मलाभाचेंच चिंतन असलें पाहिजे. अशा रीतीनें चालणें ह्यालाच पुरुषार्थाचा प्रयत्न म्हणतात. अरे, देह सुस्थितीत राखण्यासाठी पशुपक्षीसुद्धां धडपडत असतात; मग मनुष्यानें त्याचेच अनुकरण करावें हें युक्त आहे काय ? छे, छे, मनुष्यदेहाचा हेतु हा नाहीं. केवळ आत्मलाभ हाच त्याचा अंतिम उद्देश आहे. संसारसागराच्या ओघाबरोबर सामान्य जन वाहात असतात. एखाद्या लाटेबरोबर वर उठावे आणि खाड्याबरोबर खालीं जावें, हा त्यांचा क्रम अखंड चालू आहे. तूंही याच लोकांसारखें वागूं लागलास तर तुझा पुरुषार्थ तो कोठें राहिला ? हे पामर जन मृत्यूच्या मुखाकडे धांवत आहेत. पण तुझा अवतार मृत्यूला मारण्यासाठीं आहे. याकरितां तूं वीरासारखा पुढें चालत जा. कोणत्याही अडथळ्याला भिऊन तूं मागे सरू नको. या देहांत प्राप्त होणारीं सुखदुःखें अशीं कितीशीं टिकणार आहेत ? हा देह तरी

कितीसा वेळ जिवंत राहणार आहे ? तुला नरदेहाची जोड मिळाली आहे तिचा उपयोग करून तूं आत्मज्ञानी हो. मी निर्भय आहें असें तुला म्हणतां आलें पाहिजे. माझा जीवात्मा परमात्मरूप झाला असें म्हणण्याची पात्रता तूं आपल्या अंगीं आण आणि मग देह असेपर्यंत संसारांत वावरून सर्वांना हाच उपदेश कर. ‘**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।**’ हा संदेश सर्वांना पोहोंचव. हें तुला करतां आलें तरच तुला मी खरा पूर्वबंगाली म्हणेन.

***

## [ ३० ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, १९०१ ]

शिलाँगच्या डोंगराळ मुलखांतून परत आल्यापासून स्वामीजींची प्रकृति असावी तशी नव्हती. त्यांच्या पायांना सूज आली होती. यामुळें त्यांचे गुरु-बंधु फार काळजींत होते. कोणा कविराजाचें औषध घ्यावें असा आग्रह स्वामी निरंजनानंद यांनीं केला. अखेरीस तसें करण्यास स्वामीजी कबूल झाले. पाणी प्यावयाचें नाहीं आणि मीठ खावयाचें नाही असें पथ्य करण्याचें त्यांनीं कबूल केल्यावरून वैद्याचें औषध मंगळवारपासून सुरू व्हावयाचें होतें. आज रविवार-आज उष्मा भयंकर होत होता. तेव्हां शिष्य स्वामीजींना म्हणाला, ‘उष्मा मनस्वी होतो, आणि आपणांस पाणी तर वारंवार प्यावें लागतें; मग पाणी न पिण्याचें हें पथ्य कसें निभणार ?’

**स्वामीजीः**—अरे, रोज सकाळीं उठल्याबरोबर सुप्रभातींच मी निश्चय करीन आणि औषध घेईन. मग मी पाणी मुळींच पिणार नाहीं. बुद्धीचा दृढ निश्चय झाला म्हणजे पाण्याचा थेंबसुद्धां या घशाच्या खालीं उतरावयाचा नाहीं. हें औषध तीन सप्तके चालावयाचें आहे. तेवढ्या अवधींत या घशाखालीं उतरण्याचें सामर्थ्य पाण्याला असणार नाहीं. देह म्हणजे मनाचें नुसतें पांघरूण. मन ठेवील तसें त्यानें राहिलें पाहिजे. जो हुकूम तें देईल त्याची अम्मलबजा-वणी त्यानें केली पाहिजे. मग आतां तुझ्या भीतीचें कारण कोठें उरलें ? निरं-जनाचा आग्रह मोडावयाचा नाहीं म्हणूनच या चिकित्सेला मी कबूल झालों. गुरुबंधूंची विनंति फेटाळून लावणें मला शक्य आहे काय ? तूंच सांग बरें ?

आतां दहा वाजण्याचा सुमार झाला होता. स्त्रियांकरितां मठ स्थापण्याचा विचार स्वामीजींच्या डोक्यांत घोळत होता. त्याच विषयावर ते आतां बोलूं लागले. पवित्र जगन्मातेचें नांव घेऊन या कार्याला आपण आरंभ करूं या. गंगेच्या पूर्वतीरावर आपण मठ बांधूं. या मठांत जसे ब्रह्मचारी आणि संन्यासी तयार व्हावयाचे तशाच ब्रह्मचारिणी आणि साध्वी तयार करावयाच्या.

**शिष्यः**—महाराज, आपल्या इकडे स्त्रियांकरितां मठ असल्याचा उल्लेख ग्रंथांतरी कोठें आढळत नाहीं. बौद्धकालीं मात्र असे मठ होते. पण कालांतरानें हेच मठ दुष्कृत्यांचें माहेरघर होऊन बसले. या दुष्कर्माचा धुमाकूळ पुढें साऱ्या देशभर सुरू झाला.

**स्वामीजीः**—आपल्या देशांत स्त्री आणि पुरुष यांच्या बाबतींत इतका भेद कां केला जातो, हें समजणें खरोखर दुरापास्त आहे. सर्वांतर्यामीं एकच तत्त्व आहे, हें वेदान्ताचें तत्त्व येथें लटपटतें. बघावें तेव्हां बायकांवर हत्यार उचलण्यास तुम्ही तयार. पण तुम्हीं तरी असे काय शतक्रतु केले आहेत? स्त्रियांच्या उन्नतीसाठी तुम्ही तरी काय केलें आहे? स्मृती लिहून नाना नियमांचीं जोखडें त्यांच्या गळयांत तुम्हीं अडकवलीं. तुम्ही त्यांना नुसतीं प्रजोत्पादक यंत्रें बनविलीं आहेत. या जगन्मातांचा उद्धार तुम्ही न कराल, तर तुमच्या उन्नतीलाही दुसरा मार्ग नाहीं.

**शिष्यः**—स्त्रिया म्हणजे शृंखला, तीं पुरुषांना बांधणारीं जाळीं; आपल्या मायावीपणानें त्या ज्ञान झांकून टाकतात. यामुळेंच भक्ति आणि ज्ञान हे मार्ग स्त्रियांसाठी नव्हत, असें शास्त्रांनीं म्हटलें असावें.

**स्वामीजीः**—असें विधान तुला कोणत्या शास्त्रांत आढळलें? भरतभूमीला अवनतावस्था आली, तेव्हां भिक्षुकांनीं इतर ज्ञातींना ज्ञान जसें पारखें करून ठेविलें, तसेच स्त्रियांचेही सारे हक्क हिरावून घेतले. उपनिषत्कालीं गार्गी, मैत्रेयी-सारख्या स्त्रिया ऋषिजनांबरोबर ब्रह्मचर्चा करतांना आढळतात. हजारों वेदज्ञ ब्राह्मणांसमक्ष गार्गीनें याज्ञवल्क्याबरोबर वादविवाद केला. तिच्या चर्चेचा विषय ब्रह्म हाच होता. कांहीं मोजक्या स्त्रियांना ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेण्याचा जर अधिकार असेल तर तो साऱ्यांनाच कां असूं नये? तसेंच प्राचीन काळीं जर असा अधिकार होता, तर तो आतां कां असूं नये? जी गोष्ट पूर्वी घडून गेली

-ती आतां पुन्हां घडण्यास काय प्रत्यवाय आहे ? इतिहासाची पुनरावृत्ति होत असते. स्त्रियांचा योग्य संमान राखूनच इतर राष्ट्रें आज महत्त्वास चढलीं आहेत. जेथें स्त्रियांबद्दल कसलाही आदर नाहीं, अशीं राष्ट्रें पूर्वी कधीं मोठेपणास चढलीं नाहींत आणि पुढेंही चढावयाचीं नाहींत. विश्वशक्तीच्या या जिवंत प्रतिमेबद्दल यत्किंचितही आदर तुम्ही बाळगीत नाहीं हेंच तुमच्या अवनतीचें मोठें कारण आहे. '**यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः**' असें मनुवचन आहे. जेथें स्त्रिया कष्टांत राहातात आणि जेथें त्यांची योग्य चहा होत नाहीं, तेथें त्या कुटुंबाला अथवा देशाला डोकें वर काढण्याची आशा नाहीं. यासाठींच स्त्रियांची स्थिति आधीं सुधारली पाहिजे; आणि यासाठींच एक नमुनेदार मठ स्थापण्याचा विचार आम्हीं केला आहे.

**शिष्यः**—महाराज, पश्चिमेकडील आपला प्रवास संपवून आपण प्रथमच येथें पाऊल ठेवलें तेव्हां स्टार नाटकगृहांत आपलें एक व्याख्यान झालें. त्या प्रसंगीं तंत्रमार्गावर आपण यथेष्ट कडाका उडविला होता. तंत्रमार्गात स्त्रीपूजन प्रधान आहे. आतां हेंच पूजन आधीं पाहिजे असें जर आपण म्हणूं लागलां तर आपण आपलेंच मत खोडून टाकल्यासारखें होत नाहीं काय ?

**स्वामीजीः**—तंत्रग्रंथांत जे वामाचार अर्वाचीन काळीं शिरले आहेत त्यांजवरच माझा कटाक्ष होता. मातृपूजेबद्दल वाईट असें मीं कांहींच बोललों नाहीं. फार काय, पण खऱ्या वामाचाराविरुद्धही मी कांहीं बोलत नाहीं. विश्वशक्ति या भावनेनें स्त्रियांचें पूजन करणें हें तंत्रमार्गाचें रहस्य आहे. बौद्धकालीं धर्मग्लानि होऊं लागली तेव्हां वामाचारांनाही दुष्ट रूप प्राप्त होऊं लागलें आणि तें स्वरूप आजतागायत कायम राहिलें आहे. सगळ्या तंत्रग्रंथावर या दुष्टत्वाची छाया पसरली आहे. हे दुष्ट आचार मी त्याज्य मानतों. माझा अट्टाहास त्यांजविरुद्धच होता आणि आहेही. विश्वमातेचीं जिवंत रूपें या दृष्टीनें केलेलें स्त्रीपूजन मीं केव्हांही अमान्य म्हटलें नाहीं. विश्वशक्तीचें बाह्य रूप इंद्रियांचें आकलन करून त्यांना मोह घालतें. इंद्रियांमागें लागून पुरुष वेडा होतो. पण याच विश्वशक्तीचें अंतर्गत रूप ज्ञान, भक्ति, विवेक आणि असंग असें आहे. या अंतर्गत रूपाच्या पूजनानें पुरुष सर्वद्रष्टा, सर्वशक्तिमान् आणि ब्रह्मज्ञ होतो. '**सैषा प्रसन्ना वरदा नृणां भवति मुक्तये ।**' आदिमायेचें पूजन करून तिला नमन केल्यावांचून ब्रह्मा आणि विष्णु यांनाही तिच्या तडाक्यांतून सुटतां येत

नाहीं आणि मुक्ति मिळवितां येत नाहीं. यासाठींच या गृहदेवतांचें पूजन अवश्य आहे. त्यावांचून अंतर्गत ब्रह्म स्पष्टत्वास येणार नाहीं. हें पूजन कसें करावें हें दाखविण्यासाठींच मला मठस्थापना करावयाची आहे.

**शिष्यः**—आपली कल्पना कदाचित् चांगली असेल, पण मठांत कायमच्या राहण्यासारख्या स्त्रिया आपणांस कोठून मिळणार ? सध्यांच्या कडक समाज-निर्बंधांत तुमच्या मठांत आपल्या बायका कोण पाठवील ?

**स्वामीजीः**—कां बरें ? श्रीरामकृष्णांच्या शिष्यस्त्रिया आजही आहेत. त्यांच्या मदतीनें हा मठ मी सुरू करीन. जगन्मातेचें पूजन तेथें होईल. या भक्तमंडळीच्याच सुनालेंकी तेथें राहावयास येतील. अशा मठाचें महत्त्व त्यांना सर्वांच्या आधीं पटेल. मग त्यांचें उदाहरण पाहून पुष्कळ संसारी गृहस्थ या कार्यांत आम्हांस मदत करण्यास तयार होतील.

**शिष्यः**—श्रीरामकृष्णांच्या शिष्यिणी मठांत येतील हें खरें; पण इतर लोक या कामांत कांहीं मदत करतील असें मला वाटत नाहीं.

**स्वामीजीः**—त्यागावांचून जगांतील कोणतेंही महत्कार्य मोठ्या नांव-रूपाला आलेलें नाहीं. तशांतून साऱ्या महत्कार्याचा प्रारंभ नेहमीं अल्पच असावयाचा. वटबीजाचा पहिला अंकुर पाहून हा एक अफाट वृक्ष होणार आहे असें कोण म्हणेल ? आपण अल्पस्वल्पच आरंभ करूं या. मग कालेकरून त्याचेंच स्वरूप भव्य होईल. पिढया दोन पिढयांनीं तरी त्याची खरी किंमत लोक करतील. ही संस्था उदयास आणण्यासाठीं माझ्या शिष्यिणींना जीव गहाण टाकावा लागेल. भीति झुगारून देऊन त्यांना पुढें सरावें लागेल. या उदार कार्यांत तुझ्यासारख्यांनींही मदतीला पुढें झालें पाहिजे. आपल्या कार्याचें उच्च ध्येय तुझ्यासारख्यांनीं लोकांस पटविलें पाहिजे. कालांतरानें आपलें कार्य सारा देश उज्ज्वल करीत आहे असें तुझें तुलाच आढळून येईल.

**शिष्यः**—महाराज, आपल्या या मठाच्या योजनेचें सविस्तर वर्णन सांगाल तर मोठी कृपा होईल.

**स्वामीजीः**—गंगेच्या पलीकडच्या तीरावर एक मोठी जमीन विकत घेऊन तेथें मठ बांधावयाचा. ब्रह्मचारिणी म्हणजे कुमारिका आणि विधवा यांनीं तेथें राहावें. त्याचप्रमाणें सच्छील आणि सद्भक्त विवाहित स्त्रियांनाही तेथें येऊन

सहाण्यास हरकत नाहीं. या मठाशीं पुरुषांचा कांहीं संबंध असावयाचा नाहीं. आपल्या या मठांतील कोणी वृद्ध संन्यासी त्या मठाची व्यवस्था पाहतील; पण तीही दुरून दुरूनच. या मठाला जोडून एक मुलींची शाळा सुरू होईल. त्यांत धर्मग्रंथ, इतर साहित्य, संस्कृत आणि व्याकरण हे विषय शिकविण्यांत येतील. थोडेंबहुत इंग्रजी भाषेचें ज्ञानही करून देण्यांत येईल. त्याचप्रमाणें शिवणटिपण, स्वयंपाक, बालसंगोपन इत्यादि गृहकृत्येंही तेथें शिकविलीं जातील. जप, पूजा, आणि ध्यान हीं शिक्षणक्रमांत अवश्य मांडलीं जातील. सर्वसंगपरित्याग करून ज्या स्त्रिया तेथें कायमच्या राहतील त्यांच्या अन्नवस्त्राची तजवीज मठांतून होईल; आणि घरदार संभाळून ज्यांना शिक्षण घ्यावयाचें असेल, त्यांना दिवसाच्या शाळेंत घेण्यांत येईल. मठपतीच्या संमतीनें अशा घरभारी स्त्रियांना कधीं मधीं मठांतही राहतां येईल. त्या वेळचा त्यांचा खर्च मठांतून होईल. वृद्ध ब्रह्मचारिणींनीं तरुण मुलींना ब्रह्मचर्याचें शिक्षण द्यावें. अशा रीतीनें येथें पांच सहा वर्षें शिक्षण घेतल्यानंतर पालकांनीं वाटल्यास आपल्या मुलींचीं लग्नें करावीं. तथापि लग्न न करितां योगिनी व्हावें अशी कोणाची दृढ श्रद्धा झाली तर नैष्ठिक ब्रह्मचर्याची शपथ घेऊन त्यांना तेथें राहतां येईल. या ब्रह्मचारिणीच पुढें मठाच्या प्रचारिणी व्हावयाच्या आहेत. गांवोगांवीं आणि खेडोपाडीं हिंडून स्त्रीशिक्षणाचा प्रसार करण्याचा यत्न त्या करितील. अशा प्रकारच्या खऱ्या दानतीच्या स्त्रियांनीं स्त्रीशिक्षण हातीं घेतलें तरच खऱ्या शिक्षणाचा प्रसार होईल. मठांतील शिक्षणक्रम चालू आहे तोंवर प्रत्येक विद्यार्थिनीनें ब्रह्मचर्य पाळलेंच पाहिजे.

धार्मिक जीवन, स्वार्थत्याग आणि आत्मसंयमन या तीन गोष्टींचें पालन या मठांतील विद्यार्थिनींनीं अवश्य केलें पाहिजे. या मठांतील शिक्षणाचा विशेष हाच होय. त्याचप्रमाणें सेवाधर्माची शपथही त्यांनीं घेतली पाहिजे. सेवाधर्म त्यांनीं जन्मभर पाळला पाहिजे. अशा प्रकारें त्यांचा नमुनेदार आयुःक्रम सुरू झाला तर त्यांच्याबद्दल आदर कसा उत्पन्न होणार नाहीं ? त्यांच्या ठिकाणीं लोकांची श्रद्धा कां जडणार नाहीं ? आपल्या देशांतील स्त्रियांचें चारित्र्य अशा प्रकारें बनवितां आलें तरच सीता, सावित्री, गार्गी यांच्यासारख्या नमुनेदार स्त्रिया येथें पुन्हां निर्माण होऊं लागतील. हल्लीं प्रत्येक गांवचा धर्म वेगळा अशी स्थिति झाली आहे. गांवाच्या वेशीच्या आंत चालू असलेल्या चालीरीती तोच धर्म.

अशा रीतीनें त्या चालीरीतींत जखडून गेल्यामुळें आमच्या स्त्रियांचें जीवित किती दुर्दशेला पोंचलें आहे पहा! त्यांच्या ठिकाणीं खरोखर जिवंतपणाच नाहीं. लाकडाच्या ठोकळ्यानें प्रवाहाबरोबर वहावत जावें, त्याप्रमाणें त्यांचा जीवनक्रम चालू असतो. त्यांच्या स्थितीचा खरा भेसूरपणा पाश्चात्य देशांत प्रवास केल्यानंतर चांगला पटतो. या परिस्थितीची सारी जबाबदारी तुमच्याच शिरावर आहे; आणि यासाठीं त्यांना उन्नतीला लावण्याचें कामही तुम्हांलाच करणें अवश्य आहे; यासाठींच आतां कांहीं तरी कामाला लागा अशी ओरड मी करीत असतों. नुसतीं उपनिषदें तोंडपाठ केल्यानें काय होणार आहे?

**शिष्यः**—महाराज, येथला शिक्षणक्रम संपल्यानंतर विद्यार्थिनींनीं लग्न केलें आणि त्या एकदां संसारांत पडल्या म्हणजे आपण म्हणतां त्या रीतीच्या नमुनेदार स्त्रिया कशा उत्पन्न व्हावयाच्या? यापेक्षां नैष्ठिक ब्रह्मचर्याची शपथ घेणाऱ्या विद्यार्थिनींसच मठांत घ्यावें असा नियम करणें चांगलें नाहीं काय?

**स्वामीजीः**—पण या गोष्टी एकदम कशा व्हाव्या? आधीं त्यांना शिक्षण तर मिळू द्या; मग पुढचा विचार त्यांचा त्यांजवर सोंपविणें अधिक बरें. येथें शिक्षण घेऊन ज्या स्त्रिया संसारांत पडतील त्या आपल्या पतींना आणि पुत्रांना उच्च ध्येयें निदान समजावून तरी सांगतील. आतां येथें येणाऱ्या मुलींचा विवाह किमान पक्ष पंधराव्या वर्षाच्या आंत पालकांनीं करूं नये, इतका नियम पाहिजे.

**शिष्यः**—महाराज, पण अशा मुलींचीं लग्नें होणेंसुद्धां दुरापास्त होईल. समाजांत त्यांच्याबद्दल आदर वाटणार नाहीं. अशा घोडनवऱ्यांशीं लग्न करण्यास कोण तयार होणार?

**स्वामीजीः**—असें कां म्हणतोस? समाजाचा विचारप्रवाह कोणत्या दिशेनें वहात आहे, याची तुला परीक्षा नाहीं. अशा प्रकारच्या सुशिक्षित मुलींना नवऱ्या मुलांचा तोटा पडणार नाहीं. बालविवाह आतां मागें पडत आहे. त्यासंबंधींच्या शास्त्रांच्या आज्ञांची पर्वा लोक आतां करीत नाहींत आणि पुढेंही करणार नाहींत.

**शिष्यः**—पण आरंभीं तरी आपल्याला जबर अडथळे येतील.

**स्वामीजीः**—कांहीं हरकत नाहीं. अडथळे आले तर त्यांत भिण्यासारखें काय आहे? कोणत्याहि सत्कार्यांत खरोखर सद्बुद्धीनें कोणीं अडथळे आणिले

तर त्यांजमुळें कार्याची हानी होत नाहीं. उलट अडथळे आणणारांच्या विचाराला चालन मिळतें. जेथें मुळींच अडथळा नाहीं, तो समाज मृत्पिंडच समजला पाहिजे. आपल्या कार्याबद्दल कोणताच बरा वाईट विचार कोणीं प्रदर्शित न केला तर आपली विचारशक्तिसुद्धां मृत्यूच्या पंथाला लागते.

परब्रह्म स्वरूपांत लिंगभेदाला अवकाश नाहीं. हे सारे भेद लौकिक रूपांत मात्र आहेत. सृष्टीची मर्यादा सोडून आपलें मन जों जों अंतर्मुख होत जातें तों तों ही भेदकल्पना मावळत जाते आणि अखेरीस ही स्त्री अथवा हा पुरुष असा भेद मुळींच प्रतीत होत नाहीं. श्रीरामकृष्णांची अशी स्थिति आम्हीं आमच्या डोळ्यांनीं पाहिली आहे. स्त्री आणि पुरुष हा भेद बाह्यतः दिसत असला तरी वस्तुतः स्त्री-पुरुष हा भेद प्रकृतीच्या ठिकाणीं नाहीं. ब्रह्मपदाची प्राप्ती जर पुरुषाला होऊं शकते तर स्त्रीलाच कां होऊं नये? म्हणूनच मीं म्हणतों कीं, एक स्त्री ब्रह्मनिष्ठ झाली तरी आपल्या तेजानें हजारों स्त्रियांस ती जागृती आणील; आणि यामुळें समाजाची आणि देशाची उन्नति एकांशानें तरी अधिक होईल. तुझ्या ध्यानांत आलें ना?

**शिष्यः**—महाराज, आपल्या प्रसादानें माझी दृष्टि आज उघडली.

**स्वामीजीः**—अजून पुरतीशी उघडली नाहीं. आत्मानुभवानंतर भेदबुद्धि जाईल तेव्हांच तुझी दृष्टि खरोखर उघडेल; तेव्हांच स्त्रियासुद्धां ब्रह्माचीं व्यक्तरूपें आहेत अशी प्रतीति तुला येईल. श्रीरामकृष्णांना प्रत्येक स्त्री जगन्मातेची प्रतिमा दिसे. ती कोणत्याही जातीची अथवा धर्माची असली, ती अगदीं अक्षरशत्रु अडाणी असली तरी त्यांची भावना एकच. या गोष्टी माझ्या डोळ्यांनीं मीं पाहिल्या असल्यामुळें त्यांच्या मार्गानें जाऊन तशीच एकरूपता पाहण्याचा इतका आग्रह मी तुम्हांला करितों. कसलाही भेद मनांत न आणतां खेडोपाडीं व गांवोगांवीं हिंडून मुलांमुलींना तुम्ही शिक्षण द्या. स्त्रियांची उन्नति तुम्हांस करतां आली तर त्यांचीं मुलें आपल्या कृतीनें आपल्या मातृभूमीचें तोंड उजळ करतील. मगच खरी संस्कृति, ज्ञान, सामर्थ्य आणि भक्ति यांचा उदय येथें होईल.

**शिष्यः**—पण महाराज, सध्यांच्या स्त्रीशिक्षणाचे परिणाम तर याच्या अगदीं उलट झालेले दिसतात. 'ट फ' करावयास येतांच आमच्या बायका आधीं

पाश्चात्यांचें अनुकरण करण्यास शिकतात. त्यांच्या ठिकाणीं त्यागबुद्धि, आत्मसंयम, ब्रह्मचर्य आणि कडक शिस्त यांचा उदय कितपत झालेला असतो देव जाणे.

**स्वामीजीः**—अरे, आरंभीं अशा चुका व्हावयाच्याच. कोणत्याही नव्या कल्पनेचा उदय झाला म्हणजे सामान्य जनतेला तिचें आकलन सामर्थ्येंकरून होत नाहीं; ती त्यांना पचत नाहीं. यामुळें कांहीं लोक भलत्या मार्गानें जाऊं लागतात. तथापि त्यामुळें मूळ कल्पना दोषार्ह समजण्याचें कारण नाहीं. कांहीं व्यक्तींच्या मूर्खपणामुळें एकंदर जनसमूहाचें अकल्याण होतें असें नाहीं. स्त्रीशिक्षणाचा अल्पसा आरंभ या देशांत ज्यांनीं केला, ते अंतःकरणानें खरोखर उदार होते. पण ज्या शिक्षणाची इमारत धर्माच्या पायावर उभारलेली नाहीं, तिच्या बांधणींत कोठें तरी चुका शिराव्या आणि दोष राहावे हें युक्तच आहे; पण ही दिशा आतां बदलली पाहिजे. धर्मज्ञान हा ज्याचा मूळ पाया असा शिक्षणक्रम आपण आतां आंखला पाहिजे. धर्मज्ञान आधीं आणि मग बाकीच्या गोष्टी. धर्मतत्त्वांचें शिक्षण आणि शील यांजकडे प्रथम लक्ष दिलें पाहिजे. त्याचप्रमाणें ब्रह्मचर्याचें महत्वही शिष्यांच्या ध्यानीं आणून दिलें पाहिजे. आमच्या सध्यांच्या स्त्रीशिक्षणक्रमांत धर्मज्ञान ही दुय्यम प्रतीची गोष्ट झाली आहे; यामुळेंच तूं म्हणतोस तसे दोष उत्पन्न झाले आहेत. सुशिक्षित स्त्रिया थोड्याबहुत वहावल्या तर त्याचा दोष त्यांच्याकडे नाहीं. ब्रह्मचर्य कशाशीं खातात याची कल्पनासुद्धां ज्यांना नाहीं अशा सुधारकांनीं या कार्याला आरंभ केला. मग ठेंचकळून पडण्याचे प्रसंग आले हें रीतसरच झालें. शमदमादि साधनांनीं प्रथम संपन्न होऊन मगच अशा कार्यास हात घालणें योग्य होईल. नाहीं तर महत्कार्यासमुद्धां जागोजाग ठेंचा लागावयाच्याच.

**शिष्यः**—होय, महाराज. पुष्कळ सुशिक्षित स्त्रिया कल्पितकथा वाचण्यांत नाहीं तर चकाट्या पिटण्यांत आपला वेळ फुकट घालवितांना आढळतात. पण पूर्व बंगाल्यांत सुशिक्षित स्त्रियांनींसुद्धां जुनीं धर्मकृत्यें अद्यापि सोडलेलीं नाहींत. या भागांतही तशीच स्थिति आहे काय ?

**स्वामीजीः**—जगांतल्या प्रत्येक देशांत भलीं बुरीं माणसें असावयाचींच; त्याचप्रमाणें प्रत्येक देशांतील चालीरीतींत बरेवाईटपणाची सरमिसळही असावयाचीच. आपलें आयुष्य सत्कार्यांत घालवून लोकांना उदाहरण घालून द्यावें

इतकेंच आपल्या हातीं आहे. एखाद्या कार्यांत कांहीं दोष दिसले तर त्यांजवर मुसतें शस्त्र धरल्यानें तें सुधारतें असें नाहीं. असा हल्ला केल्यानें लोक तुमच्या कार्यापासून अधिक लांब मात्र जातात. कोणीं कांहींही म्हटलें तरी त्याजबरोबर वर्दळीस यावयाचें नाहीं, असें धोरण आपण ठेवलें पाहिजे. जग हें बोलून-चालून मायाविकृत. त्यांत कोणतेंही कार्य अगदीं निर्दोष असावयाचें नाहीं. विस्तव पेटवूं घातला कीं आधीं धूर हा व्हावयाचाच. धूर होणार हें आधींच समजून मग पुढें सरणें बरें. पण धूर होणार म्हणून विस्तवच पेटवावयाचा नाहीं असें तुम्ही करणार काय? शक्य असेल तोंवर सत्कार्य करीत राहावयाचें हाच तुमचा निश्चय असावा.

**शिष्यः**—पण सत्कार्य म्हणजे तरी काय?

**स्वामीजीः**—गुप्त ब्रह्मस्वरूपाचें स्पष्टीकरण होण्यास ज्या ज्या कार्यांनें मदत होईल तें तें सत्कार्य. अगदीं सामान्य कामेंसुद्धां या दृष्टीनें करितां येण्यासारखीं आहेत. प्रत्यक्ष नाहीं तरी परंपरेनें प्रत्येक कार्याचा उपयोग आत्म्याच्या स्पष्टीकरणाकडे करितां येण्यासारखा आहे. तथापि ऋषिप्रणीत आत्मज्ञानाचा मार्ग हा सर्वांतील जवळचा मार्ग आहे. उलट पक्षीं श्रुतींनीं ज्याला अकार्य असें म्हटलें तें केल्यानें जीवात्म्याच्या शृंखला अधिक दृढ मात्र होतात; आणि कित्येक वेळां या शृंखलांच्या गांठी अशा पक्क्या होऊन बसतात कीं त्या जन्मोजन्मींही सुटत नाहींत. तथापि मुक्ति मिळविणें हा प्रत्येक जीवाचा जन्मसिद्ध हक्क आहे. तो देशकालातीत हक्क आहे. कारण मुक्ति हेंच जीवात्म्याचें वास्तविक रूप आहे. आपलें सत्य रूप कोणालाही फार दिवस लपवितां येत नाहीं. स्वतःच्या पडच्छायेबरोबर हजारों वर्षें तुम्ही लढाई केली तरी तुमच्यापासून तिला दूर करितां येईल काय?

**शिष्यः**—पण महाराज, कर्म हें ज्ञानाला विरोधी आहे असें शंकराचार्यांचें मत आहे. कर्म आणि ज्ञान यांची सांगड घालूं नये, असें त्यांनीं जागोजाग सांगितलें आहे. मग ज्ञानाला कर्म पोषक कसें होणार?

**स्वामीजीः**—एका बाजूनें असें म्हणत असतां परंपरेनें कर्म ज्ञानाला पोषक होतें असें स्वतः तेच सांगतात. सत्कर्मांनें चित्तशुद्धि होते असें आचार्यांचेंही म्हणणें आहे. आतां शुद्ध ज्ञानदशेंत कर्मांचा संपर्क लागूं शकत नाहीं हें त्यांचें म्हणणें मलाही मान्य आहे. मी अमुक काम करतों ही जाणीव जोंपर्यंत मनु-

त्याच्या ठिकाणीं आहे, तोंपर्यंत हात जोडून स्वस्थ बसणें त्याला शक्य नाहीं. मी कर्ता आणि मी फलभोक्ता ही जाणीव समूळ नष्ट होईपर्यंत स्वस्थ बसणें त्याला अशक्य आहे. त्यानें कर्म केलेंच पाहिजे. कर्म मनुष्याच्या प्रकृतीशीं पक्कें बांधलें गेलें आहे. कर्माची कल्पना जन्मापासूनच त्याजबरोबर आलेली आहे. याकरितां कर्म केल्यावांचून त्याला सुटका नाहीं. मग आत्मज्ञानाला मदतगार होईल असें तरी कर्म त्यानें कां करूं नये ? कोणतेंही कर्म झालें तरी तें अज्ञानजन्य आहे हें म्हणणें शुद्ध परोक्षवादांच्या दृष्टीनें खरें आहे. पण आपल्या सापेक्ष जीवितांत या सिद्धांतानुरूप वागणें आपणांस शक्य नाहीं. आपल्या जीवनक्रमांत कर्माचा उपयोग शस्त्राप्रमाणें होण्यासारखा आहे. तूं आत्मानुभवी झालास म्हणजे मग वाटल्यास तूं कर्म कर अथवा करूं नको. मग कर्म करणें अथवा न करणें हें तुझ्या हातीं राहील. पण सांप्रतच्या स्थितींत तशी गोष्ट नाहीं. सामान्य माणसाला कर्म करणें अवश्य असतें. आत्मानुभवानंतर ही आवश्यकता नाहींशी होऊन ती गोष्ट तुझ्या मर्जीची होते. तशा स्थितींत तूं कर्म केलेंस तर तें सामान्य जीवांचें आणि जगाचें कल्याणच करील. अरे, ब्रह्मनिष्ठाचा नुसता श्वासोच्छ्वासही जीवांना कल्याणप्रद असतो. तशा स्थितींत मी अमुक करीन अथवा आरंभिलेलें अमुक सिद्धीस नेईन अशी भावना त्याच्या ठिकाणीं नसते. समजलास ना ?

**शिष्यः**—होय, महाराज. ज्ञान आणि कर्म यांची सुंदर एकवाक्यता आपण करून दाखविली.

इतक्यांत जेवणाची घंटा झाली, तेव्हां करद्वय जोडून शिष्य स्वामीजींना म्हणाला, ' महाराज, याच जन्मीं मला ब्रह्मज्ञान व्हावें असा आशीर्वाद आपण द्यावा. ' आपला वरदहस्त शिष्याच्या मस्तकीं ठेवून स्वामीजी म्हणाले, ' बेटा भिऊं नको. तूं सामान्य संसारी माणूस नाहींस. तूं केवळ पामर नाहींस. तथापि तूं पक्का संन्यासीही नाहींस. तुझा एक नवाच नमुना आहे. '

*
* *

## [ ३१ ]

### [ स्थळः—बेलूर मठ, १९०१ ]

स्वामीजींची प्रकृति अजूनही ठीकशी नाहीं. स्वामी निरंजनानंद यांच्या अत्याग्रहावरून वैद्याचें औषध स्वामीजींनीं सुरू केलें होतें. औषध चालू

असतां पाणी मुळींच प्यावयाचें नाहीं, आणि फारच तहान लागली तर दूध प्यावयाचें असें पथ्य होतें.

आज सकाळींच शिष्य मठांत आला होता. त्याला पाहातांच स्वामीजी प्रेमानें म्हणाले, 'आलास, बरें झालें. मी तुझीच वाट पाहात होतों.'

**शिष्यः**—गेले सहा सात दिवस आपण नुसते दुग्धाहारावर आहां असें मीं ऐकिलें.

**स्वामीजीः**—होय. निरंजनाची आग्रहाची विनंति मला अमान्य करवेना. तेव्हां औषध घेणें भागच होतें. गुरुबंधूंच्या आज्ञेकडे दुर्लक्ष करून चालावयाचें नाहीं.

**शिष्यः**—आपल्याला तर पाणी एकसारखें लागत होतें. मग तें एकदम सोडून देण्याचें कसें जमलें ?

**स्वामीजीः**—त्या औषधाला हेंच पथ्य आहे असें मला समजलें, तेव्हांच मीं मनाचा निश्चय केला. आतां पाण्याची आठवणसुद्धां मला होत नाहीं.

**शिष्यः**—औषधानें कांहीं गुण वाटतो का ?

**स्वामीजीः**—तें देव जाणे. गुरुबंधूंची आज्ञा म्हणूनच हें औषध मी घेतों.

**शिष्यः**—आपल्याच देशांत तयार झालेलीं औषधें आपले वैद्य वापरतात. आम्हा लोकांच्या प्रकृतिमानाला तींच बरीं पडत असावीं असें मला वाटतें.

**स्वामीजीः**—वैद्यकाचा सशास्त्र अभ्यास करून तयार झालेल्या डॉक्टराच्या औषधानें मरण आलेलें पुरवलें; पण त्या विद्येतलें अक्षरसुद्धां ज्याला कळत नाहीं अशा ठोंब्याच्या हातून बरें होणेंसुद्धां मला नको. हे लोक डोळे मिटून जुनीं बाडें वाचतात. चालू विषयाचें यत्किंचितहि ज्ञान ते मिळवीत नाहींत. अशा माणसांच्या हातून एक दोन रोगी बरे झाले असले तरी मला त्यांचें औषध नको.

स्वतःसाठीं कांहीं विशिष्ट खाण्याचे पदार्थ स्वामीजी बनवीत. त्यांपैकीं एकांत कांहीं विलायती द्रव्य ते टाकीत. आज तोच पदार्थ त्यांनीं बनविला होता. त्यांतला थोडासा प्रसाद त्यांनीं शिष्याच्या हातावर ठेवला. तो तोंडांत टाकून शिष्यानें विचारलें, 'महाराज, हें कशाचें केलें आहे ?' स्वामीजी

म्हणाले, ‘ विलायती किड्यांचें. हे किडे तिकडून मीं वाळवून आणले होते. ’ हें उत्तर ऐकून सर्व मंडळी खो खो हंसत सुटली. खाण्याच्या बाबींतल्या शिष्याच्या मतांची ओळख सर्वांनाच होती. अल्पस्वल्प आहार आणि अल्पस्वल्प निद्रा अशी स्थिति असतांही स्वामींचें देहचापल्य तसेच कायम होतें.

थोड्या दिवसांपूर्वी ‘ एन्सायक्लोपीडिया ब्रिटॅनिका ’ हा विश्वकोश आश्रमासाठीं मागविला होता. त्याचे भाग स्वामीजींच्या जवळच पडले होते. त्या कोऱ्या करकरीत ग्रंथांकडे पाहून शिष्य म्हणाला, ‘ हा सारा ग्रंथ एका आयुष्याच्या अवधींत वाचून टाकणें जवळ जवळ अशक्यच आहे.’ स्वामीजींनीं दहा भाग संपवून अकराव्यास सुरवात केली होती हें त्यास माहीत नव्हतें.

**स्वामीजीः**—काय म्हणतोस, अशक्य आहे ? पहिल्या दहा भागांतील हवा तो प्रश्न मला विचार.

शिष्य आश्चर्यानें म्हणाला, ‘ काय, इतके भाग आपण वाचून संपविलेही ?’

**स्वामीजीः**—अर्थात्, नाहीं तर हवा तो प्रश्न विचार असें मी कसें म्हणेन ?

स्वामीजींची परीक्षा घेण्याची इच्छा शिष्याला होऊन त्यानें कांहीं प्रश्न विचारले. उत्तरादाखल स्वामीजींनीं गोषवारा बरोबर सांगितला; इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणचीं वाक्येंच्या वाक्यें त्यांनीं म्हणून दाखविलीं. आश्चर्यानें स्तब्ध होऊन शिष्यानें हातांतलें पुस्तक बाजूला ठेवलें, आणि स्वामीजींस म्हटलें, ‘ महाराज, ही गोष्ट माणसाच्या शक्तीच्या बाहेरची आहे.’

**स्वामीजीः**—नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळल्यानें काय होतें हें आतां तुला दिसलें ना ? त्याच्यायोगें स्मरणशक्ति इतकी तीव्र होते कीं, एकदां कानावरून गेलेला विषय ब्रह्मचारी कधींही विसरत नाहीं. अल्पशा अवधींत शेंकडों विषय तो आपलेसे करून टाकतो. आपल्या देशांत ब्रह्मचर्याला ओहोटी लागली आहे. यामुळेंच विनाशाच्या अगदीं टोंकाजवळ आपण येऊन पोंहोंचलों आहों.

**शिष्यः**—महाराज, आपण कांहीं म्हटलें तरी केवळ ब्रह्मचर्यानेंच अशा प्रकारची अतिमानुषी शक्ति प्राप्त होणें शक्य नाहीं.

स्वामीजींनीं यावर कांहीं उत्तर दिलें नाहीं. पण ताबडतोब सामान्य तत्त्वविवेचनाकडे वळून निरनिराळ्या विचारसरणींतील कठीण मुद्दे शिष्यास ते समजावून देऊं लागले. आमचें भाषण चालू असतां स्वामी ब्रह्मानंद तेथें

आले आणि शिष्याला म्हणाले, ' तूं मोठा अजब प्राणी दिसतोस. स्वामीजींना आधींच बरें नाहीं, तेव्हां उगीच गप्पागोष्टी करून त्यांचें मन शांत ठेवावें, तें न करतां तूं असले कठीण विषय काढून त्यांचें तोंड एकसारखें चालू ठेविलें आहेस.' हे शब्द ऐकून शिष्याला लाज वाटली. पण स्वामीजी ब्रह्मानंदांना म्हणाले, ' तुझी ही वैद्यकीय चिकित्सा थोडी बाजूला ठेविलीस तरी हरकत नाहीं. हीं तर माझीं मुलें. यांना कांहीं सांगतां शिकवितांना माझा देहपात झाला तरी हरकत नाहीं. '

यानंतर हा तत्त्वज्ञानाचा विषय तितकाच राहून सामान्य संसारी गोष्टींकडे आम्ही वळलों. भारतचंद्र नांवाच्या लेखकाची खरी योग्यता किती आहे, याविषयीं आमचा वाद सुरू झाला. स्वामीजींनीं तर आरंभापासूनच त्याची थट्टा आरंभिली. बालविवाह आणि आमच्या इतर जुन्या चालीरीती यांचा तो पुरस्कर्ता असल्यामुळें त्याचीं मतें स्वामीजींना पसंत नव्हतीं. ते म्हणाले 'याचीं हीं जुनीं पुराणीं मतें आणि तीं मांडण्याची अश्लील तऱ्हा यांचो चहा बंगाली लोकांवांचून कोठेंही व्हावयाची नाहीं. सुसंस्कृत समाजांत असल्या गांवढयाला कोणी कवी म्हणणार नाहीं ! मुलांच्या हातीं असलीं पुस्तकें न पडण्याची चांगली खबरदारी घेतली पाहिजे. '

यानंतर आमच्या भाषणाचा ओघ मायकेल मधुसूदन दत्त यांजकडे वळला. स्वामीजी म्हणाले, ' तुमच्या प्रांतीं ही एक लोकोत्तर विभूती होऊन गेली. ' मेघनादवध ' यासारखें दुसरें एकही वीररसप्रधान काव्य बंगालींत नाहीं. याच्या जवळ बसण्याची योग्यतासुद्धां दुसऱ्या एखाद्या काव्याला नाहीं, असें माझें ठाम मत आहे. अर्वाचीन काळच्या युरोपांतील वाङ्मयांतसुद्धां अशा प्रकारचें काव्य दुर्मिळ आहे.'

**शिष्यः**—पण महाराज, मायकेलची भाषा थोडी अवडंबराची आहे असें आपणांस वाटत नाहीं काय ? शब्दजालाची आवड त्याला अधिक आहे, असें मला वटतें.

**स्वामीजीः**—कोणीं कांहीं नवी गोष्ट केली कीं, त्याची प्रथम टर उडवावी ही तुमच्या देशाची रीतच आहे. आधीं तो म्हणतो काय हें तरी पहा. पण तें न करतां आपल्या जुन्या पद्धतीला सोडून कांहीं दिसलें कीं, लोक त्याची चेष्टा करूं लागतात. वास्तविक मेघनादवध हें काव्य बंगाली वाङ्मयांतील एक रत्न

आहे. पण त्याची चेष्टा करण्याकरितां कोणी चिचुंद्रीवध हें काव्य लिहिलें आहे. ठीक; खऱ्या मोठ्या मनुष्याची चेष्टा कोणीं कितीही केली तरी तिजमुळें त्याला कमीपणा येत नाहीं. मायकेलच्या काव्याची थट्टा कितीही झाली तरी त्याची कीर्ति अजूनही अगदीं अचल आहे. मोठ्या झंझावातानेंसुद्धां हिमालय पर्वत डळमळत नाहीं, मग बारक्यासारक्या वातलहरींची काय कथा ? मोठ्या माणसांवर सदोदित शस्त्र घेऊन उठणाऱ्या असल्या टीकाकारांनीं त्याजवर कितीही घाव घातले, तरी त्यांचा कांहींच परिणाम होणार नाहीं. असे घाव कोणीं घातले होते ही गोष्टसुद्धां लोकांच्या आठवणींत राहणार नाहीं. मायकेलच्या काव्याची चव गांवढळ लोकांना समजणार तरी कशी ? त्याचा आवेश आणि तो पूर्णपणें व्यक्त होण्यास लागणारी स्वतंत्र भाषासरणी यांची परीक्षा मूर्खांना कशी होणार ? सध्यां गिरीशबाबूसुद्धां नव्या पद्धतीचे लेख लिहूं लागले आहेत; आणि त्यांवर तुमचे अरण्यपंडित टीका करून त्यांतील दोष दाखवूं लागले आहेत. पण गिरीशबाबूला असल्या टीकाकारांची काय पर्वा ? त्याचे ग्रंथ भावी प्रजा मान्य करील.

बोलतां बोलतां शिष्याकडे वळून स्वामीजी म्हणाले ‘ मेघनादवध काव्याची प्रत संग्रहालयांतून घेऊन ये बरें.’ आज्ञेप्रमाणें शिष्य पुस्तक घेऊन आला. तेव्हां स्वामीजी त्याला म्हणाले, ‘ आतां वाच पाहूं. तूं तें कसे वाचतोस हें तरी मला पाहूं दे. ’

शिष्यानें थोडासा भाग वाचून दाखविला. पण स्वामीजींना संतोष झाल्याचें त्यांच्या मुद्रेवरून दिसलें नाहीं. शिष्याच्या हातून पुस्तक घेऊन कांहीं भाग त्यांनीं स्वतः वाचून दाखविला. नंतर हातीं पुस्तक पुन्हां देऊन ते म्हणाले, ‘ आतां असे वाच आणि त्यांतील कोणता भाग उत्कृष्ट आहे हें मला सांग. ’ शिष्यानें कांहीं भाग वाचला. पण कांहीं निवडानिवड त्यानें केली नाहीं. तेव्हां स्वामीजी म्हणाले, ‘ इंद्रजित् रणांत पडला आणि मंदोदरी शोकानें व्याकुळ झाली, युद्धापासून परावृत्त होण्याचा उपदेश ती रावणाला करूं लागली. पण पुत्रमरणाचें दुःख बाजूला सारून रावण अधिक निधड्या छातीनें युद्धाला पुढें सरसावला. युद्धाची तड लावावयाची असा कृतनिश्चय त्यानें प्रकट केला. युद्धाच्या आवेशांत बायकामुलांचें अस्तित्वही तो विसरला. हा प्रसंग किती रमणीय आहे बरें ? आणि कवीनें तितक्याच उत्कटतेनें तो उतरविला आहे.

मूळ काव्यकल्पना आणि तिचें प्रकटीकरण हीं दोन्हीही हृदयंगम आहेत. ही कल्पना मनांत आणतांना आणि ती प्रकट करतांना मायकेलचें मन त्या कल्पनेशीं एकरूप झालें होतें. जग काय म्हणेल याची शुद्धि त्याला नव्हती. त्या कल्पनेचें पूर्ण आविष्करण करावें एवढेंच तो जाणत होता. जग जगलें आहे कीं मेलें आहे याचीसुद्धां जाणीव त्या वेळीं तो विसरला होता. '

असें म्हणून स्वामीजींनीं त्या काव्यांतील एक विशिष्ट भाग वाचण्यास आरंभ केला. त्यांच्या वाचनाची पद्धति श्रोत्यांला मोहून टाकण्यासारखी होती.

***

[ ३२ ]

[ स्थळः—बेलूर मठ, १९०१ ]

वैद्यबुवांच्या औषधानें स्वामीजींची प्रकृती बरीच सुधारली आहे. शिष्य सध्यां मठांतच येऊन राहिला होता. स्वामीजींच्या सेवेंत असतां तो एके दिवशीं म्हणाला, ' आत्मा सर्वव्यापी आहे. सर्व भूतांच्या जीवाचा जीव तो आहे; त्याच्या इतकें सन्निध दुसरें कांहीं नाहीं. असें असतां त्याचा प्रत्यय मुळींच येत नाहीं. असें कां ? '

**स्वामीजीः**—तुझे डोळे तुला दिसतात काय ? किंबहुना आपणास डोळे आहेत ही जाणीव तरी तुला असते काय? दुसऱ्या कोणीं डोळ्यांची गोष्ट काढली म्हणजे आपणांसहि डोळे आहेत याचें स्मरण तुला होतें. किंवा डोळ्यांत कांहीं केर जाऊन त्यांना पाणी येऊं लागलें म्हणजे आपणांस डोळे आहेत या गोष्टीची पुरती जाणीव तुला होते. त्याचप्रमाणें सर्व अंतर्यामांचा अंतर्यामी आत्मा सहजासहजीं जाणिवेंत येत नाहीं. त्याचा प्रत्यय एकदम येत नाहीं. श्रुतिवचनें वाचून अथवा गुरुवचनें ऐकून त्याची पुसटशी कल्पना येते. पण संसारदुःखाच्या चाबकाचे तडाखे बसून अंतःकरण विव्हळतें तेव्हां आत्मानुभवासाठीं मनुष्य तळमळूं लागतो. कोणी अत्यंत प्रिय असा आप्तेष्ट डोळ्यांदेखत मृत्युवश झाला आणि त्याला कसलीही मदत करण्याची पात्रता आपल्या अंगीं नाहीं असा अनुभव आला म्हणजे आपण अगदीं असहाय आहों अशी ओळख मनुष्याला पटते. मृत्यूनंतर जीवित म्हणून कांहीं आहे कीं नाहीं, तें असेल तर त्याचें स्वरूप काय असावें, इत्यादि विचारांची खळ-

बळ त्याच्या चित्तांत उडते. पण या जीवितमर्यादेपलीकडे असलेला अंधार इतका काळाकुट्ट आहे आणि त्यांतील अडचणी इतक्या अभेद्य आहेत कीं, सामान्य मनुष्याची दृष्टि त्यांना भेदून पलीकडे जाऊं शकत नाहीं. अशी तळमळ व धडपड अत्यंत वेगानें सुरू झाली म्हणजे आत्मानुभवासाठीं मनुष्य तळमळूं लागतो. यासाठीं आत्मानुभवाच्या मार्गांत दुःखप्राप्ति हें एक मोठें साधन आहे. पण दुःखें येत असतां त्यांतील अनुभवांकडे जो लक्ष पुरवील आणि ते विसरणार नाहीं त्याच्याच उपयोगी हीं दुःखें येतात. नाहींतर आज दुःख भोगावें आणि उद्यांला तें विसरून जाऊन पुन्हा पहिल्या मार्गाला लागावें असे आचरण करणारे शेंकडों लोक आपण नित्य पहातोंच. असे लोक नित्य दुःखें भोगीत असतात आणि अखेरीस कुत्र्यामांजरांसारखे एक दिवस मरून जातात. अशांना काय मनुष्य म्हणावें? दुःख अंगावर येऊन पडत असतां त्या वेळीं नित्यानित्यविवेक जो करूं शकतो आणि सुखदुःखें अल्पजीवी आहेत हें जो जाणतो तोच मनुष्य. तोच आत्मानुभवाला योग्य. सुखदुःखें अनित्य आहेत ही खूणगांठ जीवाला पटवून तो आत्मानुभवाच्या मार्गाला लागतो. मनुष्य आणि पशु यांतील भेद हाच. अत्यंत जवळ असलेली वस्तु आपण चांगलीशी पहात नसतों. जिचा परिचय नित्य, तिच्याकडे आपलें लक्ष अगदीं कमी असतें. '**अतिपरिचयादवज्ञा**' या वचनाचा प्रत्यय आपणांस नेहमीं येत असतो. आत्मा हा जवळांतील जवळ आहे. यामुळेंच मनुष्याचें लक्ष त्याजकडे जात नाहीं. मनुष्याचें मन बाह्य जगांत म्हणजे लांबच्या पदार्थांत भटकत असल्यामुळें अत्यत सन्निध अशा आत्म्याविषयीं तो निष्काळजी असतो. पण तो सदा सावध असतो. जो मनानें शांत असतो आणि बाह्य विषयांचें चिंतन जो करीत नाहीं तो आत्मानुभवी होतो. जो नित्यानित्य विवेक करितो आणि जगांतील वस्तु क्षणभगुर आहेत हें जाणतो आणि हें जाणून जो अंतर्मुख होतो, तो अखेरीस आत्मानुभवाला पोंहचतो आणि महापुरुष होतो. '**अहं ब्रह्मास्मि, तत्त्वमसि**' इत्यादि महावाक्यांचें रहस्य फक्त त्यालाच कळतें. आतां तुझ्या लक्षांत आलें ना?

**शिष्यः**—होय, महाराज. पण आत्मज्ञानाचा मार्ग दुःखांतून आणि कष्टांतून असावा असें कां? एवढी थोरली ही सृष्टि मुळांत झालीच नसती तर बरें होतें. आपण सर्व एका काळीं ब्रह्मांतच लीन स्थितींत होतों. मग ही विविध

सृष्टि उत्पन्न करावी ही इच्छा ब्रह्माला कोठून झाली? जीव तर वस्तुतः ब्रह्मरूप आहे असें म्हणतात. मग त्यानें जन्ममरणाच्या रहाटगाडग्याबरोबर काय म्हणून फिरत रहावें? सृष्टींतील क्रिया आणि प्रतिक्रिया या द्वंद्वाच्या रगाड्यांत त्यानें काय म्हणून सांपडावें?

**स्वामी:**—एखादें मादक पेय पिऊन मनुष्य बेफाम झाला, म्हणजे हजारों देखावे त्याला दिसूं लागतात. नाना प्रकारचे भ्रम त्याच्या चित्तावर उठतात. पण ही निशा साफ उतरली म्हणजे आपण नुसतीं स्वप्नेंच पहात होतों, असें त्याला समजून येतें. मादक पदार्थानें मेंदू तापल्यानें नुसत्या कल्पनेच्या मृग-जळांत तो आपणांस फिरवीत होता अशी त्याची खात्री होते. ही सृष्टी हल्लीं तूं पहातोस, हिला आरंभ नाहीं आणि अंतही नाहीं. ती तुला खरीशी दिसते, या सर्वांचें कारण तुझी उन्मादावस्था हेंच होय. ही निशा उतरली म्हणजे सृष्टीचाही अंत झालाच. मग असे प्रश्नच उद्भवणार नाहींत.

**शिष्य:**—तर मग उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि गोष्टी खरोखरच खोट्या काय? हा सारा नुसता भ्रमच काय?

**स्वामीजी:**—अरे, या गोष्टी खऱ्या आहेत आणि खोट्याही आहेत. मी म्हणजे देह असें जोंपर्यंत तुला वाटतें आणि जोंपर्यंत देहगत अहंकाराची जाणीव तुला आहे तोंपर्यंत तुला या साऱ्या गोष्टी खऱ्याच आहेत. पण देह-भाव पुरा नष्ट झाला आणि आत्मानुभव आला म्हणजे या गोष्टी होत्या कीं नाहीं अशी शंकासुद्धां तुला येणार नाहीं. मग तुझ्या दृष्टीनें जगाला अस्तित्वच नाहींसें होईल. मग जन्ममृत्यु इत्यादि साऱ्याच वस्तू तुला फोल होतील. त्यांचा विचार उद्भवण्यास तुझ्या चित्तांत अवकाशच होणार नाहीं. '**क्व गतं केन वा नीतं कुत्र लीनमिदं जगत्। अधुनैव मया दृष्टं नास्ति किं महदद्भुतं**' असें तूं म्हणूं लागशील. पहातां पहातां जग नाहींसें तरी झालें कोठें, याच आश्चर्यांत तूं गर्क होशील.

**शिष्य:**—विश्वाला अस्तित्व असतें, ही जाणीव जर नष्ट झाली तर 'विश्व गेलें कोठें' हा प्रश्नही उरत नाहीं.

**स्वामीजी:**—आपले सिद्धान्त भाषेनें व्यक्त करावयाचे असल्यामुळें अशी भाषा योजावी लागते. विचार आणि भाषा हीं जेथें पोहोंचू शकत नाहींत,

अशा स्थलाची कल्पना भाषेनें आणून द्यावयाचा आचार्यांचा हा यत्न आहे. वस्तुतः जग मिथ्या आहे. पण कांहीं काल तें सत्य भासत असल्यामुळें त्या भासाच्या अपेक्षेनें अशी भाषा योजावी लागते. विश्व हें निरपेक्ष सत्य नव्हे. केवळ ब्रह्मच सत्यरूप आहे. पण ब्रह्म मनाच्या आणि भाषेच्या मर्यादेबाहेर आहे. यामुळें तें भाषेनें व्यक्त करणें हें केवळ समजुतीसाठीं आहे. आतां तुला आणखी कांहीं विचारावयाचें आहे काय ? असल्यास विचार. मी तुला निःशंक करून टाकीन.

इतक्यांत देवघरांतून आरतीच्या घंटेचा नाद ऐकूं आला. मठांतील सर्व मंडळी देवघराकडे जाऊं लागली. शिष्य मात्र स्वामीजींसमोरून हालला नाहीं. हें पाहून स्वामीजी म्हणाले, ‘ आरतीला जायचें नाहीं काय ? ’

**शिष्यः**—मला आपल्या समोरच बसणें बरें वाटतें. महाराज, आज प्रतिपदा आहे. सर्वत्र अंधार पसरला आहे. आज कालीपूजनाचा दिवस आहे.

स्वामीजी कांहीं काळ क्षितिजाकडे पहात राहिले. नंतर थोड्या वेळानें ते म्हणाले, ‘ या निबिड अंधाराचें सौंदर्यही किती गंभीर आणि मनाला चकित करणारें आहे बरें ? ’ असें म्हणून स्वामीजी त्या अंधाराकडे पहात किती तरी वेळ बसले होते. कांहीं वेळानें एक बंगाली गीत गाण्यास त्यांनीं सुरवात केली. गीताची समाप्ति झाल्यावर कांहीं काळ ‘ काली काली, माते माते ’ असेंच किती तरी वेळ ते म्हणत राहिले.

स्वामीजींची ही निवृत्त स्थिति पाहून शिष्याचें चित्त अस्वस्थ झालें. तो म्हणाला, ‘ महाराज, माझ्याशीं कांहीं बोलत नाहीं काय ? ’

स्वामीजी हंसून म्हणाले, ‘ आत्मरूपाच्या सौंदर्याच्या गूढपणाचा तूं ठाव घेऊं शकशील काय ? त्याचीं हीं व्यक्त जड रूपेंसुद्धां किती सुंदर आणि मनोहर आहेत बरें ? ’ हा विषयच बदलावा या हेतूनें शिष्य इकडे तिकडे पाहूं लागला. पण इतक्यात स्वामीजीनी दुसऱ्या गीतास सुरवात केली. गाणें पुरें झाल्यावर ते म्हणाले, ‘काली ही ब्रह्माचीच व्यक्त दशा आहे. स्वस्थ पडलेला सर्प आणि सरसरत जाणारा सर्प हीं जशीं एकाच सर्पाचीं अचल आणि चल रूपें आहेत, त्याचप्रमाणें काली हें ब्रह्माचें चलद्रूप आहे. तुझ्या ध्यानांत आलें ना ? ’

**शिष्यः**—होय, महाराज.

**स्वामीजीः**—या आजारांतून उठल्यावर अंतःकरणाच्या पिळानें काली-पूजन करावें, हृदयाच्या रक्ताचें स्नान तिला घालावें अशी माझी इच्छा आहे. असें झालें तरच ती तुष्ट होईल. तुमचा रघुनंदनसुद्धां तेंच सांगतो. आम्ही काली मातेचीं मुलें महावीर असतों. कसलींही दुःखें आलीं, मृत्यु समक्ष येऊन उभा राहिला आणि सर्वत्र प्रलय दिसूं लागला तरी मातेच्या मुलांचीं हृदयें अभंग असतात.

***

## [ ३३ ]

### [ स्थळः—बेलूर मठ, १९०१ ]

सध्या बरेच दिवस स्वामीजी मठांतच असतात. त्यांची शरीरप्रकृति फारशी चांगली नाहीं, तथापि सकाळ संध्याकाळ ते फिरावयास जातात. स्वामीजींचें पादवंदन केल्यानतर शिष्यानें त्यांच्या प्रकृतीची चौकशी केली.

**स्वामीजीः**—सध्यां देहस्वास्थ्याबद्दल म्हणशील तर माझ्या देहाची स्थिति अत्यंत अनुकंपनीय झाली आहे, पण तें असो. माझ्या कार्यात मदत करण्यास पुढें सरसावें असें तुम्हांपैकीं कोणाच्या मनांत येत नाहीं ना? मी एकटा काय करणार? हा देह बगाली मातीचा आहे. मग अधिक श्रम सोसण्याचें सामर्थ्य त्याला कोठून असणार? तुमच्यासारख्या पवित्र अंतःकरणाच्या माणसांनीं जर मला मदत केली नाहीं तर माझ्या एकट्याच्या हातून काय काम होणार?

**शिष्यः**—महाराज, हे सारे स्वार्थत्यागी ब्रह्मचारी आणि संन्यासी आपल्या पाठीला उभे आहेत. आपल्याच कार्यात सर्व आयुष्य खर्चण्याची त्यांची इच्छा असावी असें मला वाटतें. मग हे निराशेचे उद्गार आपण कां काढतां?

**स्वामीजीः**—अरे, तरूण बंगाल्यांची एक संबध फौज मला पाहिजे. आतां साऱ्या देशाची भिस्त त्यांच्यावरच आहे. शुद्ध दानत, उत्तम बुद्धिमत्ता, स्वार्थत्याग, लोकसेवेची उत्कट इच्छा, आणि आज्ञाधारकपणा इतक्या गुणांनीं युक्त असलेल्या माणसांवरच माझी इमारत आधारलेली आहे. माझ्या कल्पना मूर्त रूपांत आणण्यासाठीं आपलें सारें आयुष्य खर्चण्याचा निश्चय अशा माणसांनीं केला तर देशाबरोबर आत्मकल्याणही तीं साधतील. नाहींतर पायलीचे पन्नास अशा माणसांचा काय उपयोग? सामान्य मनस्थितीचे तरूण हल्लीं हवे

तितके येतात आणि पुढेंही येतील. त्यांचा चेहराच त्यांच्या मंदबुद्धीची साक्ष पटवितो. क्रियाशक्तीचा अभाव तेथें पूर्णपणें दिसतो. सुदाम्याला शोभणारें त्यांचें शरीर काय काम करूं शकणार ? त्यांचीं शरीरें जशीं दुबळीं तसेंच मनही धैर्यशून्य. अशांच्या हातून कोणती कामगिरी होईल बरें ? नाचिकेतासारखे दहा बारा तरूण मला मिळाले, तर या देशाची सारी विचारपरंपरा आणि आचारप्रणाली मी पार बदलून टाकीन.

**शिष्यः**—महाराज, आपल्याकडे इतके तरूण येत असतांत. त्यांपैकीं एकसुद्धां आपल्या परीक्षेला उतरत नाहीं काय ?

**स्वामीजीः**—ज्यांच्यांत कांहीं राम आहे, त्यांपैकीं बहुतेक विवाहरज्जूनें बांधलेले, दुसरे कांहीं कनकाच्या अथवा कीर्तीच्या मागे लागलेले, आणि बाकी उरले ते पाप्याचे पितर. आधीं बहुतेक लोक असे असतात कीं, माझ्या विचारांचें रहस्यसुद्धां त्यांना समजत नाहीं. कोणतीही उच्च कल्पना ग्रहण करण्याची पात्रता त्यांच्या बुद्धीला नसते. माझ्या कल्पना ध्यानांत येतील अशी बुद्धिमत्ता तुझ्या ठिकाणीं आहे, पण त्या व्यवहारांत आणण्याचें सामर्थ्य तुला नाहीं. दांत आहेत तेथें चणे नाहींत आणि चणे आहेत तेथें दांत नाहींत, असा प्रकार असल्यामुळें पुष्कळ वेळां माझ्या चित्ताला काळजी लागून रहाते. आपल्या हातून कांहीं कार्यभाग होऊंच नये असें आपल्या नशिबींच आहे असेही अखेरीस वाटूं लागतें. आतां, मी अगदींच निराश झालो आहें असे मात्र नाहीं. परमेश्वराची कृपा झाली तर याच तरुणांतून मोठे कार्यकर्ते पुढें मागें निपजतील.

**शिष्यः**—महाराज, आपल्या या उच्च आणि उदार विचारांचा आदर आज ना उद्यां सारें जग करील, असा मला पक्का भरंवसा वाटतो. आपले विचार सनातनस्वरूपाचे आहेत. एखाद्या विशिष्ट व्यक्तीला, समाजाला अगर देशालाच ते लागू आहेत असें नाहीं. मनुष्यमात्राच्या विचारशक्तीला आणि कर्मप्रवृत्तीला चालना देण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे. आजसुद्धां आपले हे विचार लोकांना मान्य होऊं लागले आहेत. मग कोणाला त्यांचें मूळ ज्ञात असेल अगर कोणाला अज्ञात असेल.

**स्वामीजीः**—येथें नांवाची मातब्बरी विशेषशी नाहीं. माझ्या अस्तित्वाचें ज्ञान कोणाला असलें अथवा नसलें तरी मूळ मुद्दयाचें ग्रहण लोकांना झालें

म्हणजे झाले. कनककामिनीचा त्याग करून साधु बनलेले शेंकडा नव्याण्णव लोक मला असे आढळतात कीं, अखेरीस मोठ्या नांवाला आणि कीर्तीला ते बळी पडतात. मन कितीही सुसंस्कृत झालें तरी कीर्तीच्या इच्छेची छाया त्याजवर दीर्घकाळपर्यंत रहाते. याकरितांच अगदी निष्काम होऊन आपण आपल्या कार्याला लागलें पाहिजे. मग त्यांत आपणांस चांगलें म्हणणारे कोणी भेटोत अथवा वाईट म्हणणारे भेटोत, दोघांचीही उपेक्षा करून आणि आपलें अखेरचें साध्य सदोदित नजरेपुढें ठेवून आपण काम करीत राहिलें पाहिजे. '**वानोत निंदोत सुनीतिमंत**' हें भर्तृहरीचें वचन आपण कधींही विसरू नये.

**शिष्यः**—महाराज, अखेरचें साध्य म्हणून जें आपण म्हणतां त्याचें स्वरूप तरी काय ?

**स्वामीजीः**—महावीराची वृत्ति. तुम्ही बलभीम बना. रामाच्या आज्ञेबरोबर एका उड्डाणांत त्यानें समुद्र कसा ओलांडला पहा ! असे करतांना आपण जगूं कीं मरूं हा विचार त्याला शिवलासुद्धां नाहीं. तो पूर्ण संयमी होता. हें स्वरूप नित्य डोळयांपुढें बाळगून आपल्या भावी आयुष्याच्या इमारतीची रचना या नमुन्याबरहुकूम तुम्हीं केली पाहिजे. बाकीचीं सारीं साध्यें या महत्साध्याच्या पोटांतली आहेत. हें साध्य सिद्ध करावयास तुम्हीं लागलां म्हणजे बाकीचीं आपोआपच सिद्ध होऊं लागतील. गुरूच्या ठिकाणीं अत्यंत दृढ श्रद्धा आणि नैष्ठिक ब्रह्मचर्याचें पालन हेंच साऱ्या पुरुषार्थाचें मूळ आहे. यशाचें रहस्य यांत सांठविलें आहे. ईशसेवा म्हणजे काय हें जसें हनुमानानें एका पक्षीं दाखविलें तसेंच दुसऱ्या पक्षीं धैर्य म्हणजे काय याचाही धडा सर्व जगाला त्यानें दिला. साऱ्या जगाला त्यानें चकित करून सोडिलें. रामसेवेंत जीव गेला काय आणि राहिला काय याची पर्वा त्याला नव्हती. रामसेवेपलीकडे अधिक महत्त्वाचें असें त्याला कांहींच नव्हतें. ब्रह्मस्वरूप अथवा शिवस्वरूप व्हावें अशी इच्छासुद्धां त्याला झाली नाहीं. रामाची आज्ञा झाली, कीं ती पार पाडावयाची, एवढेंच त्याला ठाऊक होतें. याचें नांव भक्ति. नाहीं तर करताळ वाजवून किंवा मृदंग पिटून गाणीं ओरडत बसावें ही कांहीं भक्ति नव्हे. पण सध्या सारें जग याच भक्तीच्या मार्गे लागलें आहे. हीं पाप्याचीं पितरें नाचूं उडूं लागलीं म्हणजे तेवढे श्रमसुद्धां सोसण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसतें. आधीं शरीरबळ चांगलें हवें. कोठल्याही साधनाला त्याची प्रथम आवश्यकता

आहे. त्यावांचून कोठलेंही साधन लंगडें पडतें. शरीरबळासाठीं मनःशुद्धि हवी. असें पावित्र्य अंगीं नसेल तर शुद्ध तमोगुणांत तुम्ही बुडून जातां. कोठल्याही प्रांतांतल्या कोठल्याही खेड्यापाड्यांत तुम्ही जा, तेथें तुम्हांस टाळमृदंगांचा खणखणाट ऐकूं येईल. आतां कांहीं मोठ्या शहरांतून त्यांच्या जागीं तबलेपेट्या आल्या आहेत. आपली जुनी हत्यारें अगदीं टाकाऊ झालीं, कीं हिंदुस्थानांत मिळेनाशीं झालीं ? लोकांना आतां बांसरी हवीशी वाटूं लागली. असल्या स्त्रैणसंगीताचा ध्वनि मुलांबाळांच्या कानांवर लहानपणापासून येऊन येऊन सारा देश आतां स्त्रियांचा बनूं पहात आहे. कथाकीर्तनांतसुद्धां आतां मंजुळ हत्यारें लागूं लागलीं आहेत. येवढी अवनति अझून पुरेशी झाली नाहीं काय ? कवि म्हणजे सर्वद्रष्टा. पण तुमच्या अवनतीचें आकलन त्याच्या दृष्टीनेंसुद्धां होणार नाहीं. गंभीर ध्वनीचा डमरू तुम्ही आतां हातीं घ्या. 'हर हर ॐ !' हा ध्वनि तुमच्या कंठांतून नित्य नाचत राहिला पाहिजे. त्या ध्वनीनें आसमंतांतील भाग दुमदुमून गेला म्हणजे तुमचीं अंतःकरणें वीरवृत्तीनें उचंबळतील. मृदु भावनांना जागें करणाऱ्या साऱ्या गोष्टी तुम्हीं फेंकून दिल्या पाहिजेत. निदान कांहीं काळ तरी त्यांचा पूर्ण त्याग केला पाहिजे. ख्याल, टप्पे आणि ठुंबऱ्या टाकून तुम्ही ध्रुवपद गा. आपला देश सध्या मृतवत् पडला आहे. गंभीर श्रुतिसूक्तांच्या मेघनादानें त्याला नवा जीव आणला पाहिजे. सांप्रतच्या प्रत्येक तरुणाच्या मनांत पुरुषार्थाची कल्पना उत्पन्न करून दिली पाहिजे. अशा प्रकारचें ध्येय तुम्हीं पुढें ठेविलें तरच त्यांत तुमचा व तुमच्या देशाचा तरणोपाय आहे. तुमची दानत या साध्याला धरून बनली तर दुसरे हजारों लोक आपोआप तुमच्या मागें येतील. पण या साध्यापासून एक तसूभरही ढळावयाचें नाहीं अशी काळजी तुम्ही घेतली पाहिजे. धीर सोडूं नका. आपल्या सर्व वागणुकींत आपल्या ध्येयाची छाया स्पष्ट दिसावी. हें तुम्हांला साध्य झालें तरच महाशक्तीची कृपा तुमच्यावर होईल.

**शिष्यः**—महाराज, कधीं कधीं मला अगदीं उदासवाणें वाटतें; आणि असें कां होतें तें मात्र मला समजत नाहीं.

**स्वामीजीः**—अशा प्रसंगीं आपल्या जगन्मातेचें स्मरण तूं करीत जा. आपण कोणाचें मूल आहोंत याची आठवण कर. दुबळे विचार आपणांस शोभत नाहींत असें आपल्या मनाला तूं शिकव. '**शिवोऽहं शिवोऽहं**' असें स्मरण

या प्रसंगीं करीत जा. मी ब्रह्मविद् आहें असें म्हण. आपल्या उच्च दर्जाचें विस्मरण होऊं देऊं नको. 'श्रीरामकृष्णांच्या सान्निध्यांत ज्याचा जन्म जात आहे आणि ज्यानें कनककामिनीचा मोह जिंकला आहे त्याचा मी शिष्य आहें,' अस स्वतःला म्हण. यायोगें तुझा उदासपणा नष्ट होईल. ज्याला आपल्या कर्तृत्वाचा अभिमान नाहीं त्याच्या ठिकाणीं ब्रह्मजागृतीही होणार नाहीं. रामप्रसादाचें गाणें तूं ऐकलें नाहींस वाटतें ? तो म्हणतो, 'माझ्या मस्तकावर जगन्मातेचें राजछत्र असतां मला भीति कशाची ?' असा अभिमान तूंही धर. आपल्या मनांत तो नित्य जागृत ठेव. तुझ्या मनोगुहेंत हा सिंह जागा राहिला म्हणजे दुबळीं कोल्हीं तिकडे फिरकणारसुद्धां नाहींत. दुबळ्या विचारांची छायासुद्धां आपल्या मनावर पडूं देऊं नको. महावीर हनुमानाचें स्मरण कर. कालीमातेचें स्मरण कर. मग तुझा सारा भित्रेपणा पार नाहींसा होईल.

इतकें म्हणून तेथून उठून स्वामीजी खालीं आले; आणि त्यांच्यासाठीं आंगणांत टाकलेल्या खाटेवर येऊन ते बसले. कांहीं संन्यासी आणि ब्रह्मचारी मंडळी त्यांसभोंवतीं गोळा झाली. स्वामीजी म्हणाले, 'ब्रह्म इतकें उघडें असतां त्याला तुच्छ करून इतर वस्तूंसाठीं जे लाळ घोटतात त्यांना धिक्कार असो ! अहाहा ! ब्रह्म करतलामलकवत् स्पष्ट आहे ! हें पहा, हें पहा, तुम्हांला अनुभव येत नाहीं काय ?'

हे शब्द स्वामीजींनीं इतक्या हृदयभेदक पद्धतीनें उच्चारले होते कीं, आम्हांपैकीं प्रत्येक जण चित्रासारखा स्तब्ध राहिला. स्वामीजी समाधींत मग्न होत आहेत असें दिसलें. अशा शून्यावस्थेंत कांहीं काळ गेला. थोड्या वेळानें आम्ही शुद्धीवर आलों, आणि आजूबाजूचें जग आम्हांस पूर्ववत् भासूं लागलें.

स्वामीजी तेथून उठले आणि फिरावयास निघाले. शिष्य त्यांच्या मागोमाग होताच. त्याला स्वामीजी म्हणाले, 'साऱ्यांची स्थिति आज कशी झाली पाहिलीस ? अरे, हीं सारीं श्रीरामकृष्णांचीं मुलें. नुसतें बोट करतांच तीं आकाशापर्यंत पोंचावयाचीं.'

**शिष्यः**—महाराज, माझें अंतःकरणसुद्धां अननुभूत स्थितींत गटंगळ्या खाऊं लागलें. मग त्यांची गोष्ट काय सांगावी ! कांहीं काळ मी या जगांतच नव्हतों. पण त्या स्थितींतून परत आल्यावर आतां मात्र तो अनुभव स्वप्नवत् वाटत आहे.

**स्वामीजी**:—योग्य काळी सर्व कांहीं होईल. सध्या तूं आपल्या अभ्यासांत मात्र दक्ष रहा अज्ञान आणि भ्रम यात गढून गेलेल्या आपल्या बांधवांना या स्थितीतून बाहेर काढणें हेंच कर्तव्य सांप्रत तुझ्यापुढें आहे. या कामाला तूं आपणांस वाहून घे. मग असे कितीतरी अनुभव तुला येतील.

**शिष्यः**—नानाविध अनुभवांच्या जाळ्यांत मी गुरफटेन कीं काय अशी भीति माझ्या मनाला वाटते. आतांच्या सारखा अनुभव सहन करण्यास मला सामर्थ्य तरी कोठें आहे ? कर्मांच्या जाळ्यांत मी सध्यां गुरफटलों आहें. '**गहना कर्मणो गतिः**' हें तर भगवंतच बोलले आहेत.

**स्वामीजीः**—तर मग आतां तू पुढें काय करणार ?

**शिष्यः**—माझी इच्छा म्हटली तर आपल्या सारख्याच्या सहवासांत स्वस्थ राहून ज्ञानाचा लाभ करून घ्यावा अशी आहे. महाराज, आपण ब्रह्मनिष्ठ. श्रुतिवचनांची सत्यता आपण अनुभविली आहे. आपल्या वचनाचें श्रवण, त्याचे मनन आणि निदिध्यास या मार्गानें जाऊन याच जन्मी ब्रह्मानुभव घ्यावा अशी माझी इच्छा आहे. खरें म्हणाल तर याशिवाय दुसऱ्या गोष्टींकडे माझें मन वळत नाहीं, आणि त्यांत मला उत्साहही वाटत नाही. इतर गोष्टींत रमण्याचे सामर्थ्यच माझ्या मनाला नाहीं.

**स्वामीजीः**—ठीक. तुझे प्रेम या मार्गावर असलें तर तूं त्यानेंच चाल. इतरांशी भाषणें करून शास्त्रविचार त्यांना सांग. त्यांच्याशी संभाषण करून आपले अनुभव त्यांना सांगून त्यांचा फायदा त्यांना तू करून दे. देह आहे तोंपर्यंत काहीना कांहीं काम केलेच पाहिजे. यासाठी दुसऱ्यांना चांगला मार्ग दिसेल असें तरी कर्म तूं करीत जा. सत्याच्या शोधांत जे जे कोणी असतील त्यांना तुझे विचार आणि अनुभव यांचा उपयोग होईल. हे सारे विचार तूं लिहून काढलेस तर आणखीही कित्येकांना त्यांची मदत होईल.

**शिष्यः**—आत्मानुभवावांचून कांहीं तरी लिहिणें फुकट आहे. 'शिक्का-मोर्तब असल्यावांचून तुमचें कोण ऐकणार ?' असें श्रीरामकृष्णसुद्धां म्हणत असत.

**स्वामीजीः**—ज्या स्थितींत सध्यां तूं गटंगळ्या खात आहेस, त्याच स्थितीत जगांत दुसरे पुष्कळ लोक असतील. तींतून बाहेर कसें पडावें याचा

विचार आणि ऊहापोह ते करीत असतील. तुझ्याच सारखीं अनेक साधनें तेही अजमावून पहात असतील. या स्थितींतून बाहेर कसें पडावें हें त्यांना समजत नसेल. अशा स्थितींत तुझे अनुभव आणि तुझी विचारसरणी यांचा कांहीं तरी उपयोग त्यांना होईल. या मठांतील साधूबरोबर जीं संभाषणें तूं करतोस त्यांतील मुद्दे सोप्या भाषेत तूं लिहून काढलेस तर पुष्कळांना त्यांचा उपयोग होईल.

**शिष्यः**—आपली इच्छाच असेल तर या गोष्टी लिहून काढण्याचा यत्न मी करीन.

**स्वामीजीः**—जो अभ्यास आणि जे अनुभव लोकांच्या उपयोगीं पडत नाहींत त्यांचें अस्तित्व तरी कशाला ? अज्ञानभ्रमांत सांपडलेल्या लोकांचा भ्रम दूर करण्यांत त्यांचा उपयोग झाला पाहिजे. कनककामिनीच्या कैचींत सांपडलेल्या लोकांची सुटका करण्याकरितां त्यांचा उपयोग झाला पाहिजे. जोंपर्यंत एक तरी जीव मायेंत गुरफटलेला आहे, तोंपर्यंत तुला मुक्ति मिळेल असें तूं समजूं नको. तो मुक्त होईपर्यंत तितके जन्म तुला घ्यावे लागतील आणि त्याला मदत करून ब्रह्मस्वरूपापर्यंत त्याला पोंचविण्याचें काम तुला करावें लागेल. प्रत्येक जीव तुझा अंश आहे. केवळ परसेवेसाठीं कर्मरत व्हावें या सिद्धांताचा मूळ पाया हाच आहे. तुझीं बायकापोरें तुला जशी आपलींशीं वाटतात आणि त्यांच्या बऱ्यासाठीं जसा तूं जीवेंभावें धडपडतोस, त्याचप्रमाणें प्रत्येक जीवाबद्दल जेव्हां असें प्रेम तुला वाटूं लागेल, तेव्हांच तुझ्या ठिकाणीं ब्रह्मजागृति होत आहे, असे मी समजेन. तसे होण्याच्या आधीं तुझी सारी साधनें आणि सारे विचार हीं मला फोल दिसतात. जात, गोत, वर्ण इत्यादि कसल्याही प्रकारचा भेद चित्तांत न येतां जेव्हां सर्वांच्या कल्याणासाठीं तुझें चित्त तळमळूं लागेल तेव्हांच अखेरच्या साध्याकडे तूं जात आहेस असें मी समजेन.

**शिष्यः**—महाराज, सर्वांची मुक्ति सिद्ध झाल्यावांचून व्यक्तीला मुक्ति नाहीं, हा आपला सिद्धांत फार भयंकर दिसतो. ही गोष्ट पूर्वी मीं कधींच ऐकली नव्हती.

**स्वामीजीः**—अशा प्रकारचें मत असलेले कांहीं वेदांती आहेत. व्यक्तीची मुक्ति ही पूर्ण मुक्ति नव्हे, असें त्यांचें मत आहे. सर्व विश्वाची मुक्ति तीच

पूर्ण मुक्तावस्था असे ते म्हणतात. या दोन्ही मतांचें तारतम्य पाहतां दोहोंतही गुणदोष आहेत.

**शिष्यः**—मी एक व्यक्ति आहें असे वाटणें हीच बद्धावस्था असें वेदांताचें म्हणणें आहे. वस्तुतः आत्मा मुक्तावस्थेंत असतां कर्मफलांनीं आणि नानाविध वासनांनीं तो बद्धसा दिसतो. त्यांच्या मर्यादेमुळें तो मर्यादित झाल्यासारखा भासतो. नित्यानित्यविवेकानें ही मर्यादा नाश पावली आणि जीवाभोंवतीं दिसणारे गुण नष्ट झाले, म्हणजे त्याला बद्धता कोठून राहणार ? वस्तुतः तो आधींच मुक्त आहे. तो बद्ध आहे असें वाटणें हा भ्रम. हा भ्रम नष्ट झाला म्हणजे बद्धता कोठून राहील ? मी खरा आणि जग खरें हा भ्रम ज्याला आहे, त्याला जगाच्या मुक्तीवांचून माझी मुक्ति नाहीं असें वाटणें युक्त म्हणतां येईल. पण हा मुळांतला भ्रमच ज्याला नाही, ज्याचे हे सर्व पाश गळून पडले आहेत आणि जो ब्रह्मनिष्ठ झाला आहे, तो हे भेद कसे पाहणार ? याकरितां व्यक्तीच्या मुक्तिमार्गांत जग आड येत असेल हें म्हणणें मला पटत नाही.

**स्वामीजीः**—होय. तू म्हणतोस तें खरें आहे. पुष्कळ वेदांत्यांचें हेंच मत आहे. आणि त्यांत कोठें उणीवही आढळत नाहीं. व्यक्तीच्या मुक्तीला बाह्य उपाधि आड येऊं शकत नाहींत असे त्यांचें मत आहे. तथापि साऱ्या विश्वाला पाठीला मारून मी मुक्त होईन असे जो म्हणतो त्याचें अंतःकरण केवढें विशाल असलें पाहिजे याचा विचार कर.

**शिष्यः**—महाराज, त्याचें अंतःकरण विशाल आहे, तो शूर आहे, पुरुषार्थी आहे, हें मी कबूल करितों. पण त्याच्या या मताला श्रुतींचा आधार नाहीं हेंही मला सांगितलें पाहिजे.

माझें हें भाषण स्वामीजींना कळलें की नाही कोण जाणे. कारण त्यांची वृत्ति या जगांत होतीसें दिसलें नाहीं. कदाचित् माझे शब्द त्यांनीं ऐकलेसुद्धां नसतील. थोड्या वेळानें ते म्हणाले, " एकाग्र अंतःकरणानें ब्रह्माचें ध्यान अहोरात्र कर. पण जेव्हां तुझें मन ऐहिकाचा विचार करीत असेल आणि लौकिकांत वावरत असेल, तेव्हां कांहीं ना कांहीं काम करीत जा. तें काम केवळ परोपकाराचेंच असूं दे. त्या वेळीं 'जीवमात्र सुखी असूं दे' असें चिंतन मनांत

करीत जा. नुसता असा अमूर्त विचार तूं मनःपूर्वक केलास तर तेवढ्यानेंही जगाचा फायदा होईल. कोणतेंही सत्कार्य फुकट जात नसतें. मग तें जड कर्म असो, अगर विचार असो. विचारप्रवाह फार शक्तिमान् असतो. तुझ्या सद्विचारांनीं एखाद्या अमेरिकेंतील मनुष्याच्या मनांतही धर्मप्रेरणा होईल. ''

**शिष्यः**—महाराज, माझें चित्त नेहमीं सत्याभिमुख राहील असा आशीर्वाद आपण मला द्यावा.

**स्वामीजीः**—तुझी इच्छा तितकी तीव्र असेल तर तसे अवश्य होणारच.

* * *

[ ३४ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, १९०१ ]

बेलूर मठाची स्थापना झाली तेव्हां जुन्या मताच्या लोकांनीं त्याजवर पुष्कळ कडक टीका केली. मठांतील रहिवाशांचें आचरण त्यांच्या दृष्टीनें पसंत पडण्यासारखें नव्हतें. लोक अशा प्रकारची टीका करितात, ही गोष्ट शिष्यानें स्वामीजींच्या कानावर घातली तेव्हां तुलसीदासांचें पद म्हणून त्यांनीं उत्तर दिलें '**हाथी चाले अपने चालसे। कुतर भुकत वाकु भुकवा दे॥**' ते म्हणाले, 'आपण छळ सोसल्याशिवाय कोणत्याही कल्याणकारक कल्पनेचें बीजारोपण लोकांच्या चित्तांत करतां येणार नाहीं. यासाठींच आपण निष्काम कर्मांची कास धरली पाहिजे. आपणांस योग्य वाटतें तें आपण करावें मग त्याचें फळ कांहींही येवो. या भावनेनें तुम्ही चाललां तर तुमच्या श्रमाचें चीज केव्हां ना केव्हां तरी होईल. माझ्या मुला, '**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति**' हें गीतावचन तूं विसरूं नको.

सन १९०१ चा मे अथवा जून महिना असेल. शिष्य मठांत असतां स्वामीजी त्याला म्हणाले, 'रघुनंदनाच्या अष्टाविंशति तत्त्वांची एक प्रत आण पाहूं.'

**शिष्यः**—ठीक आहे, महाराज. पण रघुनंदनस्मृति घेऊन आपण काय करणार ? सांप्रतचे सुशिक्षित लोक तर तो एक खुळेपणाचा गोंधळ समजतात.

**स्वामीजीः**—असें कां बरें ? स्वतःच्या काळीं रघुनंदन हा एक महापंडित होऊन गेला. प्राचीन स्मृतिकारांचे ग्रंथ पाहून आणि हिंदूंच्या चालीरीती

ध्यानीं आणून आपल्या स्मृतीची रचना त्यानें केली. काळ बदलला आहे, ही गोष्ट ध्यानी आणून योग्य ते फेरफार करण्यासुद्धां तो चुकला नाही. आज सारा बंगाल हीच स्मृति प्रमाण मानतो. पण गर्भापासून मरेपर्यंत हिंदूचें आचरण कसें असावें याचे जे नियम त्यानें बांधून दिले आहेत, ते इतके कडक आहेत कीं, त्यांच्याखालीं हिंदुसमाज अगदीं दडपून गेला आहे. खाणें, पिणें आणि झोंप घेणें इत्यादि अगदी क्षुल्लक व्यवहारसुद्धां त्याच्या सांपळ्यांतून सुटले नाहीत. मग अधिक महत्त्वाच्या गोष्टींचें काय सांगावें ? सारा आयुष्य-क्रम म्हणजे कायद्याची कैची. आतां परिस्थिती बदलली असल्यामुळें या नियमाची अंमलबजावणी होणें अशक्य झालें आहे. त्यामुळें ते आपोआपच शिथिल पडले आहेत. समाजाच्या चालीरीती जसजशा बदलत जातात तसतसे कर्मकांडाचे नियमही बदलतात. ही गोष्ट सर्वत्र आणि सर्व काळीं सारखीच घडून येते. ज्ञानकांड मात्र अचल आहे. फार काय, पण श्रुतिकाळींसुद्धां हवनादिकांच्या नियमांत फेरफार होत गेल्याचें आपणांस आढळून येतें. पण उपनिषदें मात्र आजतागायत अचल राहिली आहेत. टीकाकारानीं आपापल्या मतास अनुसरून वेगवेगळीं भाष्यें त्यांजवर केलीं असतील इतकेंच; पण त्यांजमुळें मूळ संहितेंत कांही फरक झाला नाहीं.

**शिष्यः**—महाराज, रघुनंदनाच्या प्रतीचें आपण काय करणार आहां ?

**स्वामीजीः**—या वर्षी दुर्गापूजेचा उत्सव करण्याचें माझ्या मनांत आहे. खर्चापुरते पैसे मिळाले तर महामायेचें पूजन आपण करूं. यासाठी पूजाविधि मी पाहून ठेवणार आहें. येत्या रविवारीं तूं मठांत येशील तेव्हां ती स्मृति घेऊन ये.

स्वामींच्या आज्ञेप्रमाणें शिष्य स्मृतीची प्रत घेऊन आला. आणखी आठवड्यानें स्वामीजीच्या दर्शनाला तो गेला तेव्हां ते म्हणाले, 'तूं मला नजर केलेली प्रत मीं वाचून पाहिली. आतां माझ्याकडून पूजेची तयारी झाली. पैशाची मात्र खोटी आहे.'

योग्य काळीं सर्व कांहीं सुव्यवस्थित होऊन पूजाविधि मोठ्या थाटामाटानें पार पडला.

याच वर्षी स्वामीजींनीं काली घाटावर एक हवनही केलें. यासंबंधीं शिष्याशीं बोलतांना ते त्याला म्हणाले, 'काली घाटावर आपणास हरकत न

करण्याइतकें विचारांचें औदार्य तेथील मंडळीनें दाखविलें याबद्दल मला फार आनंद वाटतो. मी बोलून चालून साता समुद्रांचें पाणी पिऊन आणि परदेशीं राहून आलेला मनुष्य. पण देवीच्या दर्शनासाठीं देवळांत जातांना मला त्यांनीं यत्किंचित् सुद्धां हरकत केली नाहीं. उलट अगदीं गाभाऱ्यापर्यंत ते आपण होऊन मला घेऊन गेले, आणि सारें पूजन माझ्या मनाप्रमाणें मला करतां आलें.

*
* *

## [ ३५ ]

[ **स्थळः**—बेलूर मठ, सन १९०२ ]

आज श्रीरामकृष्णांची पुण्यतिथि होती. स्वामीजींचा हा अखेरचाच उत्सव. शिष्यानें केलेलें एक रामकृष्णस्तोत्र त्यानें स्वामीजींस अर्पण केलें. नतर तो स्वामीजींचे पाय चेपूं लागला. स्वामीजी म्हणाले, 'पाय अगदीं हळू चेप बरें. आज ते फार दुखत आहेत.'

कविता वाचून स्वामीजींना संतोष झाला. स्वामीजींची प्रकृति अलीकडे फारच बिघडली होती. त्यांची एकंदर स्थिति पाहून शिष्याच्या चित्तांत कालवाकालव सुरू झाली. त्याची स्थिति स्वामीजींनीं जाणली. ते म्हणाले, 'अरे, विचार कसला करतोस? जें जन्माला आलें त्याला मरण आहेच. माझा संदेश तुमच्या चित्तापर्यंत अंशतः तरी पोंचविण्याचें कार्य माझ्या हातून झालें असेल तर माझा जन्म फुकट गेला असें मी म्हणणार नाहीं.'

**शिष्यः**—आपली कृपा व्हावी, अशी आमची योग्यता आहे काय? योग्यायोग्य न पहातां आपण मला आशीर्वाद दिला, तर मी स्वतःस धन्य मानीन.

**स्वामीजीः**—संन्यास हें अखेरचें साध्य आहे, हें नित्य ध्यानांत ठेव. हा मुद्दा मनांत पक्का बिंबल्यावांचून ब्रह्माविष्णुमहेशादिकांना सुद्धां मुक्तिलाभ मिळविण्याची पात्रता येत नाहीं.

**शिष्यः**—ही गोष्ट आपल्या तोंडून सांजसकाळ ऐकत असतांही ती अद्यापि माझ्या चित्तांत पुरती बिंबत नाहीं.

**स्वामीजीः**—त्यागबुद्धि अखेरीस निर्माण झालीच पाहिजे. पण '**कालेनात्मनि विन्दति**'। या गोष्टी कालांतरानेंच घडावयाच्या असतात. गतजन्मांचे संस्कार चित्तांत रुतून बसलेले असतात. त्यांचें उच्चाटन झाल्याशिवाय त्यागबुद्धीचा अंकुर कसा फुटेल ?

उत्सवाला येणारी मंडळी हळूहळू जमूं लागली. शिष्यही तेथून उठण्याच्या तयारीस लागला. तेव्हां स्वामीजी म्हणाले, 'बाहेर जाऊन काय करणार ? लोकांची पुष्कळशी गर्दीच तूं पहाणार ना ? मग येथेंच बैस. निरंजनाला हांक मारून खालच्या दाराजवळ बसव आणि आज इकडे कोणालाही येऊं देऊं नको. स्वामीजीच्या आज्ञेप्रमाणें व्यवस्था करून शिष्य त्यांजजवळ येऊन बसला. तेव्हां स्वामीजी म्हणाले, या उत्सवाची दिशा यंदांपासूनच थोडी बदलल्यास बरें असें मला वाटतें. तो एकाच दिवसांत संपविण्यापेक्षां त्याचा कार्यक्रम चार पांच दिवसांचा करावा. पहिल्या दिवशीं श्रुतिवचनांवर पुराण व्हावें. दुसऱ्या दिवशीं वेदान्ततत्त्वांवर ऊहापोह आणि वादविवाद व्हावा. तिसऱ्या दिवशी कोणालाही प्रश्न विचारण्याची मुभा देऊन आपणांपैकीं कोणींतरी त्यांची उत्तरें द्यावीं. चवथा दिवस व्याख्यानमालेंत खर्च करावा; आणि अखेरच्या दिवशीं उत्सवाची परिसमाप्ति करावी. दुर्गापूजा अशाच प्रकारें चारपांच दिवस चालते. आतां आपला उत्सव अशा प्रकारें झाला तर अखेरच्या दिवसाशिवाय इतर प्रसंगीं फारशी मंडळी जमणार नाहीं हें खरें, तथापि तसें झालें तरी हरकत नाहीं. गर्दी पुष्कळ झाली म्हणजे श्रीरामकृष्णांचा संदेश तितका विस्तार पावला असें होत नाहीं.'

**शिष्यः**—महाराज, आपला हा बेत फार चांगला आहे. पुढल्या वर्षी या प्रमाणेंच आपण व्यवस्था करूं.

**स्वामीजीः**—आणि यंदां कां बरें नाहीं ? आतां माझी ही इच्छा तुम्हींच पार पाडली पाहिजे. या उत्सवांत कांहीं खटपट करण्याचा उत्साह मला राहिला नाहीं.

**शिष्यः**—महाराज, बाहेरून बरीच भक्तमंडळी यंदां जमा झाली आहे. नामसंकीर्तनाचे फडही पुष्कळ आले आहेत.

शिष्याचे हे शब्द ऐकून स्वामीजी खिडकीजवळ गेले आणि तिच्या गजांना धरून लोकांची गर्दी पहात कांहीं वेळ ते उभे राहिले.

थोड्या वेळानें खालीं बसून ते शिष्याला म्हणाले, ' ही सारी श्रीरामकृष्णांची लीला असून तींतील कांहीं सोंगे तुमच्याकडे आली आहेत. श्रीरामकृष्णांच्या नांवाबरोबर तुमचींही नांवें लोक घेऊं लागतील. जीं स्तोत्रें तूं आज लिहिलीं आहेस तीं पुढें मागे लोकांच्या तोंडीं होतील. ज्ञान आणि भक्ति यांचा उपदेश लोक त्यांतून घेतील. आत्मज्ञान हेंच मानवी जीविताचें अखेरचें साध्य आहे. आजपर्यंत होऊन गेलेल्या अवतारांचें रहस्य तुला कळलें आणि त्यांच्या ठिकाणीं तुझी भक्ति जडली तर तुझ्या ठिकाणीं ज्ञान स्वयमेव प्रगट होईल.'

**शिष्यः**—महाराज, आत्मज्ञान मला खरोखरच प्राप्त होईल काय ?

**स्वामीजीः**—श्रीरामकृष्णांच्या आशीर्वादानें भक्ति आणि ज्ञान यांचा उदय तुझ्या ठिकाणीं अवश्य होईल. संसारसुखांत तुझे चित्त फारसें रमणार नाहीं.

**शिष्यः**—महाराज, आपण कृपा केली, आणि माझ्या मनाचा हा दुबळे-पणा नाहींसा झाला, तरच कांहीं आशा आहे.

**स्वामीजीः**—अरे, असा भितोस कां ? तूं आतां येथें आला आहेस ना ? मग मुक्ति दूर कशी राहील ?

**शिष्यः**—महाराज, या अज्ञानतमांतून आपणच मला बाहेर काढलें पाहिजे. माझ्या उद्धाराचा भार आपणांवरच आहे.

**स्वामीजीः**—कोणी कोणाला मुक्ति देऊं शकतो काय, सांग बरें ? फार झालें तर गुरु कांहीं पडदे दूर करूं शकतील, पण याहून अधिक स्वतःच केलें पाहिजे. हे पडदे सबंध दूर झाले म्हणजे आत्मा स्वयप्रकाश आहेच.

**शिष्यः**—तर मग गुरुकृपेचें एवढें मोठें स्तोम शास्त्रांत वर्णिलें आहे तें कां ?

**स्वामीजीः**—गुरुकृपा म्हणजे काय ? ज्याला आत्मानुभव झाला आहे तो सामर्थ्याचें भांडार होऊन बसतो. तो मध्यबिंदूसारखा असून त्याच्या भोंवतीं एक शक्तिवलय बनत असतें. या वलयाच्या आंत जो कोणी येतो तो त्या शक्तीच्या तडाक्यांत सांपडतो. गुरूच्या कल्पनांचा प्रवेश त्याच्या चित्तांत होतो. विशेष खटपट न करितां अथवा भयंकर कष्टही न सोसतां या कल्पना त्याला आयत्याच मिळतात. याला तूं गुरुकृपा म्हणत असशील तर म्हण बापडा !

**शिष्यः**—तर मग गुरुकृपा म्हणजे याहून अधिक कांहींच नाहीं काय ?

**स्वामीजीः**—तसाही एक प्रकार आहे. अवतारी पुरुष अशी कृपा करूं शकतात. एकाच काय पण लक्षावधि जीवांना एकाच जन्मीं ते उद्धरूं शकतात. खरी गुरुकृपा म्हटली तर ही. या अवतारी पुरुषांबरोबर त्यांचे हस्तक म्हणून कांहीं मुक्त पुरुषही या लोकीं येत असतात. समजलें ना ?

**शिष्यः**—होय, महाराज. पण अशा महा अवतारांचें दर्शन घडण्याचें भाग्य ज्यांना प्राप्त झालें नसेल त्यांची वाट काय ?

**स्वामीजीः**—अशांनीं त्यांची भेट आपण होऊन घ्यावी. त्यांच्या पायावर मस्तक वाहून त्यांचा आशीर्वाद मिळवावा. ते देहानें हयात नसतील तर मनानें त्यांचें चिंतन करावें; आणि मानसपूजेनें त्यांचें वंदन करावें. मग ते मनुष्यरूपानेंही दिसतील आणि कृपा करतील.

**शिष्यः**—श्रीरामकृष्णांच्या समाधीनंतर त्यांचें दर्शन आपणांस कधीं झालें होतें काय ?

**स्वामीजीः**—त्यांच्या समाधिप्रवेशानंतर कांहीं काळ गाझीपुर येथें पव्हारीबाबांच्या संगतींत घालविला. त्यांच्या आश्रमाजवळच एका बगीच्यांत मी रहात होतों. या बगीच्यांत भुतें वावरतात असा समज सर्वत्र होता. पण मी स्वतः मोठा समंध असल्यामुळें बारीकसारीक भुतांखेतांना कोठून भीक घालणार ? या बागेंत पुष्कळशीं लिंबिणीचीं झाडें होतीं आणि त्यांवर फळेंही पुष्कळ लागत. त्या वेळीं मला आमांशाचा विकार झाला होता; आणि तेथें तर कोरड्या भाकरीशिवाय खाण्यास दुसरें कांहीं नव्हतें; तेव्हां पचनक्रिया चांगली चालावी म्हणून मी पुष्कळशीं लिंबें खात असें. पव्हारीबाबा अत्यंत प्रेमळ होते आणि माझीही भक्ति त्यांच्या ठिकाणीं जडली होती. एके दिवशीं एक विचार सहज माझ्या मनांत आला. श्रीरामकृष्णांच्या संगतींत इतकीं वर्षें काढून हा देह धडधाकड ठेवण्याची विद्याही मला साध्य झाली नाहीं. ही गोष्ट अवश्य करावयास हवी होती असें मला वाटलें. पव्हारीबाबा हठयोगांत प्रवीण आहेत असें माझ्या कानीं आलें होतें. तेव्हां त्यांच्या सान्निध्यांत हठयोगाचा अभ्यास करून देह सुस्थितीला आणावा असा विचार मीं केला. एखादी गोष्ट माझ्या मनांत आली, कीं ती झाल्याशिवाय मला चैनच पडत नाहीं.

माझी विनंति मान्य करून मला दीक्षा देण्याचा दिवस पव्हारीबाबांनीं निश्चित केला. रात्रीं या गोष्टीचा विचार करीत खाटेवर मी स्वस्थ पडलों असतां श्रीरामकृष्णांची मूर्ति माझ्या उजव्या बाजूकडे येऊन उभी राहिली. त्यांना दुःख होत असल्याचें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. माझें सर्वस्व अर्पण करून त्यांना मीं गुरु केलें होतें आणि आतां दुसरा गुरु करण्याचा विचार माझ्या मनांत आला होता. श्रीरामकृष्णांच्या त्या दुःखी चेहऱ्याकडे पाहतांच लाजेनें अर्धमेला होऊन त्यांच्याकडे मी पाहतच राहिलों. अशा स्थितींत सुमारें एक प्रहर लोटला. एवढया वेळांत माझ्या तोंडून एक शब्द-सुद्धां बाहेर पडला नाहीं. श्रीरामकृष्णांची मूर्तिही एकाएकीं अदृश्य झाली. हा प्रकार पाहिल्यानंतर माझ्या मनाची अतिशय चलबिचल झाली. पव्हारी-बाबांचा उपदेश त्या दिवशीं मीं घेतला नाहीं. या गोष्टीला तीनचार दिवस झाल्यानंतर पव्हारीबाबांचा विचार पुन्हां माझ्या मनांत आला; आणि त्याच रात्रीं पुन्हां श्रीरामकृष्ण पूर्वींसारखेच दिसले. हा प्रकार त्यानंतरही कित्येक दिवस एकसारखा सुरू होता. अखेरीस पव्हारीबाबांचा उपदेश घेण्याचा विचार मीं कायमचा सोडून दिला. अशा प्रकारचा विचार मनांत येतांच ज्या अर्थी श्रीरामकृष्ण दिसतात, त्या अर्थी या गोष्टीपासून कांहीं फायदा न होतां कांहीं तरी नुकसानच होईल, असें मला वाटलें.

कांहीं वेळ थांबून स्वामीजी पुढें म्हणाले, ‘श्रीरामकृष्णांना ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें ते खरोखर धन्य होत. त्यांच्या दर्शनानें ते स्वतःच नव्हे, तर त्यांचें कुलही पवित्र झालें असें समज. तुम्हां सर्वांना श्रीरामकृष्णांचें दर्शन होईल. तूं आतां येथें आला आहेस, याचा अर्थ त्यांच्या सान्निध्याला तूं आला आहेस. देवाधिदेवांपैकीं श्रीरामकृष्णांचा अवतार कोणी घेतला हें कोणाला ठाऊक नाहीं. त्यांच्या अगदीं जवळचे भक्तसुद्धां हें रहस्य जाणूं शकले नाहींत. अगदीं थोड्यांना या रहस्याचा पुसट पुसट वास आला आहे. कालेंकरून तें साऱ्यांनाच समजणार आहे.’

अशा रीतीनें आमचें संभाषण चालू असतां स्वामी निरंजनानंद यांनीं दारावर थाप मारली. ‘कोण आहे?’ असा प्रश्न शिष्यानें केला. तेव्हां निरं-जनानंद म्हणाले, ‘भगिनी निवेदिता आणि दुसऱ्या कांहीं इंग्रज स्त्रिया आल्या आहेत.’ शिष्यानें उठून दार उघडिलें. तेव्हां त्या स्त्रिया आंत आल्या.

स्वामीजीसमोर पसरलेल्या जाजमावर बसून स्वामीजींच्या प्रकृतीची चौकशी त्यांनीं केली. आणखी थोडीं उत्तरें प्रत्युत्तरें होऊन त्या स्त्रिया निघून गेल्या. नंतर स्वामीजी शिष्याला म्हणाले, 'त्या कशा सुसंस्कृत आहेत, पाहिलेंस ? याच बगाली स्त्रिया असत्या तर किमान पक्ष अर्धा तास तरी त्यांनीं मला बडबड करण्यास लाविलें असतें. माझी प्रकृति बरी नाहीं हा विचार त्यांच्या मनांत आला नसता.'

आतां अडीच वाजण्याचा सुमार झाला होता. बाहेर लोकांची गर्दीही पुष्कळ जमली होती. गर्दी कितपत जमली आहे हें पहावें असें शिष्याच्या मनांत आलें. त्याचा हा भाव जाणून स्वामीजी म्हणाले, 'जा, जरा हिंडून फिरून ये; पण लवकर ये बरें !'

***

[ ३६ ]

[ स्थळः—बेलूरमठ, सन १९०२ ]

पूर्व बंगाल्यांतील आपला प्रवास संपवून स्वामीजी मठांत येऊन राहिले होते. त्यांची रहाणी एखाद्या मुलाला शोभेशी अगदीं साधी होती. प्रत्येक वर्षी कांहीं संताळ मजूर कामासाठीं मठांत येत असत. त्यांच्याशीं थट्टा मस्करी करून आणि त्यांच्याशीं गप्पागोष्टी करून त्यांच्या सुखदुःखाच्या कहाण्या स्वामीजी ऐकून घेत. एके दिवशीं कलकत्त्यांतील कांहीं प्रसिद्ध गृहस्थ स्वामीजींच्या भेटीसाठीं मठांत आले होते. त्या वेळीं आपल्या संताळ मंडळीशीं बोलण्यांत स्वामीजी गढून गेले होते. इतक्यांत ते गृहस्थ भेटीला येत असल्याची वर्दी आली. तेव्हां स्वामीजी म्हणाले, 'त्यांना भेटण्यास आज मला फुरसत नाहीं. या प्रेमळ मंडळीशींच मी बोलत बसणार आहें.' आणि खरोखरच स्वामीजींनीं त्या दिवशीं कोणाही 'सभ्य' गृहस्थास दर्शन दिलें नाहीं.

या संताळांत 'केष्टा' या नांवाचा एक मनुष्य होता. त्यावर स्वामीजींचें अतिशय प्रेम असे. तो काम करीत असतां स्वामीजी कांहीं बोलूं लागले म्हणजे तो म्हणे, 'स्वामी महाराज, आम्ही काम करीत असतां येथें येऊन रिकाम्या गोष्टी तुम्ही सांगूं नका. तुमच्याशीं बोलतांना हात थांबतो, आणि काम झालें

नाहीं म्हणजे ते कारभारी स्वामी येऊन आमची खरडपट्टी काढतात.' यावर स्वामीजींनीं म्हणावें, 'अरे, तूं भिऊं नको. कारभाऱ्याला दोन गोष्टी मी सांगेन.' असें बोलतां बोलतांच त्या लोकांच्या रीतीभातींची आणि संसारी राहणीची माहिती स्वामीजींनीं त्याजपासून करून घ्यावी.

एके दिवशीं स्वामीजी केष्टाला म्हणाले, "अरे, तूं आज येथें जेवायला राहशील का ?" केष्टानें उत्तर दिलें, 'छे, छे ! तुमच्या शिवाशिवीचें अन्न मला चालावयाचें नाहीं. तुम्ही आपल्या हातानें मीठ टाकलेलें अन्न मीं खाल्लें तर माझी जात मला वाळीत टाकील.' स्वामीजी म्हणाले, 'मिठाशिवायच केलेले पदार्थ आम्ही तुला वाढूं, मग झालें कीं नाहीं ?' केष्टा म्हणाला, 'ठीक आहे महाराज; मग चालेल.' यानंतर भाकरी, दूध, दहीं इत्यादि पदार्थ संताळ लोकांसाठीं तयार करवून स्वामीजींनीं आपल्या समक्ष त्यांना भोजन घातलें. हा स्वयंपाक पाहून केष्टा म्हणाला, 'का हो, महाराज, इतके चांगले पदार्थ तुम्हीं आणले तरी कोठून ? साऱ्या जन्मांत आम्हीं ते पाहिलेले सुद्धां नाहींत.' स्वामीजींनीं उत्तर दिलें, 'तुम्हीं नारायणस्वरूप आहांत. मला मिळाला तितका नैवेद्य मीं आज तुम्हांस दिला. दरिद्र नारायणांची सेवा हाच माझा धर्म.' स्वामीजी जसें बोलत तसेंच प्रत्यक्ष आचरूनही दाखवीत.

भोजनानतर संताळ मंडळी विश्रांतीसाठीं इकडे तिकडे जाऊन पडली. स्वामीजी शिष्याला म्हणाले, 'असे लोक खरोखरच नारायणरूप होत. इतका सरळपणा आणि इतकें निर्व्याज प्रेम मला तर दुसऱ्या कोठें आढळलें नाहीं. या लोकांच्या कष्टमय जीविताची कल्पना अंशतः तरी तुम्हांला येते काय ? तसें नसेल तर गेरूचा पोषाक करून काय फायदा ? दुसऱ्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करणें हाच खरा संन्यास. चांगल्या चांगल्या वस्तू या लोकांनीं आपल्या जन्मांत पाहिल्यासुद्धां नाहींत. हा मठ विकून टाकावा आणि त्याच्या विक्रीचा पैसा गरीब गुरिबांस वांटून टाकावा असेंसुद्धां कित्येक वेळां माझ्या मनांत येतें. विश्रांति घ्यायला सावली पाहिजे तर झाडें काय थोडीं पडलीं आहेत ? त्यासाठीं एवढी इमारतच पाहिजे असें नाहीं. शेंकडों माणसें उपाशीं मरत असतां आपला हात आपल्या तोंडाकडे जातो तरी कसा, याचेंच मला नवल वाटलें. मी अमेरिकेंत आणि युरोपांत होतों, तेव्हां तेथील अगदीं कंगाल

राहणीसुद्धां पाहून माझ्या मनांत असा विचार येई कीं, कांहीं लोक गुलाबाच्या पुष्पशय्येवर लोळत असतां कांहींना फाटकीं रकटींसुद्धां मिळत नाहींत. कांहीं लोक घृतयुक्त शाल्मेदनें झोडीत असतां दुसरीकडे कांहींना खडखडीत उपास पडत असतो. यूरोपांतील गरीब गुरीबसुद्धां मिष्टान्नें खात असतां आमच्या इकडे कोंड्याची भाकरसुद्धां मिळण्याची मारामार ! असे विचार माझ्या मनांत येऊं लागले म्हणजे जगन्मातेची प्रार्थना करून मी म्हणें ' आई, आमच्या लोकांना यांतून बाहेर पडण्यास कांहींच मार्ग उरला नाहीं काय?' पाश्चात्य देशांत मी धर्मप्रचारासाठीं गेलों, यांत माझा एक हेतु असा होता कीं, आपल्या देशांतील लोकांस अन्नाला लावण्याची कांहीं तरतूद झाल्यास पहावी.

'आपल्या इकडील दरिद्रावस्था पाहून मला पूजा अर्चा सुचेनाशी झाली. ग्रंथवाचनाकडेही मन लागेना. खेडोपाडीं हिंडून भिक्षा मागावी, श्रीमंतांच्या दारीं जाऊन याचना करावी आणि त्यांजपासून पैसे मिळवावे व दरिद्र्यांच्या सेवेला ते लावावे, असा विचार माझ्या मनांत येऊं लागला. गरिबांच्या स्थितीचा विचारसुद्धां आमचे लोक करीत नाहींत. वास्तविक पाहतां साऱ्या देशाची मदार या गरीब लोकांवर. तेच आपल्या निढळच्या घामानें आमच्या-साठीं अन्न उत्पन्न करितात. या मजुरांनीं आणि झाडूवाल्यांनीं एक दिवस काम बंद पाडलें तर या मोठमोठ्या शहरांची काय दशा होईल बरें? पण हा विचारसुद्धां शहरांतल्या सुखवस्तु लोकांच्या मनांत येत नाहीं. या मजुरांचीं सुखदुःखें ऐकून घेण्याससुद्धां कोणी तयार नाहीं. मद्रासेकडे हजारों पराया लोक ख्रिस्ती होतात. हिंदु लोकांची सहानुकंपा त्यांना नाहीं हेंच त्याचें कारण. केवळ पोटाची खळगी भरण्यासाठीं ते ख्रिस्ती होतात असें तुम्ही समजूं नका. वरिष्ठ जातींच्या मनांत त्यांच्याबद्दल आपलेपणा नाहीं हेंच खरें कारण. रात्रंदिवस आमचा ध्यास एकच. एखाद्या म्हाराधेडाची गांठ पडली कीं, 'हां, शिवूं नको' हेच आमचे पहिले शब्द. त्यांच्याबद्दल दया आणि अनुकंपा हीं उभ्या देशांत तरी आढळतात काय? जिकडे पहावें तिकडे 'शिवूं नको' हा जप करणारांचाच सारा भरणा. असे विचार माझ्या मनांत कित्येक वेळां अति-शय जोरानें येऊं लागतात; आणि मग हें सारें बंड मोडून टाकण्यासाठीं अट्टाहास करावा असें वाटूं लागतें. श्रीरामकृष्णांच्या विजयी नामाचा घोष करून या चालीवर तुटून पडावें असें वाटूं लागतें. हे लोक जागे झाल्याशिवाय

जगन्माता तरी कोठून जागी होणार ? या लोकांच्या जाड्याभरड्या अन्नवस्त्राचीसुद्धां तरतूद आपण केली नाहीं तर जन्माला येऊन आपण केलें तरी काय ? हे लोक किती साधेभोळे आहेत बरें ? आपला संसारसुद्धां धड त्यांना कळत नाहीं; त्यांना स्वार्थही नीटसा समजत नाहीं. काम करीत सुटावें आणि नशीबाला दोष द्यावा एवढेंच त्यांना समजतें. यामुळें जरूरीच्या अन्नवस्त्रालाही ते महाग झाले आहेत. त्यांना आपण नवी दृष्टि दिली पाहिजे. त्यांच्यांत आणि आमच्यांत वास्तविक कांहीं फरक आहे काय ? आमच्यांत जें ब्रह्म आणि जी शक्ति तीच त्यांच्यांतही आहे. व्यक्तदशेचाच काय तो फरक. शरिराच्या साऱ्या भागांत रक्त सारख्या प्रमाणानें प्रसरण पावत राहिलें नाहीं तर देहधारणा शक्य होईल काय ? राष्ट्रदेहालाही हाच सिद्धांत लागू आहे. पक्षघातानें देहाचा एखादा भाग लुला झाला तर बाकीच्या चांगल्या भागानें तरी कितपत काम होईल ? एका देहाची ही गोष्ट राष्ट्रालाही लागू आहे हें तुम्ही पक्कें समजा.'

**शिष्यः**—महाराज, आपल्या देशांत धर्मांचे आणि मताचे इतके भेद आहेत कीं, त्यांच्यांत एकसूत्रता आणणें दुष्कर आहे.

**स्वामीजीः**—कोणतेंही काम तुला कठीणच वाटतें. हें कठीण, तें कठीण, अशीच तुझी बुद्धि असेल, तर तूं येथें येऊं नयेस हें बरें. परमेश्वराच्या कृपेनें सर्व कामें सुकर होत असतात. दरिद्र्यांची आणि आर्तांची सेवा करणें इतकेंच तुझें काम. त्या सेवेचें चीज पुढें काय होतें याचा विचार तूं करूं नयेस. सेवा करतांना जात, वर्ण इत्यादि भेद मनांत आणावयाचे नाहींत हें मात्र आपण विसरूं नये. काम करीत राहणें इतकाच आपला धर्म. मग त्याचें फळ आपोआप येतच असतें. नुसती जुन्याची मोडतोड करावी अशी माझी चाल नाहीं. त्यांत कांहीं तरी भर घालून सुधारणा करावी ही माझी पद्धत आहे. कोणत्याही देशाचा इतिहास तूं पाहिलास तर एखाद्या विशिष्ट काळीं कोणी तरी मध्यवर्ती महापुरुष तेथें निर्माण झाला असल्याचें तुला आढळून येईल. त्याच्या कल्पनांनीं तो देश जागा झालेला असतो. मग त्या पुरुषाचे शेंकडों अनुयायी त्याच्या कल्पनांना मूर्त रूप देऊन जगाचें कल्याण करितात. तुम्ही सर्व तरुण बुद्धिमान् आहां. तुम्हांस येथें येऊन किती तरी काळ लोटला,

पण येथें येऊन तुम्हीं कोणती कामगिरी केली ? लोकसेवेखातर एकसुद्धां जन्म अर्पण करणें तुम्हांला शक्य नाहीं काय ? मग पुढल्या जन्मीं वेदान्त आणि इतर मतें यांचा हवा तितका अभ्यास तुम्ही करा. तुमचा सारा चालू जन्म लोकसेवेंत खर्च झाला तर तुमचें येथें येणें फुकट गेलें नाहीं असें मी समजेन.

इतकें बोलून स्वामीजी स्तब्ध झाले. गूढ विचारांत कांहीं काळ ते निमग्न होऊन बसले. थोड्या वेळानें ते म्हणाले, ' एवढी तपश्चर्या करून मला एकच सत्य सांपडलें आहे, तें हेंच कीं, प्रत्येक जीव शिवस्वरूप आहे. याबाहेर दुसऱ्या ईश्वराला जगांत अस्तित्व नाहीं. जो जीवसेवा करील त्यानें शिवसेवा केली असेंच समजावें. आज जें कांहीं तुला मीं सांगितलें तें आपल्या अंतः-करणावर पक्कें कोरून ठेव. त्याचा विसर केव्हांही पडूं देऊं नको.'

***

[ ३७ ]

[ स्थळः—बेलूरमठ, सन १९०२ ]

आज शनिवार होता. सायंकाळ होण्यास घटकाभऱ्याचा अवकाश असतांच शिष्य मठांत आला. अभ्यासाची कडक शिस्त मठांत लावून दिलेली होती. सर्व ब्रह्मचाऱ्यांनीं आणि संन्याशांनीं मोठ्या पहांटेस उठून जप आणि ध्यान करावें असा कडक नियम स्वामीजींनीं घालून दिला होता. आतांशा स्वामी-जींना झोंप अगदींच कमी येत असे. पहांटे तीन वाजतांच ते उठत.

मठांत येऊन आणि स्वामीजींना वंदन करून शिष्य त्यांच्यासमोर बसला. तेव्हां ते म्हणाले, ' आमची येथील मंडळी आतां कशा प्रकारें अभ्यास करते तें पाहिलेंस ? जप आणि ध्यान यांत त्यांचा सकाळसंध्याकाळचा पुष्कळसा वेळ खर्च होतो. आतां आम्हीं एक घंटा आणली असून सर्वांना जागें करण्यासाठीं पहांटेस ती वाजवितों. प्रत्येक जणानें अरुणोदयापूर्वी उठलेंच पाहिजे असा सक्त नियम आम्हीं केला आहे. ' पहांटेस आणि सायंकाळीं सत्त्व गुणाचा उदय होत असतो ' असें श्रीरामकृष्ण म्हणत असत. याकरितां याच वेळा प्रत्येक अभ्यासकानें साधल्या पाहिजेत. मन लावून याच वेळीं त्यानें मार्गस्थ झालें पाहिजे.

श्रीरामकृष्णांच्या समाधिकालानंतर बडानगरच्या मठांत असाच अभ्यास आम्ही करीत असूं. पहांटे तीन वाजतां उठून आणि प्रातर्विधि आटोपून जप आणि ध्यान हीं आम्ही करीत असूं. त्या वेळीं आमची चित्तवृत्ति किती निर्विकार होत असे म्हणून सांगूं ! अरे, फार काय, पण जगाचें अस्तित्वसुद्धां आम्ही विसरत असूं. त्या वेळीं श्रीरामकृष्णांच्या पूजेची व्यवस्था रामकृष्णानंदाकडे असे. अहोरात्र हेंच काम त्याला पुरेसें होतें. कारण, साऱ्या मठाची व्यवस्था तोच पहात असे. कुटुंबाचा सारा दंड सोसणारा यजमान तोच होता. भिक्षाही त्यानेंच मागावी; आणि आम्हाला जेऊंही त्यानेंच घालावें. पूजासाहित्यसुद्धां भिक्षा मागूनच त्याला जमवावें लागत असे. कित्येक वेळां जपध्यानादि कार्यांत संध्याकाळचे पांच वाजेपर्यंतसुद्धां आम्ही निमग्न रहात असूं. बिचाऱ्या रामकृष्णानंदानें आमची वाट पहात तिष्ठत बसावें, आणि अखेरीस एकेकाला बाहेर ओढून जेऊं घालावें. अहाहा ! त्याची भक्ति किती दृढ होती म्हणून वर्णावी !'

शिष्यः—महाराज, मग मठाचा खर्च तरी कसा भागत असे ?

**स्वामीजीः**—वेड्यासारखा विचारतोस काय ? आम्ही बोलूनचालून अवधूत. कटोऱ्यांत जें कांहीं पडेल त्यावर आमचा खर्च आम्ही भागवीत असूं. सुरेश आणि बलराम हे दोघेही आज हयात नाहींत. ते असते तर हा मठ पाहून त्यांना परमानंद झाला असता. सुरेशबाबूचें नांव तूं ऐकलें असशीलच. या मठाचा उत्पादक तोच असेंही एका अर्थानें म्हणतां येईल. बडानगर मठाचा खर्च तोच चालवीत असे. आमचें अधिकउणें पाहण्यावांचून दुसरा विचारच त्याच्या मनांत नव्हता. खरोखर त्याच्या श्रद्धेला कोठें जोड सांपडणार नाहीं.

शिष्यः—सुरेशबाबू मृत्युशय्येवर असतां आपण त्यांची भेट वारंवार घेत नव्हतां असें मीं ऐकिलें.

**स्वामीजीः**—काय करावें ? त्याच्या आप्तांनीं आम्हांला परवानगी दिली नाहीं. पण जाऊं दे; तें एक महाभारतच आहे. तुला खरेंच सांगतों कीं आप्तस्वकीयांची दृष्टिच कांहीं वेगळी असते. तुम्ही मेलां कीं जगलां याचा फारसा हिशेबही ते ठेवीत नसतात. तुमच्याजवळ कांहीं माया असली तर तिच्या प्राप्तीसाठीं तुम्ही जिवंत असतानांच त्यांच्यांत तंटेबखेडे सुरू होतात. तुम्ही

मरणाच्या दारीं बसलां असलां तरी तुम्हांस कांहीं त्रास होईल कीं काय याचासुद्धां कोणी विचार करीत नाहीं. बेट्या, फार काय सांगूं, पण तुझी बायको आणि तुझीं पोरेंसुद्धां तुझ्या मृत्युशय्येवर तुझें सांत्वन करणार नाहींत. अखेरीस आपण एकटे हा अनुभव तुला येईल. जगाची रीत अशी आहे.

थोडा वेळ थांबून स्वामीजी मठासंबंधीं पुढें बोलूं लागले. 'पैशाची अडचण इतकी होती कीं, हा मठ बंद करून टाकावा असें माझ्या मनांत येत असे. पण काय करावें ? अशा अर्थाचें मी कांहीं बोललों कीं, रामकृष्णानंद तें ऐकूनसुद्धां घेत नसे. मठाचा मुख्य पुरुष म्हटला तर रामकृष्णानंद हाच होय. कधीं कधीं मठाची स्थिति अशी असे कीं, आमच्याजवळ धान्याचा एक कणही नसे. भिक्षा मागून थोडे फार तांदुळ मिळाले तर तोंडीं लावण्यास मीठसुद्धां नसे. कधीं कधीं मीठ आणि भात यांची जोडी पडे. अशी स्थिति होती तथापि आम्ही कोणी तिची क्षिति बाळगली नाहीं. आमचें सारें लक्ष त्यावेळीं अभ्यासाकडे लागलेलें होतें. कधीं कधीं भाजी करावीशी वाटली तर तोंडलीच्या पाल्याची करीत असूं. एके वेळीं तर ही भाजी आणि मीठ भात यांजवर आम्ही सबंध महिना काढला. आमची त्या वेळची स्थिति पाहून महापुरुषसुद्धां चकित झाले असते. वस्तुस्थिति अशी आहे कीं, तुमच्यांत कांहीं खरा राम असला तर बिकट परिस्थितीचाही कोट फोडून तो बाहेर पडल्यावांचून राहात नाहीं. किंबहुना हा कोट जों जों अधिक बळकट तों तों अंतरात्म्याचें सामर्थ्य वाढतच जातें. हें नितांत सत्य तुम्ही ध्यानांत धरा. आतां मठांत गाद्या गिरद्या आहेत आणि खाण्यापिण्याचेंही स्वास्थ्य आहे याचें कारण इतकेंच कीं, आमच्या सारखी स्थिति सध्याच्या संन्याशांस सोसवणार नाहीं हें मला माहीत आहे. श्रीरामकृष्णांचें जिवंत उदाहरण आमच्या समोर होतें. भुकेला कोंडा आणि उशाला धोंडा अशा स्थितींत ते कसे राहात हें आम्ही प्रत्यक्ष पाहिलें होतें. यामुळें असल्या स्थितीची फारशी क्षिति आम्हीं बाळगली नाहीं. आतांच्या पिढीच्या पोरांना असे हाल सहनच होणार नाहींत. यासाठींच अशा प्रकारच्या अन्नाच्छादनाची तरतूद मला करावी लागली. पोटभर अन्न आणि आंगभर वस्त्र हीं मिळालीं तरच आजकालचे तरुण या अभ्यासांत पुढें सरसावण्याचा यत्न करतील. अशी तजवीज आधींच असली तर लोकसेवेला ते तयार होतील.'

**शिष्यः**—महाराज, आपल्या मठांतील राहणीसंबंधीं बाहेरचे लोक बरीचशी टीका करीत असतात. या गाद्यागिरद्या त्यांना पसंत पडत नाहींत.

**स्वामीजीः**—त्यांना खुशाल टीका करूंदे. थट्टेसाठीं कां होईना, पण या मठाचें अस्तित्व त्यांना भासत राहील हें कांहीं थोडें नव्हे. तर मग अत्यंत कष्ट सोसूनच मुक्तिमार्ग सोपा होतो असें त्यांचें म्हणणें आहे काय ? ‘लोकांकडे लक्ष देऊं नये. ते क्षुद्र जंतू आहेत असें समजावें’ असें श्रीरामकृष्ण म्हणत. अरे, प्रत्येकाच्या मुखचर्येकडे पाहून आम्हीं आमचा कार्यक्रम ठरवावा असें तर तुझें म्हणणें नाहीं ना ? जाऊदे. लोकांचें म्हणणें मनास आणण्यांत अर्थ नाहीं.

**शिष्यः**—महाराज, सर्व लोक नारायण आहेत असें आपणच कधीं कधीं म्हणतां. अत्यंत दरिद्री आणि रोगीसुद्धां आपणांस नारायणस्वरूप वाटतात आणि आतां तर साऱ्यांनाच कृमिकीटकांच्या ओळींत आपण बसवितां; आपल्या या विरोधांत खरें म्हणून काय समजावें ?

**स्वामीजीः**—बाबारे, सर्व नारायणस्वरूप आहेत हें खरें. पण सारेच नारायण आमच्या गाद्यागिरद्यांकडे लक्ष देत नाहींत. आपणांस जो मार्ग चांगला दिसेल तो आपण चोखाळावा; आणि त्यावर कोणी टीका केली तर तिकडे लक्ष देऊं नये अशी माझी रीत आहे. लोकमताची अशी उपेक्षा करणें याचेंच नांव त्यांना जंतूसारखें मानणें होय. जंतु म्हटले म्हणजे ते खरोखरच तसे तुच्छ होत असें म्हणण्याचा भाव नाहीं. स्वतःच्या मार्गासंबंधीं इतकी दृढ भक्ति ज्याच्याजवळ असेल तोच सर्व कांहीं मिळवूं शकेल. साध्याची प्राप्ति कोणाला आज होईल तर कोणाला उद्यां. पण दृढ निश्चय आधीं पाहिजे. मग फलप्राप्ति अवश्य होणारच. आज आमच्याजवळ जें अल्पस्वल्प तरी साधन तुला दिसतें त्याचें कारण आमचा दृढ निश्चय हेंच होय. तो नसता तर आमचे हाल कुत्रा खाताना. कसल्या कष्टाचा एक एक दिवस आम्हीं घालविला याची नीटशी कल्पनासुद्धां तुला होणार नाहीं. एके दिवशीं तर अन्नावांचून भटकत असतां भुकेनें मला घेरी येऊन एका घराच्या पडवींत मी बेशुद्ध होऊन पडलों. पावसाची एक संबंध सर मला सचैल स्नान घालून गेली तरी तिचा पत्तासुद्धां मला नव्हता. कांहीं वेळानें मी शुद्धीवर आलों पण मला कलकत्त्यांत

करावयाच्या कामगिऱ्या इतक्या होत्या कीं, तो सारा दिवस अन्नपाण्यावांचून मला फिरावें लागलें. रात्रीं दहा अकरा वाजतां मी मठांत आलों तेव्हां अन्नाची आणि माझी गांठ पडली; आणि असे प्रसंग एक दोन वेळांच आले असें समजूं नको.

एवढें बोलून स्वामीजी कांहीं काळ आपल्याच तंद्रींत स्तब्ध बसून राहिले; आणि मग पुन्हां बोलू लागले, 'खरी संन्यस्त वृत्ति प्राप्त होणें दुर्घट आहे. याच्या इतका कठीण दुसरा आश्रम नाहीं. या कड्यावरून थोडा जरी पाय घसरला तरी साधक खोल दरींत पडून त्याचे तुकडे तुकडे होतात. एके दिवशीं मी आग्र्याहून वृंदावनला पायीं जात होतों. वृंदावन सुमारें दोन मैल राहिलें असेल, तों रस्त्याच्या कडेला एक मनुष्य चिलीम ओढीत बसलेला दिसला. तें पाहून मलाही चिलीम ओढण्याची इच्छा झाली. तेव्हां मीं त्याच्याजवळ जाऊन म्हटलें, 'भल्या गृहस्था, मलाही एक झुरका देतोस का?' माझे शब्द ऐकून तो अगदीं गडबडून गेलेला दिसला. तो म्हणाला, 'महाराज मी धेड आहें' जुन्या संस्कारांतून मीही मुक्त झालों नव्हतों. त्याचे शब्द ऐकून माझी पावलें चटकन् मागें झालीं आणि मी तडक वृंदावनाकडे निघालों. थोडा वेळ चालल्यावर माझ्या मनांत विचार आला कीं मी संन्यासदीक्षा घेतली त्याच दिवशीं जातगोताचा सर्व विचार सोडून दिला. स्वकीय परकीय, मान अपमान इत्यादि लौकिक द्वंद्वांना मी त्याच दिवशीं तिलांजलि दिली. पण काय चमत्कार पहा? तो धेड आहे असें ऐकतांच धक्का बसल्याप्रमाणें मी मागें झालों. माझ्या मनाची विलक्षण चलबिचल झाली. त्याच्या हातची चिलीम घेण्याचें मला धैर्य झालें नाहीं. इतका विचार येऊन जाईपर्यंत सुमारें अर्धा मैल मी चालून गेलों होतों. अखेरीस माझी मलाच लाज वाटून मी तेथून परत फिरलों. परत येऊन पाहतों तो धेड तेथेंच होता. त्याच्याजवळ जाऊन मीं त्याला म्हटलें, 'माझ्या मित्रा, आधीं चिलीम भर बघूं.' पण कांहीं केल्या तो चिलीम भरीना. तुझ्या हातची चिलीम ओढल्याशिवाय मी येथून हालणारच नाहीं, असे म्हणून मी बैठक मारली, तेव्हां निरुपाय होऊन त्यानें मला चिलीम तयार करून दिली. मग मींही मोठ्या आनंदानें चार झुरके मारले व आनंदानें वृंदावनाकडे निघून गेलों. संन्यासदीक्षा घेतली कीं वारंवार स्वतःचें परीक्षण करावें लागतें. नानाविध लौकिक द्वंद्वांच्या बाहेर आपण गेलों आहों

कीं नाहीं हें कसून पहावें लागतें. संन्यास धर्म तंतोतंत पाळणें अत्यंत दुष्कर आहे. उच्चार आणि आचार यांत काडीचाही फरक असतां उपयोगी नाहीं.'

**शिष्यः**—महाराज, आपण कधीं गृहस्थाश्रमाची तारीफ करितां तर कधीं संन्यास श्रेष्ठ म्हणतां, यांत आम्ही समजावें तरी काय ?

**स्वामीजीः**—नाना मतें ऐकून घ्यावीं पण आपल्या पचनीं काय पडेल हें ज्याचें त्यानेंच ठरविलें पाहिजे. सारासार विचार पाहून जें एक वेळां पसंत केलें त्याची चिकाटी मात्र घट्ट धरली पाहिजे. चावा घेतल्यानंतर शिकारी कुत्रा ज्याप्रमाणें मेला तरी आपला डास सोडीत नाहीं, त्याचप्रमाणें आपणही आपल्या मार्गाला मगरमिठी घालून बसलें पाहिजे.

स्वामीजी तेथून उठून खालीं आले आणि शिष्यही त्यांच्या मागोमाग आला; खालच्या पडवींत फिरतां फिरतां '**शिवोऽहं शिवोऽहं**' असें ते म्हणूं लागले. आणि लौकरच एका अंबास्तोत्रास त्यांनीं प्रारंभ केला.

***

## [ ३८ ]

### [ **स्थळः**--बेलूर मठ, १९०२ ]

शिष्यानें गेली रात्र स्वामीजींच्या खोलींतच घालविली होती. स्वामीजींनीं त्याला चार वाजतां उठविलें आणि म्हटलें, 'जा, आणि घंटा वाजवून साऱ्यांना जागे कर.' आज्ञेप्रमाणें जाऊन शिष्यानें घंटा वाजविली तेव्हां सर्व साधु व ब्रह्मचारी मंडळी जागी होऊन पुढील उद्योगास लागली.

स्वामीजींच्या आज्ञेप्रमाणें स्वामी ब्रह्मानंदांच्या खोलीजवळही शिष्यानें घंटा वाजविली, तेव्हां स्वामी आंतून ओरडून म्हणाले 'अरे देवा, स्वामीजींच्या या शिष्यानें आम्हाला सळो का पळो करून सोडलें.' हे शब्द शिष्यानें स्वामीजींस सांगितले तेव्हां ते खदखदां हंसून म्हणाले, 'ठीक, भलें केलेंस.'

स्वामीजीही प्रातर्विधी आटोपून आले आणि त्यांच्यासाठीं मांडलेल्या आसनावर ते पूर्वाभिमुख बसले. नंतर दुसऱ्या एका आसनाकडे बोट करून ते शिष्याला म्हणाले, 'तेथें बसून ध्यान कर.'

आसनस्थ झाल्याबरोबर थोड्याच वेळानें स्वामीजी अगदीं शांत आणि निश्चल झाले. जणूं काय दगडी पुतळाच. त्याचे श्वासोच्छ्वासही कळे न कळे इतके मंद झाले.

सुमारें दीड तासानें स्वामीजी ध्यानांतून बाहेर आले. **'शिवोऽहं शिवोऽहं'** असा गंभीर ध्वनी त्यांनीं केला. त्या वेळीं त्यांच्या मुद्रेवरचें तेज, शांति आणि गांभीर्य हीं केवळ अवर्णनीय होतीं. थोड्या वेळानें श्रीरामकृष्णांच्या प्रतिमेला वंदन करून खालीं गेले आणि मठाच्या अंगणांत शतपावली करूं लागले. शिष्यही त्यांच्या मागोमाग होताच. ते शिष्याला म्हणाले, 'आतांशा मठवासी मंडळी कसा अभ्यास करतात हें पाहिलेंस ना ? ध्यान गाढावस्थेपर्यंत पोहोंचलें तर नानाप्रकारचे आश्चर्यकारक अनुभव येतात. बडानगरमठांत असतां एके दिवशीं इडा आणि पिंगला या नाड्यांचें दर्शन मला झालें. अल्पपरिश्रमानें यांचें दर्शन कोणालाही करून घेतां येण्यासारखें आहे. सुषुम्नेचें दर्शन मात्र कठीण आहे. तिचें दर्शन झालें म्हणजे मनुष्य सर्वद्रष्टा होतो. गुरूच्या ठिकाणीं अव्यभिचारी निष्ठा आणि ध्यान व जप यांच्यायोगें या गोष्टी क्रमानें आपोआपच घडून येत असतात. त्यासाठीं वेगळे श्रम करावे लागत नाहींत. '**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः ।**' असा एकनिष्ठ भाव मात्र पाहिजे.'

शिष्यानें स्वामीजींसाठीं चिलीम तयार करून आणली. ती घेऊन झुरके मारतां मारतां स्वामीजी म्हणाले, 'अंतर्वर्ती आत्मा आधींचाच मुक्त आणि सर्वज्ञ आहे. तो सदोदित जागाच आहे. त्याचा अनुभव होतांच मायामय विश्व अदृश्य होतें. त्याच्या अनुभवाचा मार्ग ध्यान व समाधि हाच होय. सर्व हृदयांत त्याचा सारखाच वास आहे. जो झटून अभ्यास करतो त्याच्या ठिकाणीं कुंडलिनी लवकर जागृत होते. कुंडलिनी म्हणजे मनुष्याच्या ठिकाणीं असलेली विश्वशक्ति. ती जागी झाली म्हणजे सुषुम्नेंतून वर चढूं लागते. ती मस्तकापर्यंत पोहोंचली म्हणजे दृष्टीचे सर्व विक्षेप नाहींसे होऊन साधकाला आत्मानुभव होतो.'

**शिष्यः**—महाराज, या गोष्टी मी ग्रंथांतरीं नुसत्या वाचल्या आहेत. पण त्यांपैकीं एकीचाही अनुभव मला अद्यापि नाहीं.

**स्वामीजीः**—'**कालेनात्मनि विंदति**' कित्येकांना तसा अनुभव लवकर होतो तर दुसऱ्या कित्येकांना तो जरा उशिरां होतो इतकेंच. मुख्य मुद्दा

अभ्यासाच्या दृढतेचा आहे. त्याकडे केव्हांही दुर्लक्ष करतां उपयोगी नाहीं. या विषयाची पाठ सोडावयाची नाहीं असा निश्चय पाहिजे. खरा पुरुषार्थ हाच. भांड्यांतून पडणाऱ्या तेलाची धार ज्याप्रमाणें अखंड असते त्याचप्रमाणें आपल्या ध्येयाकडे आपलें चित्त अखंड असलें पाहिजे. सामान्य व्यवहारी मनुष्याची बुद्धि शेंकडों विषयांत पांगलेली असते. त्यानें ध्यानाच्या अभ्यासास सुरवात केली तरी त्याचें मन कांहीं काळ भटकत असतेंच. पण अशा प्रसंगीं आपली चिकाटी त्यानें सोडूं नये. मनांत कोणतीही इच्छा उद्भवली तरी चित्त शांत करण्याचा यत्न करावा. प्रथम शरीर निश्चल करावें, मग आपण जणूंकाय प्रेक्षक आहों अशा भावनेनें मनांत येणाऱ्या विचारांकडे अवलोकन करावें. साधक अशा रीतीनें चालला तर त्याचें मन लवकरच शांत होईल; विचारांच्या लाटा कमी कमी होत जातील. असे तरंग उठत राहणें हा मनाचा एक धर्म आहे. या तरंगांच्या रूपानें विचारशक्ति स्पष्टीकरणास येत असते. ज्या विषयावर पुष्कळसा खोल विचार तुम्हीं आधींच केला असेल तो विषय तरंगांचें रूप सोडून त्याहून अधिक दृढरूपानें मनाच्या खोल भागांत दडून बसतो. ध्यानाच्या वेळी मनाच्या खोल भागाला चालना मिळत असल्यामुळें तेथें असलेले विषय जागे होऊन मनाच्या पृष्ठभागावर येऊं लागतात. अशा प्रकारें चित्तावर लाटा उठणें अपरिहार्य असतें. तथापि आपलें मन एकीकृत होत आहे याचें तें लक्षण असतें. कित्येक वेळां एखाद्या विशिष्ट कल्पनासमूहावर आपलें मन केंद्रीभूत होतें. तो एक समूह सोडून त्याचें दुसरीकडे भटकणें बंद झालेलें असतें. अशा स्थितीला सविकल्प ध्यान म्हणतात; आणि ही पायरी सोडून मन पूर्णपणें क्रियाशून्य बनलें म्हणजे निर्विकल्प स्थिति सिद्ध होते. पूर्ण ज्ञानरूपांत मन मिसळून जाणें याला निर्विकल्प समाधि असेंही नांव आहे. समाधीच्या या दोन्ही अवस्थांचा प्रत्यय श्रीरामकृष्णांच्या ठिकाणीं आम्हीं प्रत्यक्ष पाहिला होता. ही स्थिति सिद्ध करण्याकरितां कसलीही विशेष खटपट त्यांना करावी लागत नसे. त्यांची कोणतीही समाधिस्थिति बसल्या जागीं सिद्ध होत असे. हा देखावा मोठा अपूर्व होता. त्यांच्या ठिकाणीं या दोन्ही स्थिति प्रत्यक्ष पाहूनच आम्हांला या स्थितीची बरोबर कल्पना आली. ध्यानाला बसतांना अगदीं एकटें असावें; मग सृष्टीचीं सारीं रहस्यें उलगडत जातात. ज्ञान-शक्ति प्रत्येकाच्या अंतरंगांत निद्रितावस्थेंत आहे. त्यामुळेंच

हीं सारीं कोडीं होऊन बसलीं आहेत. ज्ञान-शक्तीची निद्रावस्था हेंच अज्ञान. त्याचें आवरण ज्ञानावर पडल्यामुळेंच मनुष्य मूढ होऊन बसला आहे. या शक्तीला कुंडलिनी असें नांव आहे. ही शक्ति मूलाधार चक्राच्या ठिकाणीं असते; आणि हें चक्र पाठीच्या कण्याच्या अगदीं तळाशीं असतें. ध्यानाला बसतांना कुंडलिनीला आपण जागृत करीत आहों अशी दृढ भावना धरावी. ' उदयोऽस्तु, उदयोऽस्तु ।' या भावनेनें मन भरून टाकावें. हा अभ्यास सावकाश केला पाहिजे; आणि तो करीत असतां अंतःकरणाच्या वृत्ती दाबून टाकाव्या. नुसते कोमल विकार या वेळीं उपयोगी नाहींत. किंबहुना अशा वेळीं कोमल वृत्ति जागृत होणें हें पुष्कळसें धोक्याचें असतें. ज्यांचें अंतःकरण अत्यंत कोमल आहे, त्यांच्या ठिकाणीं कुंडलिनी लवकर जागृत होते हें खरें, तथापि ती जितक्या लवकर जागृत होते तितक्याच लवकर ती झोंपीही जाते; आणि स्वस्थानीं परत येऊन ती झोंपीं गेली कीं साधक अगदीं निराशाजनक स्थितीला येऊन पोंचतो. कीर्तन, भजन इत्यादि भक्ति वाढविणाऱ्या मार्गांत मोठी उणीव आहे ती हीच. कीर्तनाच्या रंगांत तुम्ही नाचत उडत राहिलां तर क्षणभर कुंडलिनी जागृत होऊन सुषुम्नेकडे जाऊं लागते. पण ही जागृती अगदीं क्षणभंगुर असते. ती टिकून रहात नाहीं. उलट पक्षीं कुंडलिनी परत येऊं लागली म्हणजे साधकाच्या ठिकाणीं भयंकर कामविकार जागृत करते. या विषयावर मी अमेरिकेंत व्याख्यानें दिलीं, तेव्हां तीं ऐकून क्षणभर हुरळून गेलेले कांहीं लोक आनदांत नाचूं उडूं लागत; आणि कांहीं तर दगडी पुतळ्यासारखे निश्चल होत. पण त्यांच्या मनोवृत्तीचा सर्व ठाव मी काढला तेव्हां अशा स्थितीनंतर कामविकार दुप्पट जागृत होत असल्याचा आपला अनुभव त्यांनीं मला सांगितला. क्रमाक्रमानें अभ्यास न केल्याचा हा परिणाम होय. यासाठींच हा अभ्यास सावकाशीनें झाला पाहिजे अशी सूचना मीं तुला दिली.

**शिष्यः**—महाराज, हीं रहस्यें कोणत्याही योग ग्रंथांत मला आढळलीं नाहींत. योगाच्या नव्याच सृष्टींत मी आज प्रवेश करीत आहें.

**स्वामीजीः**—वेड्या, ग्रंथांत सर्वच रहस्यें नमूद करतां येतात असें तुला वाटतें का ? अरे, हीं रहस्यें परंपरेनें गुरुमुखानेंच प्राप्त व्हावयाचीं असतात.

तूं अभ्यासाला सुरुवात कर. अत्यंत काळजीपूर्वक ध्यानधारणा करीत जा. आपल्यासमोर सुंदर व सुवासिक पुष्पें मांडावीं, सुवासिक धूप जाळावा, मन साम्यावस्थेला आणण्यासाठीं अशा प्रकारची बाहेरची मदत आवश्यक असते. ती घेण्यास आपण चुकूं नये. अशा रीतीनें आगाऊ तयारी केल्यावर सुखासनावर स्थिर व्हावें. आपल्या गुरुदेवाचें व इष्टदेवतेचें नामस्मरण करावें. सर्व जग सुखी व्हावें, अशी भावना चित्तांत धरावी. आपल्या चित्ताची अशी शुभ प्रेरणा दशदिशांकडे पाठवावी; आणि नंतर ध्यानस्थ होण्याचा अभ्यास करावा. आरंभीं आरंभीं तरी हे बाह्योपचार प्रत्येक दिवशीं करणें चांगलें. नंतर शरीर अगदीं निश्चल करून मीं सांगितल्या रीतीनें तू अभ्यास करीत जा. आपल्या अभ्यासांत एक दिवसही अंतराय होऊं देऊं नये. प्रसंगीं तसेंच नडीचें काम आलें तर वेळांत वेळ काढून पाव अर्धी घटका तरी अभ्यास करावा. माझ्या मुला, आपला मार्ग नेटानें आणि निश्चयानें चालल्याशिवाय अखेरच्या मुक्कामाला पोंचण्याची यत्किंचित तरी आशा आहे काय ?

स्वामीजी माडीवर जाण्यासाठीं निघाले. जिना चढतां चढतां मध्येंच मागें वळून ते म्हणाले, 'तुम्हीं लोक मोठे भाग्याचे. तुम्हांला तितकासा त्रास भोगावा लागणार नाहीं अरे, तुम्ही श्रीरामकृष्णांसन्निध आलां आहां ना ? मग, मुक्ति तर तुमच्या पायांशीं लोळते आहे. तिच्यासाठीं इतका अट्टाहास करण्याचें काय प्रयोजन ? यासाठीं अभ्यास करतां करतां जगाच्या दुःखाचें अल्पस्वल्प तरी परिमार्जन करण्यासाठीं कायावाचा मनानें झटत जा. जगांत किती दुःखें भरलीं आहेत म्हणून सांगूं ? जिकडे वळावें तिकडे रडण्याचाच सूर ऐकू येतो. नानाप्रकारचे कष्ट शरीराला देऊन या देहाला मी जवळ जवळ निकामी करून ठेवलें आहे. हाडामासाच्या या पिंजऱ्यांत फारसा राम आतां राहिला नाहीं. आतां माझी सारी मदार तुमच्यासारख्या पुढच्या पिढीच्या माणसांवर आहे. माझें ओझें हलकें करून मला थोडीबहुत विश्रांति तुम्हीं दिली पाहिजे. तुझ्यानें फार मोठा कामगिरी न झाली तरी वेदांत ग्रंथांचा जो अभ्यास तूं दीर्घकाल केला आहेस त्याचा उपयोग तरी जगाला करून दे. हेंसुद्धां महत्कार्यच आहे. ज्ञानदानाहून दुसरें कोणतेंही दान श्रेष्ठ नाहीं.'

***

[ ३४ ]

[ स्थळः—बेलूर मठ, सन १९०२ ]

आज बरेच दिवस स्वामीजींचा मुक्काम मठांत होता. रोजच्या वहिवाटी-प्रमाणें एके दिवशीं संध्याकाळीं शिष्य मठांत आला, तोंच स्वामीजी आणि स्वामी परमानंद बाहेर फिरावयास जाण्याच्या तयारींत दिसले. शिष्यही त्यांजबरोबर चालूं लागला. स्वामीजी आपल्याच विचारांत पूर्ण निमग्न झाले होते. तेव्हां स्वामी परमानंदांशींच शिष्य बोलूं लागला. स्वामीजींबद्दल श्री-रामकृष्ण काय म्हणत असत, याची पुष्कळशी माहिती स्वामी परमानंद यांच्या मुखानें त्याला कळली. अशा रीतीनें कांहीं अंतर चालून गेल्यावर मठांत परत जाण्यासाठीं आम्ही मागें वळलों. परत येत असतां स्वामीजी शिष्याला म्हणाले, 'कसल्या विषयावर तुमच्या गप्पागोष्टी चालल्या होत्या?' शिष्यानें उत्तर दिलें, 'श्रीरामकृष्णांसंबंधीं.' माझे हें उत्तर स्वामीजींनीं पुरतेंसें ऐकून तरी घेतलें कीं नाहीं कोण जाणे. कारण, त्यानंतर पहिल्यासारखेच ते विचारांत निमग्न झालेले दिसले. आम्ही मठांत येऊन पोहोंचलों; आंगणांत आंब्याच्या झाडाखालीं एक खाट टाकली होती, तीवर स्वामीजी बसले. थोडा वेळ तेथें विश्रांति घेऊन आणि मग हस्तपाद प्रक्षालन करून माडीवरील सज्जांत ते येरझारा करूं लागले. शिष्य त्यांच्या छायेसारखा त्यांच्यामागें होताच. स्वामीजी म्हणाले, 'तुझ्या प्रांतीं वेदान्तमताचा प्रसार करण्याची खटपट तूं कां करीत नाहींस? त्या भागांतले लोक तांत्रिक क्रियाकर्मांतराच्या मागें हात धुवून लागलेले दिसतात. ही स्थिति खरोखरच चांगली नाहीं. आपल्या प्रांतांत हिंडून आणि वेदान्तमताची घनगर्जना करून या तांत्रिक क्रियांना तूं थोडाबहुत आळा घातलास तरच तूं खरा वेदांती असें मी समजेन. ब्रह्मसूत्रें आणि उपनिषद्ग्रंथ यांजवर प्रवचनें करण्याकरितां एखादा वर्ग तूं चालू केलास तर अधिक बरें. त्याबरोबरच तरुण मुलांना ब्रह्मचर्याचाही उपदेश करावा. तुझ्या प्रांतीं नैय्यायिकांचा मोठा सुळसुळाट आहे असें ऐकतों. तर्काची चटणी वाटीत बसणें इतकाच या लोकांचा उद्योग. खरें पाहिलें तर व्याप्ति आणि अनुमान यांवांचून तर्कशास्त्रांत दुसरें काय आहे? पण येवढ्या साधनांवर हे लोक महिनेच्या महिने वादाचा धुडगूस घालतात. आत्मज्ञानाचा मार्ग अंशतः तरी

मोकळा होण्यास वादविवादाचा कांहीं उपयोग होतो काय ? तुझ्या गांवीं किंवा नागमहाशयांच्या गांवीं वेदान्ताचा एखादा वर्ग तूं सुरू कर. श्रीरामकृष्णांच्या विचारसरणीचें आणि वेदान्ततत्त्वांचें शिक्षण तेथें तूं सुरू केलेंस, तर आत्मलाभाबरोबर लोकांचेंही कल्याण तूं करशील. याशिवाय तुला कीर्तिलाभ होईल तो वेगळाच.

**शिष्यः**—महाराज, कीर्तीची हौस मला नाहीं. आपण म्हणतांच तेव्हां वेदान्तमताचा प्रसार करण्याची खटपट करावी असा विचार केव्हां केव्हां माझ्या मनांत येतो, पण मी बोलूनचालून संसारी. जगाचे पाश माझ्याभोंवतीं इतके पडले आहेत कीं, माझी इच्छा मनांतल्या मनांतच राहणार असें दिसतें.

**स्वामीजीः**—लग्न करून संसार केला म्हणून काय झालें ? आईबाप, बहीणभाऊ इत्यादिकांचा योगक्षेम तूं चालवितोसच कीं नाहीं ? मग एकटी बायकोच कांहीं तुला अधिक जड होणार नाहीं. त्यांतून तिलाही तूं धर्मतत्त्वांचें शिक्षण दिलेंस तर तुझ्या मार्गात ती तुला मदतच करील. धर्मपथाच्या आक्रमणांत आपल्याला कोणी सोबती असल्यास कांहीं वाईट नाहीं. ही माझी बायको, हिचा जड भार माझ्या डोक्यावर, असल्या विचारांना तूं थारा देऊं नको. इतरांना ज्या दृष्टीनें तूं पहातोस, त्याच दृष्टीनें तिलाही पहा म्हणजे झालें. हें तुला साधलें तर तुझ्या मनाची चलबिचल हळूहळू आपोआपच नाहींशी होईल. तूं इतकें कां भ्यावेंस हेंच मला समजत नाहीं.

स्वामीजींच्या या भाषणानें शिष्याला बराच धीर आला. भोजनानंतर स्वामीजी बिछान्यावर पडले, आणि त्यांची सेवा करण्याची ही संधि शिष्यानेंही वांया जाऊं दिली नाहीं. स्वामीजी म्हणाले, ' या ठिकाणीं जमलेली मंडळी म्हणजे श्रीरामकृष्णांचीं मुलेंच होत. हीं सर्व माणसें पूर्ण त्यागी आहेत. या साऱ्यांबद्दल पूज्य भाव धरून त्यांची सेवा तूं केलीस, तर चित्तशुद्धि होऊन अखेरीस तुला आत्मलाभ होईल. सत्पुरुषसेवेनें ज्ञानाचा मार्ग मोकळा करून घेतां येतो, हें गीतावचन तुला आठवत असेलच. यासाठीं त्यांची सेवा तूं केलीस तर तुझा मार्ग बराच मोकळा होईल. त्यांतून तुझ्यावर त्यांचें किती प्रेम आहे, हें तुला ठाऊक आहेच. '

**शिष्यः**—पण त्या साऱ्यांच्या तऱ्हाच वेगवेगळ्या. त्यांच्याशीं कसें वागलें असतां युक्त होईल हेंच समजणें मला मोठें जड जातें.

**स्वामीजीः**—श्रीरामकृष्णांसारखा माळी दुसरा कोणी झालाच नाहीं. आपल्या बागेत चित्र विचित्र फुलझाडांची लागणी करून त्यांनीं तीं वाढविलीं. वैचित्र्य हाच त्यांच्या बागेचा विशेष होय. तींत नानाविध नमुने तुला आढळतील. अनत कल्पना एकाच बैठकीला आल्याचें तुला आढळून येईल. या वैचित्र्यांत पुढें आणखी भरच पडावयाची आहे. 'कोणीं मनोभावानें एकच दिवस ईश्वराला आठविलें असेल तर तो येथें अवश्य येईल असे श्रीरामकृष्ण म्हणत. येथे आलेल्या प्रत्येक मनुष्यांत कोणत्याना कोणत्या स्वरूपानें आत्मशक्तीचा विशेष उदय झाला आहे हें तूं ओळखून ठेव. एखाद्या वेडगळ माणसासारखे माझ्या समोर ते वागतांना दिसतात म्हणून तूं त्यांना वेडगळ समजूं नको. तीं सामान्य माणसें नव्हत. येथून तीं बाहेर पडतील तेव्हां धर्मजागृतीची प्रचंड लाट उठविण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं किती आहे, हें तुला दिसेल. अरे, ते श्रीरामकृष्णाचेच अंश आहेत. त्या अनंत सामर्थ्याचा अंश तरी प्रत्येकाच्या अंगी आहे. मी त्यांना याच दृष्टीनें पहात असतों. हा ब्रह्मानदच पहा. त्याच्या ठिकाणीं जें आत्मज्ञान आहे तें मलाही नाहीं हें मी निश्चयानें सांगतों. श्रीरामकृष्ण त्याला आत्मवत् मानीत. हा आपला मुलगा असें ते त्याला म्हणत. त्याचें नुसतें खाणेंपिणेंच नव्हे तर त्याचें शयनही श्रीरामकृष्णांबरोबर असे. आमच्या या मठाचा तो अलंकार आहे. आमचा तो राजा आहे. त्याचप्रमाणें प्रेमानंद, तुरीयानन्द, त्रिगुणातीत, अखण्डानन्द, शारदानन्द, रामकृष्णानन्द, सुबोधानन्द इत्यादि सारेच शिष्य अत्यंत श्रद्धावान् आहेत. त्यांची ईश्वरावरील श्रद्धा, त्यांचा आत्मविश्वास आणि त्यांची धर्मजागृति हीं अशीं जाज्वल्य आहेत कीं, त्यांची तोड जगांत दुसऱ्या कोठेंही तुला आढळणार नाहीं. कालांतरानें त्यांच्या सामर्थ्याचा प्रत्यय सर्वांना येईल.

स्वामीजीचे हे शब्द ऐकून शिष्य आश्चर्यानें स्तब्ध होऊत बसला. स्वामीजी पुढें बोलूं लागले, 'तुझ्या प्रांतांतून नागमहाशयांशिवाय श्रीरामकृष्णांच्या दर्शनाला फारसे कोणी आलेंच नाहीं; आणि जीं कोणी माणसें आलीं तीं जशींच्या तशींच कोरीं परत गेलीं.' नागमहाशयांची आठवण होतांच स्वामीजी कांहीं काळ अगदीं स्तब्ध होऊन बसले. नागमहाशय समाधिस्थ होऊन पांच चार महिनेच झाले होते. त्यांच्या घरीं एकदां गंगाप्रवाह निघाल्याचें वृत्त स्वामीजींनीं ऐकलें होतें. त्याची आठवण होऊन शिष्याला ते म्हणाले, 'त्यांच्या घरीं गंगा निघाल्याची हकीकत काय आहे बरें ?'

**शिष्य:**—मीसुद्धां तीं कर्णोपकर्णी ऐकली आहे. प्रत्यक्ष पाहिलेली नाहीं. महावारुणी पर्वाच्या वेळीं ते आपल्या वडिलांबरोबर कलकत्त्याला जाण्यास निघाले. पण नारायणगंज स्टेशनावर येऊन पहातात तों माणसांची गर्दी इतकी लोटलेली दिसली कीं गाडींत जागा मिळण्याचा संभव दिसेना. तेव्हां तेथून ते परत घरीं आले. गंगास्नान घडत नाहीं याबद्दल वडील अतिशय खेद करूं लागले. तेव्हां नागमहाशय त्यांना म्हणाले, 'आपलें मन पवित्र असेल तर आपल्या घरींच गंगा आहे.' पर्व सुरू होतांच त्यांच्या घराच्या मागीलदारीं एक झरा एकाएकीं बाहेर फुटून त्याचें पाणी खळखळां बाहेर पडून वाहूं लागलें. ज्यांनीं ही गोष्ट डोळ्यांनीं पाहिली अशीं पुष्कळ माणसें अद्यापि जिवंत आहेत. या गोष्टीला आतां बरींच वर्षें होऊन गेलीं. ही हकीकत घडली त्या वेळीं नागमहाशयांचें नांव मीं ऐकलेलें नव्हतें.

**स्वामीजी:**—अशा गोष्टी घडणें यांत मोठेंसें नवल आहे असें नाहीं. नागमहाशय अत्यंत निश्चयी पुरुष होते. आपल्या मार्गापासून केसभरसुद्धां ते कधीं ढळले नाहींत. अशा पुरुषांच्या शब्दासाठीं गंगेनेंही वाटेल तेथें प्रकट व्हावें यांत मला तरी आश्चर्य वाटत नाहीं.

इतकें बोलून स्वामीजी शय्यागृहाकडे गेले आणि शिष्यही तेथून उठून आला.

*
* *

## [ ४० ]

[ एका बोटीवरील प्रवासांत, सन १९०२. ]

कलकत्त्यांत एके दिवशीं दुपारीं शिष्य गंगातटाकीं फिरण्यास गेला होता. अहिरी तोळा घाटावर फिरत असतां समोरून कोणी संन्यासी येत असल्याचें त्याला दिसलें. जवळ येतांच ते आपले गुरु स्वामी विवेकानंद आहेत हें त्यानें ओळखलें. सद्गुरूंच्या डाव्या हातांत फुटाण्यांचा एक द्रोण होता आणि लहान मुलासारखे फुटाणे खात खात स्वामीजी येत होते. त्यांच्या चर्येवर या वेळीं आनंद किती झळकत होता म्हणून सांगूं! शिष्यानें त्यांच्या चरणीं साष्टांग प्रणिपात केला आणि म्हटलें, 'या वेळीं अगदीं अनपेक्षित रीतीनें स्वारी इकडे कशी आली?'

**स्वामीजीः**—मी कामासाठीं आलों होतों. मजबरोबर मठांत येतोस ? हे खारे चणे थोडे खा. त्यांत थोडें तिखटही आहे. त्यांची चव पहा तरी खरी ?

शिष्यानें स्वामींचा तो प्रसाद घेऊन भक्षण केला; आणि आम्ही बोटीनें मठांत जाण्यास निघालों. शिष्य भाडें ठरवूं लागला तेव्हां स्वामी त्याला म्हणाले, 'अरे, इतकी घासाघीस कशाला घालतोस ? तो आठच आणे मागतो ना ?' इतकें बोलून ते बोटींत बसलेच. शिष्यही त्यांच्याजवळ बसला. प्रवाहाच्या उलट दिशेनें जावयाचें असल्यामुळें बोट हळू हळू चालत होती. या एकांताच्या संधीचा फायदा घेऊन शिष्यानेंही नानाप्रकारचे विषय काढून स्वामीजींना प्रश्न विचारण्यास सुरवात केली. श्रीरामकृष्णांच्या शिष्यमंडळीच्या स्तवनपर एक कविता शिष्यानें नुकतीच लिहिली होती. तिची आठवण होऊन स्वामीजी म्हणाले, 'तींत ज्यांचीं नांवें तूं घातलीं आहेस ती मंडळी श्रीरामकृष्णांच्या अंतरंगांतली होती हें तुला कसें समजलें ?'

**शिष्यः**—महाराज, श्रीरामकृष्णांच्या परिवाराशीं बरींच वर्षे माझा स्नेह-संबंध आहे. त्यांच्या मुखानें मला हीं नांवें ठाऊक झालीं.

**स्वामीजीः**—श्रीरामकृष्णांच्या परिवारांत पुष्कळशी मंडळी होती हें खरें; पण सारीच मंडळी त्यांच्या खास बैठकींतली नव्हती. काशीपुरबागेंत असतां एके वेळीं ते आम्हाला म्हणाले, 'भक्तमंडळ मोठें आहे, पण यांत खरे भक्त थोडे आहेत, असें आईनें मला सांगितलें आहे.' त्यांच्या परिवारांत पुरुषाप्रमाणें स्त्रियाही पुष्कळ असत. या दोहोंनाही उद्देशून त्या दिवशीं ते बोलत होते.

याच विषयावर आणखी बोलत असतां शिष्यांचे वेगवेगळे प्रकार स्वामी-जींनीं सांगितले. त्यांच्या उच्चनीच अवस्था कशा असतात याचें वर्णन केलें. त्याचप्रमाणें संन्यासी शिष्य व गृहस्थाश्रमी शिष्य यांच्यांत मोठा फरक कोणता असतो हेंही त्यांनीं समजावून सांगितलें.

**स्वामीजीः**—कनककामिनीचा विचार मनांत चालू असतां श्रीरामकृष्णांची तत्त्वें समजणें शक्य तरी आहे काय ? अथवा पुढें तरी तें कधीं शक्य होईल काय ? शुद्ध संसार आणि परमार्थ या गोष्टी एकत्र नांदूं शकत नाहींत. तुला कोणी असें सांगत असेल तर त्यावर काडीचाही विश्वास ठेवूं नको. आपण

त्यांचे अंतरंग शिष्य होतों असें श्रीरामकृष्णांच्या मागें म्हणणारे लोक पुष्कळ आहेत. पण त्यांची निष्काम स्थिति आणि त्यागबुद्धि यांची यत्किंचित्सुद्धां छाया त्यांच्यावर पडली नव्हती. तथापि स्वतःस ते पट्टशिष्य म्हणवितात ! अशांचीं भाषणें तूं ऐकूनसुद्धां घेऊं नको. श्रीरामकृष्ण म्हणजे त्यागी पुरुषांचे मुकुटमणी. अशांची कृपा झाल्यावर पैशांच्या आणि बायकापोरांच्या मागें लागून त्यांतच सुख मानणें कोणाला शक्य तरी आहे काय ?

**शिष्यः**—महाराज, तर मग दक्षिणेश्वरीं येणारी मंडळी खरी शिष्य नव्हती असेंच समजायचें काय ?

**स्वामीजीः**—असे कोण म्हणतो ? सर्व सारखेच होते असें नाहीं; त्यांतून श्रीरामकृष्णांचें दर्शन ज्याला एकवार तरी घडलें तो कधींही अगदींच मूढ रहावयाचा नाहीं. तो निवृत्तीकडे वळणारच. त्याचें पाऊल थोडें तरी अवश्य पुढें पडेल. पूर्व कल्पांतले पूर्णत्व पावलेले ऋषी परमेश्वराच्या अवताराबरोबर जन्म घेऊन त्याचे हस्तक होत असतात. त्यांच्या द्वारें परमेश्वर आपलें कार्य करतो. सद्धर्माची स्थापना त्यांच्या द्वारें तो करितो. त्याचे हे हस्तक पूर्ण संन्यासी असतात. स्वतःसाठीं म्हणून त्यांना कोणतेंही कर्तव्य उरलेलें नसतें. ऐहिक भोगाची इच्छा त्यांच्या चित्तांत कधींही उद्भवत नाहीं. किंबहुना त्यांना ऐहिक विषयाचा अत्यंत कंटाळा असतो. केवळ जगाच्या कल्याणासाठीं आणि पामर जीवांच्या उद्धारासाठीं देहधारी होऊन ते कर्में करतात. येशू ख्रिस्ताचे सारे शिष्य संन्यासीच होते. श्रीशंकराचार्य, श्रीरामानुज, बुद्ध, चैतन्य इत्यादिकांचे प्रत्यक्ष शिष्यसुद्धां संन्यासीच होते. हे सारे सर्वसंगपरित्यागी होते. अशाच प्रकारच्या माणसांनीं ब्रह्मविद्येचा प्रसार जगांत केला आहे. कनककामिनीच्या जाळ्यांत अडकलेला मनुष्य स्वतः मुक्त झाला आणि दुसऱ्याला मुक्तीचा मार्ग त्यानें दाखविला असें तुला कधीं तरी आणि कोठें तरी आढळलें आहे काय ? जो स्वतःच बद्ध तो दुसऱ्याला मुक्त कसा करणार ? वेद वेदान्त, इतिहास पुराणें, इत्यादि ग्रंथ तूं पाहिलेस तर सर्व देशांत आणि सर्व काळीं धर्मप्रवर्तक संन्यासीच होते असें तुला आढळून येईल. इतिहासाची पुनरावृत्ति होते आणि आतांही तसेंच घडून येणार आहे. श्रीरामकृष्ण मोठे धर्मप्रवर्तक होते. विरोधी भासणाऱ्या तत्त्वांचें एकीकरण त्यांनीं केलें. त्यांचे

संन्यासी शिष्य याच धर्माचा प्रसार सर्वत्र करितील. श्रीरामकृष्णांच्या मताचा जयजयकार सर्वत्र होईल. त्याशिवाय निघणारे इतर बारके सारके ध्वनी ऐकूं येईनासे होतील. या मठांतही संन्यासी मंडळी तुला दिसत आहे. यांतून जे सर्वसंगपरित्यागी बनतील ते धर्मतत्त्वांचें केंद्रस्थान होऊन राहतील.

**शिष्यः**—तर मग श्रीरामकृष्णांबद्दल जी माहिती त्यांचे गृहस्थाश्रमी शिष्य सांगतात ती बरोबर नाहीं कीं काय ?

**स्वामीजीः**—त्यांचें सारेंच म्हणणें सर्वथैव खोटें आहे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि त्यांत खऱ्या खोट्याची सरमिसळ झालेली आहे हें मात्र खरें. श्रीरामकृष्णांचा उपदेश जितपत आणि जसा ज्याला समजला तसा तो लोकांना सांगूं लागला. यामुळें शिष्यांशिष्यांतही रामकृष्णांच्या मता-संबंधीं पुष्कळ चर्चा होत असते. हेंहि कांहीं वाईट नाहीं. पण मी म्हणतों तेवढेंच खरें असा हट्ट कोणी घेऊन बसला तर त्याची कींवच केली पाहिजे. कोणी म्हणतात श्रीरामकृष्ण तांत्रिक होते, कोणी म्हणतात ते कौल होते, तर दुसरे कोणी त्यांना श्रीचैतन्याचा अवतार समजतात. नारदीय भक्तीच्या प्रसारासाठींच श्रीचैतन्यांनीं त्यांच्या रूपानें पुन्हां जन्म घेतला असें या लोकांचें म्हणणें आहे. दुसरे कोणी म्हणतात कीं ते अवतारी पुरुष असते तर एवढ्या साधनाच्या अभ्यासाची जरूर त्यांना काय होती ? कांहीं लोक त्यांना पूर्ण संन्यासी मानणारे आहेत. सर्वसंगपरित्याग हा एकच मार्ग श्रीरामकृष्णांनीं दाखविला असें त्यांचें म्हणणें आहे. पण या नाना मतांच्या गलबल्यांत तूं सांपडूं नको. हीं सारीं मतें केवळ एकेरी दृष्टीमुळें उत्पन्न झालेलीं आहेत. श्रीरामकृष्ण वस्तुतः कसे होते आणि पूर्वीच्या किती जन्मांच्या संस्कारांचा उदय त्यांच्या ठिकाणीं झाला होता हें निश्चयानें ठरविण्याचें साधन आपल्यापाशीं नाहीं. आपण सारा जन्म खर्चीं घातला तरी या प्रश्नाचें उत्तर अंशतःसुद्धां आपणास मिळावयाचें नाहीं. याकरितां श्रीरामकृष्णां-संबंधीं बोलतांना आपण आपली जीभ आवरली पाहिजे. आपलें जाणण्याचें सामर्थ्य असेल त्याच मानानें त्यांच्या उपदेशाचें रहस्य आपण जाणूं शकतों. लहानसें भांडें महासागरांत बुडविलें तरी त्याच्या आकारमानाइतकेंच पाणी त्यांत शिरणार. श्रीरामकृष्ण ज्ञानसूर्य होते. त्यांच्या एका किरणाचा प्रकाश जरी पूर्णत्वानें आपणांस प्राप्त झाला तरी आपण माणसांचे देव होऊं. अनेक

विश्वव्यापी कल्पनांचें असें समीकरण दुसऱ्या कोठेंही तुला आढळावयाचें नाहीं. या माहितीवरून श्रीरामकृष्णांचें स्वरूप तुला ओळखतां आलें तर पहा. त्यांच्यासमोर संन्यासी शिष्य असले आणि त्यांना कांहीं उपदेश करावयाचा असला तर परमहंस आधीं उठून उभे रहात. आसपास कोणी गृहस्थाश्रमी आहे कीं काय हें ते न्याहाळीत. तसा कोणी नाहीं अशी खात्री झाली म्हणजे संन्यास आणि तपस्या यांच्या महतीचा उज्ज्वल उपदेश ते करीत. त्या वेळीं त्यांचें भाषण इतकें जोरदार आणि हृदयाला हालवून सोडणारें असे कीं सारे श्रोते चित्रासारखे होऊन बसत. त्यांच्या असल्या भाषणांच्या श्रवणानेंच ऐहिक जिण्याला विटून आम्ही संन्यासदीक्षा घेतली.

**शिष्यः**—तर मग हा संसारी आणि हा संन्यासी अशी भेदबुद्धि त्यांच्या ठिकाणीं होती काय ?

**स्वामीजीः**—हें तूं संसारी शिष्यांनाच विचार. त्यांचे दोन्ही प्रकारचे शिष्य आज तुला दिसत आहेत, तेव्हां त्यांच्यांतलें तारतम्य तुझें तुलाच कळण्यासारखे आहे. अरे, केवळ ईश्वराच्या भेटीसाठीं संसाराची होळी ज्यांनीं केली, साऱ्या लौकिकसुखावर ज्यांनीं पाणी सोडलें, अरण्यवास, तीर्थवास आणि गुहावास ज्यांनीं पत्करला ते मोठे कीं गाद्यागिरद्यांवर लोळणारे आणि फावल्या वेळीं गुरुवाक्याचें स्मरण करणारे शिष्य मोठे हें तुझें तूंच पहा. श्रीरामकृष्णांच्या उपदेशावांचून दुसऱ्या विचाराचा ध्यास ज्यांच्या चित्ताला नाहीं आणि त्या उपदेशाचा अनुभव घेण्यासाठींच ज्यांची सारी धडपड, ते मोठे कीं त्या उपदेशाचें स्मरण कधींतरी सवडीप्रमाणें करणारे मोठे ? 'आत्मवत् सर्व भूतानि' या तत्त्वावर दृढ श्रद्धा ठेवून भूतांची सेवा करण्याकरितां जे बाहेर पडले, आणि स्वतःसाठीं कांहीं करावयाचें नाहीं, असा ज्यांच्या बुद्धीचा निश्चय झाला ते मोठे कीं फुलपांखरांप्रमाणें इकडेतिकडे उगीच भटकणारे मोठे ? क्षणांत या फुलावर तर त्याच्या पुढच्या क्षणीं शेणाच्या ढिगावर अशा रीतीनें आयुष्य घालविणारे मोठे कीं काय ? या प्रश्नाचा विचार करून त्याचें समर्पक उत्तर तुझें तुलाच देतां येईल.

**शिष्यः**—पण महाराज, ज्यांवर सद्गुरुकृपा झाली त्यांना जगाच्या अस्तित्वाचें भान तरी कोठून असणार ? ते संसारांत राहिले काय किंवा संन्यासी झाले काय सारखेंच, असें मला वाटतें.

**स्वामीजीः**—सद्गुरूची खरी कृपा ज्यांच्यावर झाली असेल त्यांचें मन संसारांत लिडबिडणार नाहीं हें खरें, पण गुरुकृपा झाली आहे कीं नाहीं याचा निश्चय कसा करणार? कनककामिनीची गोडी चित्तांतून पूर्ण नाहींशी होणें हेंच गुरुकृपेचें मुख्य चिन्ह आहे. अशी निवृत्ति ज्याच्या चित्तांत उत्पन्न झाली नसेल त्याजवर खरी गुरुकृपा झालेली नाहीं असें तू समज.

अशा रीतीनें हा विषय संपल्यानंतर दुसऱ्या एका विषयाकडे वळून शिष्य स्वामीजींस म्हणाला, 'स्वदेशांत आणि परदेशांत जी खटपट आपण केली तिची एकंदर फलश्रुति काय?'

**स्वामीजीः**—जें कांहीं कार्य झालें आहे, त्याचें व्यक्तरूप आज तुला अल्पच दिसेल. त्याची वाढ आणि विस्तार हीं कालांतरानेंच व्हावयाचीं आहेत. श्रीरामकृष्णांचे विश्वव्यापी सिद्धांत जग कालांतरानें ग्रहण करील. साऱ्याच जगाला हे सिद्धांत ग्रहण करावे लागतील. या अंतिम सिद्धीचा आरंभ मात्र आज झाला आहे. या प्रचंड लाटेंत सारे बारीकसारीक मतभेद बुडून नष्ट होऊन जाणार आहेत.

**शिष्यः**—श्रीरामकृष्णांबद्दल आणखी कांही माहिती आपण मला सांगावी. त्यांचें चरित्र आपल्या तोंडून ऐकण्यांत मला विशेष आनंद होतो.

**स्वामीजीः**—परमहंसाबद्दल तुझ्या कानीं कितीतरी हकिकत आधींच आली आहे. आतां आणखी काय ऐकणार? रामकृष्णांशीं तुलना करतां येईल असा दुसरा कोणीच मला आढळत नाहीं. ते उदाहरणीय सत्पुरुष होते. दुसऱ्याचा दाखला त्यांना लागू पडणार नाहीं; पण त्यांचा दाखला मात्र सर्वांनीं आपल्यापुढें ठेवावा.

**शिष्यः**—पण माझ्यासारख्या ज्यांनीं त्यांना पाहिलेंसुद्धां नसेल त्यांची वाट काय?

**स्वामीजीः**—येथल्या साधूंच्या संगतीचा पुण्यकारक लाभ तुला घडला आहे. हे सारे परमहंसांच्या कृपेतले आहेत. मग रामकृष्णांचें दर्शन घडलें नाहीं असें कसें म्हणतोस? त्यांच्या शिष्यमंडळांत त्यांचा वास अखंड आहे. त्यांची सेवा तूं केलीस म्हणजे योग्य काळीं रामकृष्णांचें दर्शनसुद्धां तुझ्या अंतरंगांत तुला घडेल.

**शिष्यः**—महाराज, परमहंसांच्या कृपेंतल्या इतर शिष्यांबद्दल आपण पुष्कळ बोलतां, पण आपल्या स्वतःबद्दल परमहंस काय म्हणत हें आपण मला केव्हांही सांगितलें नाहीं.

**स्वामीजीः**—स्वतःबद्दल मी काय सांगू? मी कांहीं त्यांचा सामान्य शिष्य नव्हतों. मी दैत्य आहें. त्यांच्या समक्षसुद्धां त्यांच्याबद्दल मी अद्वातद्वा बोलत असे आणि माझीं तसलीं भाषणें ऐकून ते नुसते मोठ्यानें हंसत.

बोलतां बोलतां स्वामीजींचा चेहरा तेजःपुंज आणि गंभीर दिसूं लागला. आजूबाजूचा विसर पडल्यासारखें होऊन समोरच्या नदीकडे ते पहात राहिले. अशा रीतीनें कांहीं वेळ ते अगदीं स्तब्ध बसले होते. थोड्याच वेळांत सायंकालाचें काळें आवरण पडूं लागलें आणि तितक्यांत आमची बोटही मठाजवळ येऊन पोंचली. 'सायंकाळचा समय झाला. मुलाला आतां घरीं घेऊन जा.' अशा अर्थाचें एक गीत स्वामीजी स्वतःशींच गुणगुणत होते. गाणें संपल्यावर ते शिष्याला म्हणाले, 'पूर्व बंगाल्यांत गोड आवाजाचे गवई फारसे जन्मास येत नाहींत. गंगामातेचें पाणी प्याल्याशिवाय गोड आवाज कोठून येणार?'

आम्ही बोटींतून उतरून मठांत गेलों. अंगांतील कपडे काढून स्वामीजी पश्चिमेकडील सज्जांत येऊन बसले. त्या वेळीं त्यांची दिव्य अंगकांती आणि काषाय कटिवस्त्र यांचा संयोग फारच खुलून दिसत होता.

*
* *

## [ ४१ ]

### [ स्थळः—बेलूरमठ, १९०२ ]

आज आषाढ प्रतिपदा होती. संध्याकाळ होण्यापूर्वीच शिष्य मठांत येऊन बसला होता. वेळाच्या अभावीं ऑफिसांतले कपडे न बदलतां तो तसाच आला होता. स्वामीजींचे चरण वंदन करून त्यांचें कुशल त्यानें विचारलें. 'बरें आहे' असें उत्तर देऊन स्वामीजी शिष्याच्या पोषाखाकडे पाहून म्हणाले, 'तूं कोट पाटलूण घालतोस, मग कॉलर कां घालीत नाहींस?' इतकें

बोलतां बोलतां स्वामी शारदानंदांना हांक मारून त्यांनीं म्हटलें, ' माझ्या संग्रहापैकीं दोन कॉलर याला दे. ' स्वामी शारदानंदांनीं होकारार्थी मान हालविली व ते निघून गेले.

आपला ऑफिसांतला पोषाख उतरून शिष्य स्वामीजींसन्निध येऊन बसला. स्वामीजी म्हणाले, ' आपल्या चालीरीती, पोषाख, खाणेंपिणें इत्यादि गोष्टींत परक्यांचें अनुकरण आपण केलें म्हणजे आपली राष्ट्रीय भावना मरून जाते. परक्यापासून योग्य गोष्टींचें शिक्षण आपण अवश्य घ्यावें; पण ज्या गोष्टींनीं आपलें राष्ट्रीयत्व नाहींस होतें त्या गोष्टी आपण कधींही करूं नयेत. त्यांच्या योगें आपला उद्धार होत नाहीं; एवढेंच नव्हे, तर उलट आपण घसरणीच्या मार्गाला मात्र लागतों.'

**शिष्यः**—महाराज, युरोपियन अंमलदाराच्या हाताखालीं काम करावयाचें असलें म्हणजे त्यांच्या मर्जीप्रमाणें पोषाख केल्याशिवाय चालत नाहीं. ऑफिसाच्या हद्दींत तरी असला पोषाख घालणें भाग पडतें.

**स्वामीजीः**—भागच पडत असलें तर तसे तूं कर. नोकरीसाठीं ऑफिसाच्या हद्दींत हा ऑफिसी पोषाख म्हणून तूं वापर; पण घरीं आल्याबरोबर मात्र तूं बंगाली बाबू होत जा. धोतर, सदरा, चादर हा आपला ठरीव पोषाख ताबडतोब करावा. अरे, आतांशा आपल्या स्नेह्यासोबत्यांच्या घरीं जातांनासुद्धां युरोपियन पोषाख घालण्याची चाल पडत चालली आहे, पण तो पोषाखही अर्धवट. सदऱ्याऐवजीं नुसता शर्ट घालून लोक इकडे तिकडे भटकतात. नुसता शर्ट घालून कोणाच्याही घरीं जाणें युरोपांत असभ्य समजलें जातें. वर कोट घातल्याशिवाय कोणाही सभ्य गृहस्थाच्या घरीं तुझा सत्कार तिकडे व्हावयाचा नाहीं. पोषाखाच्या बाबतींत तुमचें अर्धें बोबडें अनुकरण किती मूर्खासारखें दिसतें ! अलीकडचे तरुण असला कांहीं पोषाख वापरतात कीं, तो धड ना हिंदी ना युरोपियन. त्यांत या दोहोंचेंही विचित्र मिश्रण असतें.

इतकें भाषण झाल्यावर तेथून उठून स्वामीजी गंगातटाकीं गेले. शिष्यही त्यांजबरोबर होताच. दुसरी कोणी मंडळी स्वामीजींबरोबर नव्हती. स्वामीजी इकडे तिकडे येरझारा घालूं लागले. शिष्यही आपल्याच विचारांत मग्न होऊन त्यांच्या मागोमाग चालत होता. अभ्यासमार्गासंबंधीं कांहीं प्रश्न विचारावा

असा विचार त्याच्या मनांत घोळत होता. इतक्यांत स्वामीजी म्हणाले, ‘ कसला विचार चालला आहे. एकदां बोलून टाक.”

शिष्यानें अत्यंत नम्रपणें म्हटलें, ‘ महाराज, माझें मन अल्पावधींत शांत होईल असा कांहीं उपाय सांगण्याची कृपा आपण केली तर माझें पाऊल किती तरी झपाट्यानें पुढें पडेल. पण असा प्रश्न करूं कीं नको, हाच विचार मला पडला होता. या लौकिक कर्तव्यांच्या चक्रांत सांपडलेलें मन एकसारखें भ्रमत असतें. अभ्यासाच्या वेळींसुद्धां तें स्थिर करण्याची मला अतिशय पंचाईत पडते.’

हा प्रश्न ऐकून स्वामीजींना आनद झाल्यासारखें दिसलें. शिष्याची उत्सुकता तीव्र असावी असें त्यांच्या मनांत आलें. ते मोठ्या प्रेमानें म्हणाले, ‘ मी माडीवर एकटाच असेन अशी संधि साधून पुन्हां केव्हां तरी ये. मग याविषयीं आपण मोकळेपणें बोलूं.’

पुढें थोड्याच वेळानें शिष्य माडीवर गेला असतां त्याला स्वामीजी ध्यानस्थ असलेले आढळले. ते पश्चिमाभिमुख बसले होते. अलौकिक भाव त्यांच्या चेहऱ्यावर झळकत होता. त्यांचें सारें शरीर अगदीं निश्चल झालें होतें. अशा प्रकारच्या सद्गुरु मूर्तीकडे आश्चर्यानें पहात शिष्य स्तब्ध उभा राहिला. बराच काळ अशा रीतीनें गेला. तथापि स्वामीजी ध्यानस्थितींतून बाहेर येतील असा संभव दिसेना. त्यांची निश्चलावस्था अखंड होती. अखेरीस कांहीं गडबड न करतां शिष्य खालीं बसला. अशा रीतीनें आणखी अर्धा तास गेल्यानंतर स्वामीजी बाह्य जगांत परत येत आहेत असें चिन्ह दिसूं लागलें. प्रथम त्यांचे हात हालूं लागले आणि थोड्या वेळानें त्यांनीं डोळे उघडले. समोर असलेल्या शिष्याकडे पाहून म्हणाले, ‘ तूं केव्हां आलास ?’

**शिष्यः**—नुकताच आलों.

**स्वामीजीः**—ठीक, एक प्यालाभर पाणी आण बरें.

धांवत जाऊन शिष्यानें पाणी भरून प्याला आणला. त्याच्या हातून तो घेऊन स्वामीजींनीं थोडें जल प्राशन केलें आणि प्याला शिष्याच्या हातीं दिला. जागच्या जागीं प्याला ठेवून शिष्य पुनः स्वामीजींसमोर येऊन बसला.

**स्वामीजीः**—आजचें ध्यान फारच गाढ होतें.

**शिष्यः**—महाराज, माझें मन लवकर स्थिर होईल असा उपाय आपण मला सांगणार ना?

**स्वामीजीः**—सांगण्यासारखें होतें तें सारें मी तुला आधींच सांगून चुकलों आहें. दृढ निश्चयानें तूं अभ्यासाला लाग. त्यांत एकही दिवस खंड पडूं देऊं नको. कालांतरानें तुझें मन आपोआप स्थैर्य पावूं लागेल. तुला कोणता साधनमार्ग आवडतो, सांग बरें?

**शिष्यः**—महाराज, आपण दाखविलेल्या मार्गानें मी रोज अभ्यास करितों. तथापि चित्ताला स्थैर्य म्हणून नाहीं. हा अभ्यास माझ्या उपयोगाचा नाहीं, असेंही कित्येक वेळां माझ्या मनांत येतें. यांत आपलें पाऊल पुढें पडावयाचें नाहीं, अशी शंका येऊं लागते. यासाठीं आपलें सान्निध्य सदा असावें असें मनाला वाटूं लागतें.

**स्वामीजीः**—हा मनाचा दुबळेपणा आहे. हा अभ्यासानेंच नाहींसा केला पाहिजे. अभ्यासानेंच मन आत्मस्थित होईल. आत्मदर्शनाची नुसती झुळूक तुझ्या वरून गेली तरी तुझें काम झालें. त्याच क्षणीं तुझे जन्ममरणबंध तुटले असें समज.

**शिष्यः**—महाराज, आपल्या आशीर्वादाच्या प्रभावानेंच हें सारें होणार आहे. आपणांस एकटें भेटण्याविषयीं आज्ञा झाली होती, त्याप्रमाणें आज मी आलों आहें. आतां कसेंही करून मनाची स्थिरता स्थापन होईल असा कांहीं मार्ग मला दाखवावा.

**स्वामीजीः**—वेळ सांपडेल तेव्हां तेव्हां बाह्य जगांतून मन परावृत्त करण्याचा यत्न करावा. एक वेळ तरी असा येईल कीं, तुझें मन सुषुम्नेंत प्रवेश करील. एवढें काम झालें कीं मुख्य कार्यभाग आटोपला. मग त्यापुढें फारशी खटपट तुला करावी लागणार नाहीं.

**शिष्यः**—महाराज, अनेक मार्गांनीं आपण मला प्रोत्साहन देतां; पण मला आत्मलाभ खरोखरच होईल काय? एवढें महत्पुण्य माझ्या पदरीं आहे काय? आतां कोणताही यत्न करून माझें हें मन स्थैर्य पावेलसें करा.

**स्वामीजीः**—अरे, असा घाबरूं नको. सत्यवस्तूचें दर्शन तुला अवश्य होईल. कृमिकीटकापासून तों ब्रह्मदेवापर्यंत हा अधिकार सर्वांना आहे. तुला

एकट्यालाच त्यांतून कोणीं वगळलें नाहीं. नाना विकारांच्या सपाट्यांत तुझें मन दुबळें झालें आहे. लौकिक गोष्टींचा विचारच करण्याचें तूं सोडून दे. श्रद्धा दृढ असावी. मनुष्याच्या अंगीं वीर्य पाहिजे. मी हवें तें करीन हीच भावना सदोदित असावी. स्वार्थांतून मन परावृत्त करून तें परार्थचिंतनाकडे लावलें म्हणजे त्याचा दुबळेपणा नाहींसा होऊं लागतो. यासाठींच तूं लोकसेवेला लागावें अशी माझी इच्छा आहे. या कामीं माझा पूर्ण आशीर्वाद तुला मिळेल.

इतक्यांत जेवणाची घंटा वाजली. जेवायला जाण्याबद्दल स्वामीजींची आज्ञा झाल्यावरून शिष्य आपल्या जागयावरून उठला. स्वामीजींच्या चरणीं त्यानें दंडवत प्रणिपात केला. त्याच्या मस्तकीं हात ठेवून स्वामीजी म्हणाले, 'माझ्या आशीर्वादानें तुझें कांहीं बरें व्हावयाचें असेल तर श्रीरामकृष्णांची कृपा तुजवर होवो असा आशीर्वाद मी तुला देतों. याहून मोठा वर कोणता तें मला ठाऊक नाहीं.'

शिष्य जेवणासाठीं निघून गेला. जेवण झाल्यानंतर स्वामीजींकडे त्या दिवशीं तो पुन्हां गेला नाहीं. कारण, स्वामीजी त्या दिवशीं लवकरच झोंपीं गेले असल्याचें त्याला समजलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं शिष्याला कलकत्त्यास लवकर परत फिरणें भाग होतें. तेव्हां स्वामीजींच्या दर्शनास तो गेला.

**स्वामीजीः**—इतक्यांतच निघालास काय ?

**शिष्यः**—होय, महाराज.

**स्वामीजीः**—पुढच्या रविवारीं येशील ना ?

**शिष्यः**—होय, अवश्य येईन.

**स्वामीजीः**—ती पहा, बोट दिसूं लागलीच.

स्वामीजींचा आशीर्वाद घेऊन शिष्य मठांतून बाहेर पडला. आपल्या इष्ट-देवतेचें हें अखेरचेंच दर्शन आहे, अशी शंकासुद्धां त्याच्या मनांत आली नाहीं. स्वामीजींनीं मोठ्या आनंदानें त्याला आशीर्वाद देऊन पुन्हां म्हटलें, 'येत्या रविवारीं अवश्य ये.' 'होय, महाराज' इतकेंच बोलून शिष्य तेथून झपाट्यानें निघाला.

बोट निघण्याच्या अगदीं तयारींत होती. धांवत जाऊन शिष्यानें तींत उडी मारली. बोटींतून त्यानें मठाकडे पाहिलें तेव्हां स्वामीजी सज्जांत फिरत

असल्याचें त्याला दिसलें. स्वामीजींची नजर बोटीकडे फिरतांच शिष्यानें त्यांना पुन्हां एकवार नमस्कार केला. त्याचा हा नमस्कार अखेरचाच होता.

यानंतर सात दिवसांनीं स्वामीजींनीं देह ठेवला. असे कांहीं होईल याचें स्वप्नसुद्धां शिष्यास पडलें नव्हतें. स्वामीजींच्या देहपाताच्या दुसऱ्या दिवशीं ही हकीकत त्याला कळली. तो त्या वेळीं मठांतच आला होता. सर्व क्रिया समाप्त झाल्यानंतर तो आला असल्यामुळें स्वामीजींच्या देहाचें अखेरचें दर्शन त्याला घडलें नाहीं.

* * *

## [ ४२ ]

### [ श्रीप्रियनाथसिंह ]

सामान्य भाषणांतसुद्धां आपल्या जिभेला लगाम घालण्याची संवय आपणास नाहीं. चार मंडळी सहज गप्पा मारण्यास बसली तर प्रत्येक जण आपलेंच घोडें पुढें दामटण्याचा यत्न करीत असतो. कोणत्याही सार्वजनिक कार्यांत हाच प्रकार आढळून येतो. आगगाडीवर किंवा बोटींत माणसांची ढकलाढकली आणि धक्काबुक्की कशी चालते हें आपण नेहमीं पाहतोंच. एके दिवशीं मठांत हाच विषय निघाला होता. स्वामीजी म्हणाले, 'जुन्या काळीं बंगल्यांत एतद्देशीय स्वतंत्र राजे होते तेव्हां सकाळ संध्याकाळ ते दरबार भरवीत असत. अनेक प्रकारच्या राजकीय विषयांची चर्चा तेथें चाले. त्याच वेळीं गांवांत घडलेल्या हकीकतींच्या बातम्याही राजा लोकांपासून विचारून घेत असे. त्या काळीं वर्तमानपत्रें नव्हतीं. यामुळें राज्यांत होणाऱ्या घडामोडींची हकीगत अशाच रीतीनें राजाच्या कानापर्यंत जात असे. साऱ्या दरबारी माणसांनी रोज हजर राहिलेंच पाहिजे असा राजाचा कटाक्ष असे. प्रसंगीं कोणी गैरहजर राहिला, तर तसें कां झालें याची चौकशी राजा तत्काळ करी. हे दरबार म्हणजे संस्कृतीच्या आणि सभ्य चालीरीतींच्या शाळाच आहेत. पुस्तकांतून न मिळणारें ज्ञान अशा दरबारांतून प्राप्त होई. यामुळेंच बंगाली भाषेंत एक म्हण पडली आहे कीं, 'मुलगा अभ्यास करीत नसेल तर त्याला दरबारी करा.' दरबारी चालीरीती सर्वत्र सुविख्यात आहेत. ही चाल आप-

त्याच देशांत होती असें नाहीं; बाहेरील देशांतही असे दरबार पूर्वी भरत. हल्लींच्या काळीं पश्चिम हिंदुस्थानांत आणि विशेषतः राजपुतान्यांत जुन्या पद्धतीचे दरबार अजून आढळून येतात. आपल्या बंगाल्यांत मात्र त्यांचा पूर्ण लोप झाला आहे.''

**प्रश्नः**—महाराज, तर मग आपले राजे नष्ट झाल्यामुळेंच आपली चांगली रीतभात सुटली, असें म्हणतां कीं काय ?

**स्वामीजीः**—केवळ हेंच एक कारण नाहीं. आपली अवनति अनेक बाजूंनीं झाली आहे आणि तिचें मुख्य कारण स्वार्थीपणाची वाढ हें होय. प्रत्येक ठिकाणीं आपला हा स्वार्थ अगदीं उघड दिसत असतो. आगगाडींत किंवा बोटीवर चांगली जागा मिळविण्यासाठीं म्हाताऱ्या कोताऱ्यांना आणि बाया-बापड्यांनासुद्धां तुडवून तरुण माणसें खुशाल पुढें सरकत असतात. शिळोप्याच्या गप्पांसाठीं चार मंडळी एकत्र बसली तर जो तो आपलेंच प्रदर्शन करण्यासाठीं धडपडतो. असली स्वार्थबुद्धि कमी करतां आली तरच या गोष्टींना आळा पडेल. त्याला दुसरा उपाय नाहीं. या बाबींत मुख्यतः आईबापांचें वळणच चुकीचें असतें. मुलांना चांगलें वळण लावण्याची काळजी घ्यावी तितकी आईबाप घेत नाहींत. आत्मसंयमन हाच सभ्य संस्कृतीचा पाया आहे.

हल्लींचे आईबाप अनेक प्रकारच्या चुका करीत असतात. कांहीं बाबींत मुलांवर त्यांचा अमल इतका करडा असतो कीं, त्यांच्या स्वतंत्र विकासाचा अकुर मुळांतच खुडला जातो. अमुक गोष्ट वाईट असें बापाच्या मनानें एकदां घेतलें कीं, त्याची कडक अंमलबजावणी तो पोरांवर करतो. कोणाला मुलांनीं गाइलेलें खपत नाहीं; पण मुलानें एखादें सुंदर गीत ऐकलें कीं तें शिकण्याची धडपड तो करतो. एखादा गायनसमाज तो शोधूं लागतो. बापाला तर गायन समाजाचा तिटकारा. विडी ओढणें पाप आहे, असें बापाचें मत. तेव्हां मुलगा चोरून मारून हलक्या नोकरांच्या जाग्यांत बसून तंबाखू ओढण्यास शिकतो. प्रत्येक व्यक्तीच्या मनाचा कल कोणत्या ना कोणत्या गोष्टीकडे जन्मतःच असतो. त्या गोष्टींकडे त्यांचें चित्त अपरिहार्यपणें ओढ घेत असतें. या प्रवृत्तींची तृप्ति योग्य मार्गानें होण्यास वाव मिळाला पाहिजे. तसें न होईल तर

या अंतर्गत प्रवृत्ति आडमार्ग शोधूं लागतात. आईबापांचा कायदा म्हणजे जणूं काय सृष्टीचाच कायदा असा प्रकार आमच्याकडे झाला आहे. आईबापांच्या आडमुठेपणानेंच हल्लींचीं मुलें बिघडलीं आहेत. तेव्हां मुलांना सुधारावयाचें तर आधीं आईबापांना सुधारण्याच्या शाळा काढल्या पाहिजेत. सांप्रतची ही स्थिति किती शोचनीय आहे बरें ! आमची प्राचीन संस्कृति नष्ट झाली, आणि तिची भरपाई अद्यापिही आपण केलेली नाहीं. सामान्य समाजाला संस्कृतीची उच्चावस्था आपण प्राप्त करून दिलेली नाहीं. अशा स्थितींत आमचे सुशिक्षित बाबू इंग्रजांजवळ स्वराज्य मागतात, हें नवल नव्हे काय ? त्यांची ही याचना पाहिली म्हणजे मला तर हंसूं येतें आणि वाईटही वाटतें. तुमच्यांत कांहीं शिस्त म्हणून आहे काय ? कांहीं मर्दुमकी आहे काय ? आज्ञा कशी पाळावी आणि ती कोठें करावी या दोन्ही गोष्टींची तुम्हांस ओळखसुद्धां नाहीं. मर्द असतो तो आज्ञाधारक असतो आणि आत्मसंयमीही असतो. दुसऱ्याच्या डोक्यावर पाय देणें हें मर्दपणाचें चिन्ह नव्हे. नम्रता आणि स्वार्थत्याग हेच मर्दाचे गुण आहेत. हुकूम होण्याचा अवकाश कीं, परार्थासाठीं एकदम पुढें सरून प्रसंगीं प्राणही अर्पण करण्याचें कर्म मर्दच करूं जाणे. जो असा मर्द होईल तोच हजारों लोकांचा नेता आणि शास्ता होऊं शकेल. जो आधीं स्वतःचें बलिदान देईल त्यालाच इतरांचा बलि मागण्याचा अधिकार पोंचतो.'

श्रीरामकृष्णांचें चरित्र त्यांच्या एका भक्तानें लिहिलें होतें. श्रीरामकृष्ण अवतारी पुरुष नव्हत असे म्हणणारांचा खरपूस समाचार त्यांत त्यानें घेतला होता. त्या चरित्रकाराला समक्ष बोलावून स्वामीजी त्याला म्हणाले, 'अशा रीतीनें दुसऱ्याला शिव्या देण्याचा तुम्हांला काय अधिकार ? तुमच्या गुरुवर त्यांची श्रद्धा नसली म्हणून काय झालें ? रामकृष्णांचा विशिष्ट पंथ नव्हता. आम्ही पंथभक्त नाहीं. रामकृष्णांवर कोणाचा विश्वास नसला म्हणून त्याला आम्हीं शत्रू मानावें काय ? तुमच्या या आडमुठेपणामुळें आपल्या गुरूचें महत्त्व तुम्हीं कमी केलें आहे. तुम्हांला तुमचे गुरू परमात्मरूप वाटतात ना ? मग कोणीं कोणत्याही नांवानें त्यांना हांक मारली अथवा कोणत्याही स्वरूपानें त्यांची पूजा केली तरी त्यांत काय बिघडलें ? ती त्यांचीच पूजा नव्हे काय ? आणि त्यांतून कोणालाही शिव्या देणारे तुम्ही कोण ? कोणाला शिव्या दिल्या

म्हणजे तुमचें वाटेल तें म्हणणें ऐकावयास तो तयार होतो काय? शिव्या देणें हा केवढा मूर्खपणा आहे! दुसऱ्यांचीं मनें जिंकण्याचा हा मार्ग नव्हे. ज्यांना तुम्हांला जिंकावयाचें असेल त्यांच्या हितासाठीं आपल्या स्वार्थाची आहुति तुम्ही दिली पाहिजे. तुमची एवढी तयारी नसेल तर तुमचें म्हणणें त्यांनीं कां ऐकावें?'

थोड्या वेळानें शांत होऊन स्वामीजी पुढें म्हणाले, 'माझ्या मित्रा, जो स्वतः शूर नसेल तो श्रद्धावान्‌ही होऊं शकत नाहीं. खरी आस्तिक्य बुद्धिही त्याच्या ठिकाणीं असत नाहीं. अंगीं शूरत्व बाणल्याशिवाय द्वेषबुद्धीचा लोप होत नाहीं, अंतःकरणांतून मत्सर निघून जात नाहीं, आणि या दोन रिपूंचा पूर्ण निःपात झाल्यावांचून कोणालाही सुसंस्कृत म्हणतां येईल काय? आमच्या देशांत आज असे शौर्यशाली, असे पुरुषार्थी पुरुष किती आहेत? अरेरे! मला तर कोणीच आढळत नाहींत. यांच्यासाठीं मी पुष्कळ शोध केला पण असा पुरुष मला एकच आढळला.'

**प्रश्नः**—स्वामीजी, तो कोण बरें?

**स्वामीजीः**—बाबू गिरीशचंद्र घोष. खरी त्यागबुद्धि त्याच्या ठिकाणीं मला आढळली. असाच मनुष्य परमेश्वराचा भक्त होऊं शकेल. त्याचा हा गुण पाहूनच श्रीरामकृष्णांनीं त्याच्या साऱ्या योगक्षेमाचा भार आपल्या शिरावर घेतला होता. परमेश्वराच्या ठिकाणीं असा अढळ भाव मला दुसऱ्या कोठेंही आढळला नाहीं. आपला सारा भार परमेश्वरावर कसा टाकावा हें मी त्याच्यापासून शिकलों.

इतकें बोलून स्वामीजींनीं दोन्ही हात जोडून मस्तकीं लावले.

* * *

## [ ४३ ]

### [ श्रीप्रियनाथसिंह ]

सन १८९९ सालीं स्वामीजींच्या अमेरिकेंतील प्रवासाच्या दुसऱ्या खेपेची तयारी चालली होती. आपल्या एका मित्राला भेटण्यासाठीं ते कलकत्त्याला गेले होते. तेथून परत येतांना बागबझारांतील बलराम बाबूच्या घरीं कांहीं वेळ ते थांबले होते. तेथें आपल्या एका स्नेह्याला भेटीसाठीं त्यांनीं बोलावलें होतें. तो मित्र आल्यावर उभयतांत पुढील संभाषण झालें.

**स्वामीजीः**—अरे, आज एक मोठी मौज झाली. एका मित्राच्या घरीं आज मी गेलों होतों. तेथें एक चित्र मीं पाहिलें. कुरुक्षेत्रावर श्रीकृष्ण अर्जुनाला उपदेश करीत आहे. श्रीकृष्ण रथावर उभा असून त्याच्या हातांत घोड्याचे दोर आहेत आणि अर्जुनाकडे तोंड करून त्याला तो गीता सांगत आहे. तें चित्र मला दाखवून त्याबद्दल माझें मत माझ्या मित्रानें मला विचारलें. 'बरें आहे,' एवढेंच उत्तर मीं दिलें. पण माझ्या मताचा अधिक तपशील तो मला खोदखोदून विचारूं लागला, तेव्हां मला स्पष्ट बोलणें भाग पडलें. मी म्हटलें, 'मला विशेष आवडेल असें त्यांत कांहींच नाही. आधीं हा रथाचा आकारच चुकला आहे. त्या काळीं असल्या देवळी आकाराचे रथच नव्हते. दुसरें, श्रीकृष्णाच्या चेहऱ्यावर भाव म्हणून कांहींच दिसत नाहीं.'

**प्रश्नः**—तर मग त्या काळीं कळस असलेले रथ नव्हते कीं काय ?

**स्वामीजीः**—बुद्धकालानंतर आपल्या देशांत अनेक बाबीचा नुसता गोंधळ उडून गेला आहे हें तुला विदित नाहीं काय ? प्राचीन काळीं असले रथ लढाईच्या प्रसंगीं वापरीत नसत. अजूनसुद्धां जुन्या प्रकारचे रथ राजपुतान्यांत आढळतात. ग्रीक पौराणिक चित्रांतील रथ तूं कधीं पाहिले नाहींस काय ? हे रथ दुचाकी असून त्यांत मागून चढावें लागतें. आपले रथही अशाच प्रकारचे असत. चित्र काढावयाचें तर त्यांतील तपशिलांत अशा चुका करून काय उपयोग ? ऐतिहासिक चित्रांचें महत्व यांतच असतें. असें चित्र काढावयाचें तर प्राचीन ग्रंथ शोधले पाहिजेत; त्यांचा पूर्ण अभ्यास केला पाहिजे; त्या काळच्या रीतीभातींचें यथास्थित प्रतिबिंब तुमच्या चित्रांत उतरलें पाहिजे. त्या काळची सत्य स्थिति प्रेक्षकाला तुम्हीं दाखविली पाहिजे. नाहीं तर तें त्या काळचें चित्रच नव्हे. आजचे आमचे चितारी कसे असतात हें तुला ठाऊक आहे ? शाळेंत अभ्यासाची रड असली आणि दुसऱ्या कशाच्याच उपयोगी हा नाहीं असें लोकांनीं म्हटलें म्हणजे असा विद्यार्थी चित्रकलेसारख्या विषयाकडे जातो. असल्या रड्यांच्या हातून खऱ्या कलेचें परिपोषण कितपत होणार ? उत्तम नाटक लिहिण्यास जेवढी बुद्धि पाहिजे तेवढीच उत्तम चित्र काढण्यासुद्धां पाहिजे.

**प्रश्नः**—तर मग आपल्या मतें श्रीकृष्णाचें अशा प्रसंगाचें चित्र कसें असावें ?

**स्वामीजीः**—भगवान् श्रीकृष्ण म्हणजे मूर्तिमंत गीता. यासाठीं त्यांच्या चित्रांत गीता दिसली पाहिजे. गीतेचा मुख्य सिद्धांत त्यांच्या साऱ्या शरीराच्या ठेवणींत व्यक्त झाला पाहिजे. अर्जुनाला ते धर्मांचा मार्ग दाखवीत होते. अर्जुनाच्या बुद्धीला मोह पडला होता. गांगरून जाऊन तो दुर्बल बनला होता. ही विकलता भगवंतांनीं दूर केली. त्यांच्या चित्रांत हें सामर्थ्य व्यक्त झालें पाहिजे.

इतकें बोलून स्वामीजींनीं त्या प्रसंगाचा आविर्भाव करून दाखविला, आणि ते म्हणाले, 'हें पहा, अशा रीतीनें भगवंतांनीं घोड्याचे दोर धरले होते. घोड्यांची अनीन इतकी खेंचली गेली होती कीं त्यांचे पुढचे पाय उभे राहून त्यांचीं तोंडें उघडली होतीं. अशा रीतीनें घोड्यांचें चित्र काढण्यांत सारथ्याचें सामर्थ्य कसें स्पष्ट दिसतें बरें ? कर्मयोगाचें सारें स्वरूप यांत उघड होतें. भगवंताचा मित्र कांहीं सामान्य मनुष्य नव्हता. त्याचें शौर्य जगाला जिंकील असें होतें; आणि असा पुरुष दुःखाखालीं वांकून जाऊन एखाद्या षंढासारखा चापबाण टाकून रथांत अधोवदन होऊन बसला होता. भगवंताच्या एका हातांत घोड्याचे दोर आणि दुसऱ्या हातांत चाबूक होता. मागें वळून त्यानें अर्जुनाकडे पाहिलें त्या वेळीं त्याच्या चेहऱ्यावर अलौकिक प्रेम आणि सहानुकंपा हीं स्पष्ट उमटलीं होतीं. त्याचा चेहरा निस्सीम शांत आणि गंभीर होता. वक्ता आणि श्रोता यांच्या अशा प्रकारच्या मनःस्थितींत गीतेचा जन्म झाला. आपल्या जिवलग मित्राला कोणत्या स्थितींत भगवंतांनीं गीता उपदेशिली हें ध्यानांत आणा. इतका सारा विचार करून भगवंतांचें चित्र कसें असावें हें सांगा बरें ?

**मित्रः**—कर्मप्रवणता, दृढता आणि गांभीर्य इतक्या भावांची एकच छाया त्या चित्रांत दिसली पाहिजे.

**स्वामीजीः**—बरोबर, अगदीं बरोबर. शरीराच्या ठेवणींत कर्माचा प्रचंड ओघ आणि चेहऱ्यावर निस्सीम शांतता; वर शांत नील आकाश ! चित्राचें स्वरूप या प्रकारचें असलें पाहिजे. गीतेचा मध्यवर्ती सिद्धांत हा आहे. कोणत्याही परिस्थितींत मनाची साम्यावस्था आणि कर्तृत्वशक्ति यांत बिघाड होऊं देऊं नये हेंच गीतेच्या उपदेशाचें मुख्य रहस्य आहे. भगवंताच्या चरणीं

सर्व भार टाकून शरीर कर्तव्यरत ठेवणें हीच गीतेची शिकवण आहे. ' **कर्मण्यकर्म यः पश्येत् अकर्मणि च कर्म यः ॥ स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥** ' कोणतेंही कर्म करीत असतां कर्म न केल्याइतकें शांत चित्त आणि कोणतेंही कर्म करीत नसतांना मन ब्रह्मप्रवण करण्याइतकें कर्तृत्व ही ज्याच्या ठिकाणीं एकवटलीं आहेत तोच मनुष्यांत बुद्धिमान्, तोच योगी आणि तोच सांग कर्म करणारा.

स्वामीजींना मठाला जावयाचें होतें. त्याकरितां एखादी बोट पहाण्यास एका गृहस्थाला त्यांनीं पाठविलें होतें. तो गृहस्थ परत येऊन म्हणाला, ' महाराज, बोट तयार आहे. ' स्वामीजी उभे राहिले आणि आपल्या मित्राला म्हणाले, ' चल, आतां मठाकडे जाऊं. वाट न पाहण्याबद्दल तूं घरीं सांगितलें असशीलच. '

बोटीकडे जात असतां रस्त्यांत या दोन मित्रांत पुढील संभाषण झालें.

**स्वामीजीः**—आपल्या देशांत सध्यां जिकडे तिकडे आळस भरला आहे. कर्मयोगाची प्रचंड नौबत सर्वत्र वाजविली पाहिजे. फलाकडे ढुंकूनसुद्धां न पाहतां आपण एकसारखें कर्म करीत राहिलें पाहिजे. आपला सर्व भार परमात्म्याच्या चरणकमलीं ठेवून देह कर्माला वाहिला पाहिजे.

**प्रश्नः**—कर्मयोग तो हाच का ?

**स्वामीजीः**—होय, हाच; पण धर्मतत्त्वांच्या अभ्यासावांचून कर्मयोगही असाध्य आहे हें विसरूं नको. कर्म, भक्ति, ज्ञान आणि राजयोग या साऱ्यांचाच समवाय तुमच्या ठिकाणीं झाला पाहिजे. या साऱ्यांचें एकत्र स्वरूप तुमच्या रोजच्या व्यवहारांत प्रत्यक्ष येण्यासाठीं तुम्ही यत्नशील बनलें पाहिजे. असे नसलें तर परमेश्वराच्या ठिकाणीं दृढनिष्ठा तुम्हांस कशी ठेवतां येईल ?

**प्रश्नः**—गीतेंत योजिलेला कर्म हा शब्द कांहीं वेगळ्याच अर्थाचा आहे, असें टीकाकार सांगतात. त्यांच्या मतें यज्ञयागादि वैदिक कर्म हेंच कर्म. बाकीच्या क्रिया विफल.

**स्वामीजीः**—ठीक आहे. पण या क्रियांचें स्वरूप तुम्हीं आतां बदललें पाहिजे. त्या क्रिया एकट्यापुरत्या न करितां त्यांचें क्षेत्र विस्तृत केलें पाहिजे.

साऱ्या क्रिया तुम्ही विफल म्हणतां, पण प्रत्येक कर्मांचें कांहीं तरी कार्य घडत असलेलें आपणांस दिसत नाहीं काय? तुम्हीं एक श्वास घेतला अथवा एखादा विचार मनांत आणला तर तेवढ्याचेंही कार्य घडतें. अरे, अशा कर्मांच्या द्वारें आपला स्वतःचा अंतर्वर्ती पुरुष स्पष्ट दशेला येऊं पहात नसतो काय? मग सारीं कर्में विफल कशीं, आणि त्याबद्दल जबाबदार कोण?

**मित्रः**—याचें सुसंगत उत्तर मला देतां येत नाहीं; हें कोडें मला उकलत नाहीं. तथापि परमेश्वर हा धनी आणि मनुष्य हा त्याचा हस्तक अथवा त्याचें उपकरण असं मला वाटतें. यासाठीं माझी सारीं कर्में परमेश्वराच्या प्रेरणेला अनुसरून माझ्या हातून घडत असल्यामुळें माझ्यावर त्यांची जबाबदारी कोणत्याही प्रकारें येत नाहीं.

**स्वामीजीः**—तुमचें हें म्हणणें फक्त एकाच स्थितींत मात्र खरें आहे. जीवन्मुक्तानें कर्में केलीं तरी त्यांची जबाबदारी त्याजवर असत नाहीं. पण जो संसारी आहे त्याला हा नियम लागू नाहीं. त्यानें सर्व कर्में निष्कामपणें केलीं तर त्याची चित्तशुद्धि होईल आणि चित्तशुद्धीनंतरच्या अनुभवानें कर्ता करविता वेगळाच आहे हें त्याला स्पष्ट दिसेल. असा अनुभव आल्यानंतरच तुमच्यासारखी बिनजबाबदारीची भाषा त्याला हक्कानें आणि न्यायानें बोलतां येईल. अनुभवाच्या अभावीं असल्या भाषेला कवडीचीही किंमत नाहीं. **'अनुभवावीण वचन। तें जाणावें श्वानाचें वमन॥'**

**प्रश्नः**—असें कां म्हणतां? नुसत्या बुद्धिवादानेंसुद्धां या सिद्धांताच्या सत्यतेची खात्री कोणाला पटली असली तर त्यानें तसें कां म्हणूं नये?

**स्वामीजीः**—खात्री पटणें या शब्दांचे तुमचे आमचे अर्थ वेगळे आहेत. आमच्या अर्थाप्रमाणें त्याची खात्री पटली असली तर त्याला तसें म्हणण्यास हरकत नाहीं. पण बुद्धिवादाची खात्री म्हणजे अळवावरचें पाणी. क्षणभर दिसणारें मोतीं पुढच्याच क्षणीं हवेंत उडून जातें. तुम्हीच आपल्या मनाशीं जरा विचार करून पहा. आपल्या रोजच्या व्यवहारांत शेंकडों कामें तुम्ही करतां, त्या सर्व प्रसंगीं 'मी करतों' असें केव्हांही तुम्हांस वाटत नाहीं काय? 'मी केवळ ईश्वराचा हस्तक' असें तुम्ही सदोदित समजत असतां काय? अशी आठवण तुम्हांला किती वेळां असते आणि किती वेळां नसते याचा

हिशोब तुम्हीच ठरवा. आतां इतकें मात्र खरें कीं, हा सिद्धांत ध्यानांत ठेवून सर्व कर्माच्या वेळीं ही आठवण तुम्हीं जागी ठेवली तर हळू हळू अहंकाराचा नाश होत जाईल आणि कालांतरानें सर्व कर्ता परमेश्वर ही भावना तुमच्या ठिकाणीं दृढ होईल. मग अशा स्थितींत मात्र 'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविशी हातीं धरूनियां॥' असें तुम्हांला न्यायानें म्हणतां येईल. पण जोंपर्यंत तुमचें सारें अंतःकरण अहंकारानें भरलेलें असतें तोंपर्यंत परमेश्वराला राहाण्याला तेथें जागा तरी कोठें असते ? तो तेथून गैरहजर असतो यांत नवल नाहीं.

**प्रश्नः**—पण माझ्या ठिकाणीं असलेल्या दुष्ट कल्पनांचा उत्पन्नकर्ता तरी तोच ना ?

**स्वामीजीः**—छे, छे ! असें भलतेंच बोलूं नको. असें बोलणें म्हणजे त्या सर्वमंगलाचा जाणूनबुजून उपहास करणें होय. हें महापातक आहे. '**नादत्ते कस्यचित्पापं**' हा सिद्धांत केव्हांही विसरूं नका. आपल्याच इच्छा तृप्त करण्याकरितां नाना प्रकारचीं भलींबुरीं कर्में आपण करीत असतों. दुष्ट वासना आणि दुष्ट कर्में यांचें जनकत्व आपणाकडेच आहे. कर्ताकरविता परमेश्वर असें तोंडानें म्हणून बुद्धिपुरःसर कोणी दुष्ट कर्में करीत राहिला तर अखेरीस त्याचा नाश मात्र होईल. अशाच रीतीनें आपली फसगत होत असते. आपण आपल्यालाच फसवीत असतों. एखादें सत्कार्य तुमच्या हातून घडलें तर तुम्हांला आनंद होतो कीं नाहीं ? अशा रीतीनें आनंद होणें हें 'माझ्या हातून सत्कार्य घडलें,' या अहंकाराचें द्योतक आहे. त्या सत्कार्याचें फळ त्या वेळीं तुम्ही चाखीत असतां त्यांत तुमचा दोष आहे असें मी म्हणत नाहीं. कारण मनुष्यस्वभावच तसा आहे. पण सत्कार्य तेवढें मीं केलें आणि दुष्कर्माचा कर्ता परमेश्वर असें म्हणणें किती मूर्खपणाचें आहे ? तें बुद्धिवादाला तरी धरून आहे काय ? यासाठींच या साऱ्या कल्पना भयंकर आहेत. गीता आणि वेदान्त यांच्या अर्ध्याकच्च्या आणि अपरिपक्क अभ्यासानेंच त्या उत्पन्न होत असतात. कर्ताकरविता परमेश्वर असल्या कल्पनेला केव्हांही मिठी मारून बसूं नका. किंबहुना, सत्कार्याचा कर्ता परमेश्वर आणि दुष्कर्माचा मी असें म्हणा. तुम्ही असे म्हणत राहिलां तर तुमच्या ठिकाणीं भक्तीचा उदय होईल; आणि ही भक्ति जसजशी दृढ होत जाईल तसतसा परमेश्वरी कृपेचा अनुभव

पदोपदीं तुम्हांस येईल. वस्तुस्थिति अशी आहे कीं, तुमचा निर्माणकर्तासुद्धां कोणी नाहीं. आपलें आपल्यालाच तुम्ही जन्मास घातलें आहे. सारासार विचार हाच, खरा वेदांत हाच; पण अनुभवावांचून मात्र हें पटावयाचें नाहीं. याकरितां मुमुक्षूनें आधीं द्वैताचा आश्रय करावा. सत्कार्यें परमेश्वराचीं आणि दुष्कर्में माझीं असे म्हणण्यास शिकावें. चित्तशुद्धीचा हा अत्यंत सोपा आणि सरळ मार्ग आहे. खऱ्या वैष्णवांना हा मार्ग इतका पटतो याचें कारण हेंच. आरंभींच अद्वैतसिद्धांताचा आश्रय करणें भयंकर आहे. यासाठीं द्वैताला आरंभ करून क्रमाक्रमानें अद्वैताचें उच्च शिखर गांठावें हेंच श्रेयस्कर आहे.

दांभिकपणा हा नेहमींच भयप्रद आहे. कदाचित् एखाद्याच्या मनांत दंभ नसतां दुष्ट इच्छासुद्धां ईश्वरी प्रेरणेनेंच होते, असें त्याला वाटत असल्यास त्याच्या हातून फार दिवस दुष्कर्में घडावयाचीं नाहींत हें निश्चयानें समजावें. त्याच्या मनाचें सर्व मालिन्य लवकरच नष्ट होईल. आमच्या पूर्वीच्या तत्त्ववेत्त्यांना हें सर्व ठाऊक होतें. बौद्ध धर्माची अवनति होऊं लागली तेव्हां तंत्रक्रियांचा प्रचार जोरानें होऊं लागला, असें मला वाटतें. पुढें या गोष्टींचा वीट लोकांना येऊं लागला आणि ते वैदिक क्रियाकर्मांतराकडे वळले. बौद्धांच्या जुलमामुळें वैदिक क्रियांचें आचरण त्यांना गुप्तपणें करावें लागे. यामुळें कित्येक वेळां जुन्या काळीं महिना दोन महिने चालणारीं हवनें त्यांना एखाद्या रात्रींतच आटपून घ्यावीं लागत. मनुष्य स्वभावतःच मूर्तिपूजक आहे. दृष्टीसमोर कांहीं प्रत्यक्ष चिन्ह असल्याशिवाय त्याच्या मनाचें समाधान होतच नाहीं. तेव्हां हे एका रात्रींतले वैदिक यज्ञ घरोघर होऊं लागले. तथापि अवनत बौद्धधर्माची छाया लोकांच्या चित्तावरून फार दिवस दूर झाली नाहीं. त्यांची अनाचारप्रियता तशीच चालू होती. 'भंग्याच्या गल्लींतूनच घरांत प्रवेश करणें कोणाला आवडतें' असें श्रीरामकृष्ण म्हणत, त्यांतलाच हा प्रकार घडला. दुष्कर्में करावयाचीं, पण तीं पमेश्वराच्या नांवानें. अशा रीतीनें या तांत्रिक क्रियांचा प्रारंभ झाला. बौद्धधर्माच्या अवनतीच्या कालीं लोकांच्या मनोवृत्ति इतक्या बिघडल्या होत्या कीं, त्यांना सरळ मार्गावर आणण्यास एखाद्या अयोग्य मध्यस्थाची योजना केल्यावांचून गत्यंतरच नव्हतें.

**प्रश्नः**—पण, लोक एकसारखे दुष्कर्में करीत राहिले तर त्यांच्या दुष्ट प्रवृत्तीला आळा तरी कसा बसणार ?

**स्वामीजीः**—कां बरें ? बाह्य कर्मे तींच राहिलीं तरी त्यांच्या हेतूंत बदल झाला; आणि हेतु बदलल्यामुळें प्रवृत्तीचीही दिशा बदलली. कर्मे तींच, पण ईश्वराचा साक्षात्कार व्हावा या हेतूनें केलेलीं.

**प्रश्नः**—असें खरोखरच घडलें असेल काय ?

**स्वामीजीः**—अर्थात्. मुख्य हेतु शुद्ध असला पाहिजे. मग कर्मे तितकीं शुद्ध नसलीं तरी तो हेतु तुम्हांला सरळ मार्गावर आणल्याशिवाय राहणार नाहीं.

**प्रश्नः**—पण मोहक वस्तूचा लोभ मनुष्याला अनावर होत असतो. मांस, मदिरा, स्त्री इत्यादि वस्तू अशाच प्रकारच्या आहेत. यांना हातीं धरून ईश्वराच्या दिशेनें कोणी चालूं लागेल तर तो आधीं यांच्याच पाशांत अडकावयाचा.

**स्वामीजीः**—आणि म्हणूनच श्रीरामकृष्णांचा अवतार झाला. तंत्रक्रियांचे दिवस आतां संपले आहेत. श्रीरामकृष्णही आरंभीं तांत्रिक होते. तथापि त्यांनीं अनाचार कधींही केला नाहीं. मदिरेचा प्रसाद घेतला पाहिजे, असें जेथें तंत्रशास्त्रानें आग्रहानें सांगितलें असेल तेथें मदिरापात्रांत एक बोट बुडवून त्याचा टिळा आपल्या मस्तकीं ते लावीत. तंत्रक्रिया म्हणजे एक विलक्षण निसरड्याची जागा आहे. सावधपणें चाललें तरी पाय केव्हां घसरेल आणि कपाळमोक्ष केव्हां होईल याचा नेम नाहीं. म्हणूनच आतां तंत्रशास्त्राचा पूर्ण लोप झाला पाहिजे. त्यानें आयुष्याचा पुरा उपभोग घेतला आहे. निदान आमचा मुलूख सोडून त्यानें देशांतर तरी करावें. ह्याकरितां श्रुतींचा अभ्यास आपण वाढविला पाहिजे. चतुर्विध योगमार्गांच्या समीकृत रूपाचा अभ्यास केला पाहिजे; आणि हें सिद्ध होण्याकरितां नैष्ठिक ब्रह्मचर्याची गोडी लोकांस लाविली पाहिजे.

**प्रश्नः**—चार योगांचें समीकरण म्हणजे काय ?

**स्वामीजीः**—नित्यानित्यविवेक, अव्यभिचारी भक्ति, निष्काम कर्म, आणि ध्यानाभ्यास; आणि याबरोबरच स्त्रीजातीबद्दल आदरबुद्धि.

**प्रश्नः**—स्त्रियांकडे आदरबुद्धीनें कसें पाहतां येईल ?

**स्वामीजीः**—आदिमातेच्या त्या प्रतिनिधि आहेत असा भाव धरण्यास शिकावें. आपल्या देशांत आदिमातेचें पूजन सशास्त्र मार्गानें होऊं लागेल

त्याच दिवशीं आमच्या उदयकालाला आरंभ होईल. त्याच दिवशीं मातेच्या यज्ञस्थंडिलावर स्वतःचें बलिदान करणारे पुरुष दिसूं लागतील.

**प्रश्नः**—स्वामीजी, तुमच्या लहानपणीं लग्न करण्याचा आग्रह आम्ही तुम्हांस करीत असूं तेव्हां 'नाहीं, मी कांहीं निराळाच होणार आहें' असें तुम्ही म्हणत असां. आपले शब्द तुम्हीं खरोखरच खरे केले आहेत.

**स्वामीजीः**—होय; आणि मलाही याबद्दल आनंद होतो. मित्रा, माझे पूर्वीचे दिवस तुला आठवतात ना? मला पोटभर अन्न मिळण्याचीसुद्धां मारामार, आणि उपाशी पोटानें मला मरेमरेतों काम करावें लागे तें वेगळेंच. त्या दिवसांची आठवण झाली म्हणजे मला अजूनही चमत्कारिक होतें. अमेरिकन लोकांनीं मजवर प्रेम केलें. हा सुंदर बिछाना मोठ्या भक्तिभावानें त्यांनीं मला दिला आणि त्याबरोबरच दोन वेळ पोटभर जेवण मिळण्याची तरतूदही त्यांनीं करून ठेविली; पण माझ्या शरीराची ही दशा तूं पहातोस ना? देहाचे उपभोग मला मिळूं नयेत हेंच माझ्या नशिबीं लिहिलें आहे. मऊ बिछान्यावर लोळून माझी प्रकृति अधिकच बिघडते. माझा गळा कोणीं दाबावा असा माझा श्वास कोंडूं लागतो. मग या हालांतून सुटण्याकरितां उघड्या जमिनीवर मला लोळावें लागतें.

# युरोपांतील प्रवासाचीं टिपणें.



ॐ नमो नारायणाय। अहो स्वामी! दुसऱ्या शब्दाचें शेवटचें अक्षर चांगलें जोरानेंच उच्चारा. हृषीकेशाकडे हीच पद्धत आहे. आज सात दिवस झाले, आम्ही बोटीवर आहों. तुम्हांस पत्र लिहावें म्हणून रोज बेत करतों. पण बंगाल्याचा प्रख्यात आळशीपणा माझ्या ठिकाणींही आहे. यामुळें सारे बेत जागच्या जागींच रहातात. लिहिण्याचें सामान भरपूर आणि वेळही पुष्कळ. तथापि त्यांचा उपयोग होत नाहीं. रोजनिशी कीं कायसें तुम्ही म्हणतां तेंसुद्धां रोज लिहिण्याचा बेत मी करतों. पण लिहूं उद्यांपासून हा विचार रोज चालू असतो. यामुळें या 'उद्यां' ला केव्हांच शेवट येत नाहीं; आणि माझें पाऊल तसूभरही पुढें पडत नाहीं. ही एक आळसाची गोष्ट झाली. दुसरें असें की, आतांशा तारीख वार माझ्या लक्षांत राहात नाहींत. तेव्हां कधीं काळीं एखादें पत्र मीं लिहिलें तर त्यावर तारीख वगैरे घालण्याची कृपा तुम्हींच केली पाहिजे. तुमची बुद्धि उदार आहे. यामुळें माझे अल्प गुण पर्वतासारखे करून तुम्ही कदाचित् असें म्हणाल कीं, **'ब्रह्मानंदीं लागली टाळी, मग तारीख वारासारख्या क्षुद्र गोष्टी कोण सांभाळी?'** पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, हा परिणाम माझ्या मूर्खपणाचा व निव्वळ आळसाचा आहे. तेव्हां अनुभवाच्या भक्तीशीं माझ्या भक्तीची तुलना करण्यांत 'क्व सूर्यप्रभवोवंशः' इत्यादि कालिदासानें म्हटलें तेंच अनुभवाच्या आणि माझ्या भक्तीच्या तुलनेंत निःसंशय खरें ठरावयाचें. रामाशिवाय ज्याच्या अंतःकरणांत दुसरी वस्तूच नाहीं तो हनुमान कोठें आणि श्रीरामकृष्णांचा क्षुद्रांतला क्षुद्र भक्त मी कोठें? आपल्या भक्तीच्या जोरावर एकाच उड्डाणांत शंभर योजनांचा समुद्र त्यानें पार केला आणि तोच समुद्र या लाकडी घरांत बसून हेलकावे खात खात मी तरून जात आहें. त्यांत नुसतें सरळ उभें रहावयाचें म्हटलें तरी एखाद्या खांबाचा अथवा दांड्याचा आश्रय करावा लागतो. आतां, त्याच्यांत आणि माझ्यांत

